उषा प्रकाशन समिति : प्रथम प्रकाशन

# गॉर्कीच्या गोष्टी

अनुवादिका :

अंबिका बेहेरे, बी.ए.



१९३६

सोल एजंटस् : बॉम्बे बुक डेपो, गिरगांव, मुंबई नं. ४

प्रथमावृत्ति ] [ किं. १। रु.

# मॅक्झिम गॉर्की

---

## अल्प परिचय

जन्म १८६८ मृत्यू १९३६

जून १६ सन १९३६ रोजीं हा जगप्रसिद्ध वाङ्मय सेवक मरण पावला. जगप्रसिद्ध हें विशेषण आजवर अनेकांना लावलें गेलें असेल. पण तें ह्या क्रान्तिकारी कलावन्ता इतकें क्वचितच सार्थ झालें असेल. १९१७ च्या रशियन क्रांतीनें—बोल्शेव्हिक क्रांतीनें जगांतील कानाकोंपराही हादरला गेला. आजवरचे समाज नियंत्रणाचे सर्व नियम आणि समाजांतील परस्पर संबंध आमूलाग्र उलथून पडले. ह्या अचाट घडामोडीं बरोबर जीं कांहीं प्रभावी नांवें लोकांपुढें आलीं त्यांत लेनिन आणि गॉर्की विख्यात आहेत.

लेनिन हा तर बोलून चालून क्रांतीचा इंजिनियर. त्यानें समाजांतील बहुजन समाजाला माणुसकीचें जिणें जगण्याकरितां स्वतःच्या पायावर उभें केलें. आत्मविश्वासाच्या चैतन्ययुक्त जाणीवेनें नवीन समाज रचनेच्या विश्वामित्री अचाट कार्याला प्रवृत्त आणि कार्यक्षम बनविलें. तर गॉर्कीनें आपल्या कलावती लेखणीनें समाजांतील सांदी कोपऱ्यांतून केर कचऱ्याप्रमाणें फेंकले गेलेल्या अवहेलित समाज—थरांतील जातिवंत मानवतेचा जिवन्तपणा जागता बोलता केला. आणि म्हणूनच लेनिन इतकेंच गॉर्कीचें नांव सार्थतेनें जगजाहीर होऊन राहिलें आहे.

गॉर्की याचें मूळ नांव ॲलेक्सि मॅक्झिमोव्हिफ पेश्काफ असें आहे. परंतु तो मॅक्झिम गॉर्की ह्या टोपण नांवानेंच सर्वांस माहीत आहे. गॉर्की ह्या रशियन शब्दाचा अर्थ ' कटुता ' असा आहे. गॉर्कीला बालपणा पासूनच जगांत विषम कटुतेचा अनुभव येऊं लागला. ह्या स्वतःच्या कडवट अनुभवांचें सारभूत कलाचित्रण करावयाचें म्हणून म्हणा, अगर समाजांतील शिष्ट संकृतीच्या पांघरुणाखालीं चाललेली मानवतेची दुर्दशा सत्यस्वरूपांत उभी करून ह्या शिष्ट संस्कृतींचें किळसवाणें हिडिस असें कडवें स्वरूप उघडें करून सर्व समाजशिष्टांनां कटु ताडन करण्याचें कार्य अंगिकारलें म्हणून म्हणा, गॉर्की हें नांव सर्वतः

अन्वर्थक ठरतें. स्वानुभवानें शिष्ट संस्कृतींतील समाजजविनांतील हाल अपेष्टांचें कडवट सार गॉर्कीनें आपल्या कलाकृतींतून ओतलें असलें तरी आपल्या 'संताळी' वाङ्मयाप्रमाणें अगर प्रसिद्ध इटालियन कवी लिओपार्डी ह्याच्याप्रमाणें गॉर्कीच्या समाजांतील कटु अनुभवांवर उभारलेल्या कलाकृतींतून जीवनांतील हाल अपेष्टांच्या भाराखालीं दडपून गेलेला उदासवाणा निराशावादाचा सूर मुळींच निघत नाहीं.

## बालपण

गॉर्कीचा जन्म १८६८ मार्च १४ रोजीं निझनी नोव्ह ग्रोडा जवळ नाझदी खेड्यांत त्याच्या आजोळीं झाला. त्याचा बाप अस्त्राखान येथें एक सामान्य चांभार होता. वयाच्या पांच वर्षें पर्यंत गॉर्की अस्त्राखान येथें बापाजवळ होता. तो पांच वर्षांचा असतांच बाप वारला आणि त्याच्या आईनें दुसरें लग्न केलें. पण ती नंतर लवकरच मरण पावली आणि गॉर्की आजोळीं पांचव्या वर्षींच परत आला. पण आजोबाची स्थिती फारच हलाखीची असल्यानें ह्या पोरक्या पोराला वयाच्या सातव्या आठव्या वर्षांपासूनच स्वतःच्या पोटासाठीं कामाला लागावें लागलें. गॉर्कीनें आपल्या आत्मवृत्तांत आपल्या वृद्ध आजा आजी विषयीं आठवणी दिल्या आहेत. दूरप्रांतीं पोटासाठीं रखडत असतां त्याला एक विराम चिन्ह रहित पत्र मिळालें. त्यांत आजीच्या मृत्यूची बातमी वाचून आपल्याला किती अपार दुःख झालें ह्याचा गॉर्कीनें उल्लेख केला आहे.

गॉर्कीनें कामाला सुरवात केली ती आपल्या वडिलार्जित चांभाराच्या धंद्यांत. एका मोचीच्या दुकानांत त्याला आज्यानें लावून दिला. पण तेथून हा पळाला, आणि पुढील १०।११ वर्षें त्यानें अनेक निरनिराळें धंदे पाहिले. शिंप्याच्या दुकानांत जुने कपडे दुरुस्त करणारा, फेरीवाला, भटारखान्यांतील छोकरा म्हणून, मूर्तीकाराच्या हाताखालीं मूर्ती रंगविणारा, मोची, मजूर, माळी, मोजणी खात्यांतील हमाल, सडका दुरुस्त करणारा, तमाशांत लावण्या म्हणणारा, वकिलाचा गुमास्ता अशीं निरनिराळीं कामें करावीं लागलीं. ह्या कामानिमित्त भटकण्याच्या काळांत त्यानें डॅन्यूब नदीच्या खोऱ्यापासून तों कॉकेशस पर्यंतचा प्रदेश पायपिटीखालीं घातला आहे. ह्या भटक्या आयुष्यांत अनेक हाल अपेष्टांतून गॉर्कीला जावें लागलें. एकदां तर तो ह्या खडतर जीवनाला इतका वैतागून गेला होता कीं स्वतःवर गोळी

घालून आत्महत्त्या करण्याचा त्यानें प्रयत्न केला. त्यावेळीं तो १९ वर्षांचा असावा. त्याचा हा प्रयत्न सफल झाला नाहीं आणि तो केवळ जखमी झाला. त्याला ह्या आपल्या पागलपणाबद्दल खूप शरम वाटल्याचें त्यानें लिहिलें आहे. ह्या प्रसंगीच्या आपल्या मनः स्थितीचें "मकर चुद्रा" (१८९२) ह्या गोष्टींत त्यानें चित्र रेखाटलें आहे. हीच याची प्रसिद्ध झालेली पहिली गोष्ट.

ह्या पूर्वायुष्यांतील भटक्या जीवनांतील अनुभवांवरच गॉर्कीनें अनेक कथा रचिल्या. आणि त्यांचा पहिला संग्रह १८९८ मध्यें प्रसिद्ध झाला. तो इतका लोकप्रिय ठरला कीं एक वर्षांत त्याच्या १ लाक्ष प्रति खपल्या. मराठींत अनुवादित केलेल्या ह्या संग्रहापैकीं बहुतेक गॉर्कीनें पूर्वायुष्यांत लिहिलेल्या गोष्टींवरूनच घेतलेल्या आहेत.

## शिक्षण.

गॉर्कीचें शिक्षण असें पद्धतशीर मुळींच झालेलें नाहीं. कोणत्याहीं शाळा कॉलेजांत तो गेलेला नाहीं. निसर्ग आणि समाजांतील जिवंत दृश्यांचा प्रत्यक्ष परिचय हींच त्याच्या शिक्षणाचीं साधनें. तो लिहावाचायाला शिकला तो देखील खाजगी स्नेह्याच्या मदतीनें व स्वतःच्या अनिवार्य उत्सुकतेनें. व्होलगा नदीवर बोटीवर नोकरीला असतानां त्याच्या बोटीवर एक त्याच्या सारखाच भटारी होता. त्याला पुस्तकांचा आणि वाचनाचा खूप नाद. त्यानें कित्येक फार चांगलीं पुस्तकें जमा केलीं होतीं. त्याच्या जवळ बसून त्यानें वाचलेलीं पुस्तकें ऐकून गॉर्कीची ज्ञानपिपासा सोसावली. मित्राच्या सहाय्यानें थोडेंसें लिहितां वाचतां येऊं लागल्यावर जास्त शिकण्याच्या प्रबळ इच्छेनें त्यानें बोटीवरील नोकरी सोडून "काझन"चा रस्ता धरला. 'काझन'ला टॉलस्टायचें शिक्षण झालेलें. तेव्हां त्याच्या प्रमाणेंच आपणही विद्वान व्हावें ही मनची आशा. पण टॉलस्टाय होता उमरावाचा मुलगा, तर गॉर्की पडला भणंग. तो काझनमध्यें ज्या बाईकडे राहिला ती बाई त्याला ह्मणे "अरे पोरा तुला बटाटे सोलतां आले ह्मणून विद्यापिठांत तुला मोफत का कोणी घेणार आहे !" शाळेंत शिरकाव होत नाहीं असें पाहिल्यावर त्यानें एका बिस्किटाच्या भट्टींत नोकरी धरली. येथें त्याला महिना तीन रुबलवर दिवसाचे १६ ते १८ तास राबावें लागे. पण त्याचा काटकपणा कांहीं और होता. इतके काबाडकष्ट करून देखील त्यानें आपल्या ज्ञानवृद्धीचा प्रयत्न

चालू ठेवला. तळघरांतील कोंदट हवेंतील ह्या अंधेऱ्या बिस्किटांच्या कारखान्याचें, तेथील रसरसणाऱ्या भट्टीचें, आणि आपल्या कैदीवजा जीवनाचें गॉर्कीनें हृदयस्पर्शी चित्र आपल्या " सव्वीस जणांची जीवनलता " ह्या चटका लावणाऱ्या अमर नवलकृतींत उतरविलें आहे. या कारखान्यांत काम करीत असतांच गॉर्कीचा क्रांतिकारक चळवळीशीं संबंध आला.

## क्रांतिकारक चळवळीशीं संबंध

त्याच्यापेक्षां १२।१५ वर्षांनीं वडील असा त्याच भट्टींत काम करणारा रेमूस नांवाचा कामकरी क्रांतिकारी मंडळाच्या एका गटाचा मुख्य होता. त्याच्या बरोबर गॉर्कीची क्रांतिकारी मंडळीशीं पछान झाली. गॉर्की ज्या बाईच्या घरीं रहात होता तेथून नजीकच एक जुनाट पडके भुयारासारखें घर होतें. " बेवारशी कुत्र्यांचें निवासस्थान होतें तें " असें गॉर्की आपल्या 'आठवणींत' ह्मणतो. ह्या स्मशानवत भयाण घरांत क्रांतिकारकांच्या संगतीनें त्याच्या मनांत क्रांतीचें बीज रोंवलें आहे ( १८८४ ). गॉर्कीला विश्वविद्यालयांत जातां आलें नाहीं खरें पण ह्या दिवसांत त्याला विशाल दुनियेच्या निरनिराळ्या प्रसंगांतून अनुभवानें जें बहुमोल ज्ञान झालें त्याचें गॉर्कीनें " माझें विश्वविद्यालयीन जीवन " ह्यांत बहारीनें वर्णन केलें आहे.

१८८९ च्या अखेरीस गॉर्कीला संशयावरून 'सेमाल' केसमध्यें पकडण्यांत आलें होतें. पण महिन्याभरांतच त्यांतून त्याची सुटका झाली. ह्यानंतर एका रेल्वे स्टेशनवर चौकीदार व तमाशाचीं गाणीं म्हणणारा म्हणून त्यानें कामें केलीं. ह्याच सुमारास झारच्या सैन्यांत शिरण्याचाही त्यानें निष्फळ प्रयत्न केला होता.

## अन्यायाची चीड

भटकतां भटकतां दक्षिण रशियांत खेरसन खेड्यांत आला असतां त्यानें एका बाईला कांहीं अपराधाबद्दल शिक्षा म्हणून गांवकऱ्यांनीं गाडीला जुंपलेलें पाहिलें. तें दारुण दृश्य पाहून गॉर्कीला मनस्वी चीड आली. रागाच्या भरांत तो एकाकी त्या लोकांवर तुटून पडला. त्या लोकांनीं त्याला इतका पिटून काढला कीं त्याची एक बरगडी जन्माची अधू झाली आणि त्यांतच त्याला क्षय झाला. मरेपावेतों त्याचे परिणाम त्याला भोगावे लागले. पण ह्यांत विशेष मजा अशी कीं गॉर्की मृत्युशय्येवर पडला असतां खेरसन खेडयाची हीच पूर्वीची मंडळी

गॉर्कीच्या अंतिम भेटीसाठीं आणि पूर्वींच्या दुष्ट कृतीबद्दल पश्चात्ताप व्यक्त करून क्षमा मागण्यासाठीं विमानानें उडत आली होती. वरील पाशवी अत्याचाराचें वर्णन गॉर्कीनें आपल्या " वेवर्ड " ह्या कथेंत गुंफलें आहे.

जुलूम जबरदस्तीबद्दल चीड गॉर्कीला लहानपणापासूनच होती. तो पांच सहा वर्षांचा असतांच त्याचा सावत्र बाप त्याच्या आईच्या छातीवर बुटाच्या टांचा रोंवून तिला मारीत होता. तें दृश्य पाहून बट्टु गॉर्कीला इतका अनावर संताप आला कीं तो सुरा घेऊन त्याला मारायला धांवला होता.

## लेखक म्हणून पुढें येतो

१८९१ मध्यें टिफलसमध्यें रेल्वे कारखान्यांत तो नोकरीला राहिला. ९२ मध्यें त्याची 'मकर चूद्रा' गोष्ट तेथील स्थानिक पत्रांत प्रसिद्ध होऊन कादंबरीकार 'करलेंको' ह्याचें त्याच्याकडे लक्ष वेधलें. त्याच्याशीं गॉर्कीची ओळख झाल्यानें गॉर्कीला फार फायदा झाला. ''करलेंको''नें लेखनांत त्याला फार प्रोत्साहन दिलें. करलेंकोच्या सूचनेवरून गॉर्कीनें 'चेल्काश' म्हणजे 'धान्यचोर' नांवाची सुंदर गोष्ट लिहिली. ती प्रसिद्ध झाल्याबरोबर गॉर्कीची एक दर्दी कलावन्त म्हणून एकदम ख्याती झाली. ह्या गोष्टी नंतर गॉर्कीच्या " वर्थ ऑफ मॅन " " ऑटम नाइट " " रिफ्ट " वगैरे गोष्टी एका मागून एक प्रसिद्ध झाल्या. १८९५–९६ च्या सुमारास लोक गॉर्कीला टॉलस्टायच्या बरोबरीचा लेखक समजूं लागले.

ह्याच सुमाराला गॉर्की एका एम्. ए. लानिन नांवाच्या वकिलाजवळ नोकरीस राहिला. गॉर्कीच्या अंगचे कलागूण पाहून त्याचा गॉर्कीवर लोभ जडला. त्याच्या सहवासांत आणि मार्गदर्शकत्वामुळें गॉर्कीला नवीन तत्वदृष्टी प्राप्त झाली. त्यानें इंग्लिश आणि फ्रेंच साहित्यग्रंथांचें, विशेषतः शेक्सपिअरच्या ग्रंथांचें अगदीं कसोशीनें वाचन केलें. स्मिथच्या उदार मतवादांतून मार्क्स एंगल्सच्या तत्वग्रंथांशीं तो येऊन ठेपला आणि मार्क्सिझमच्या मतांकडे त्याचा कल होतांच साहजिकच त्याच्याकडे पोलिसची करडी नजर वळली. तरी पण १८९९ पर्यंत तो सोशल डेमोक्रॅटिक पक्षाला उघडपणें मिळाला नव्हता.

१८९८ मे मध्यें क्रांतिकारक लेख लिहिल्याबद्दल गॉर्कीला दुसऱ्यानदां अटक झाली. पण जून १० ला त्यांतून त्याची सुटका झाली.

## प्रेमांत पडतो

इतर सर्व जीवनक्रमाप्रमाणेंच गॉर्कीचा प्रेमानुभवही कंटकमयच आहे. भटक्या जीवनांतील नोकरी प्रसंगानें त्याची एका अस्मानी परीशीं गांठ पडली. एका वृद्ध परदेशी ऑफिसरची ती दुसऱ्या कीं तिसरेपणची बायको. गॉर्कीपेक्षां ती वयानें निदान १०।१२ वर्षांनीं तरी मोठी असेल. पण तिचा बुड्ढा नवरा इतका गबाळा होता कीं त्याच्या दाढीच्या झुबक्यांत नेहमीं खाल्लेल्या अन्नाचे तुकडे लटकत असायचे. अशा त्या गंगाजमनी जोडयांत गॉर्कीचें परीवर प्रेम जडलें. पण नोकर पडला तो तिचा. तेव्हां स्वतःशी चुळबुळ करीतच रहावें लागत होतें त्याला. तशांत एक दिवस आंघोळ केल्यानें त्याला सर्दी होऊन बराच ताप आला. त्यावेळीं तिनें जी त्याची काळजी घेतली त्यावरून गॉर्कीला तिचेंही आपल्यावर प्रेम असल्याचें कळून चुकलें. "मीं तिच्या बाहुपाशांत बद्ध झालों होतों म्हणूनच ठीक झालें. नाहीं तर जीवनाचा सर्व दुःखभार हलका झाल्यानें मीं एकदम हवेंत उडून गेलों असतों" असें गॉर्कीनें आपल्या आनंदाचें वर्णन केलें आहे. पण ह्या प्रेम सुखाचा आस्वाद गॉर्कीला फार मिळाला नाहीं. आपल्या वृद्ध अपांग नवऱ्याला सोडून ती गॉर्कीबरोबर जाण्याला तयार होईना. "तूं धडधाकड आहेस. माझा नवरा दुबळा, म्हणून तुझ्यापेक्षां त्यालाच माझी गरज आहे," असें म्हणून तिनें गॉर्कीला वाटेला लावलें.

## यशोगौरव

१९०० च्या सुमारास वयाच्या अवघ्या तिशीं बत्तीशींत गॉर्की पहिल्या प्रतीच्या लेखकांत मोडूं लागला होता. टालस्टाय, चेकाव्ह, लिओनेड अॅन्ड्रेव्ह ह्या समकालीन विख्यात लेखकांशीं त्याचा परिचय झाला होता. १९०१ मध्यें त्याची "फोमा गार्डीव्ह" कादंबरी प्रसिद्ध झाली. आणि पुढील वर्षींच (१९०२) "दी थ्री ऑफ देम" आणि "आऊट कास्ट" ह्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. गॉर्कीची मार्क्सवादी दृष्टी आतां स्पष्टपणें पुढें आली. १९०१ एप्रीलमध्यें विद्यार्थ्यांवर झालेल्या सरकारी दडपशाहीचा उघड निषेध केल्याबद्दल आणि क्रांतिकारक कामासाठीं गुप्त छापखाना चालविण्याच्या आरोपावरून त्याला पुन्हां पकडण्यात आलें. पण टालस्टाय वगैरेंच्या मध्यस्तीमुळें पुढें खटला झाला नाहीं व तो सुटला. १९०२ च्या एप्रीलमध्यें त्याचें पहिलें नाटक "स्मग सिटिझन्स"

पीटर्स बर्ग ( लेनिनग्रॅड )मध्यें स्टेजवर आलें. लागोपाठ डिसेंबरांत " लोअर डेप्थस् ' हें एका विख्यात कंपनीनें स्टेजवर आणलें. तें इतकें लोकप्रिय झालें कीं त्याच्या १ वर्षाच्या आंत १४ आवृत्त्या निघाल्या. व बर्लिनमध्यें हें नाटक लागोपाठ ५०० रात्रीं लागलें. १९०२ मध्येंच त्याची " सव्वीस जणांची जीवनलता " प्रसिद्ध झाली. समाजांतील दुर्धर दैन्याच्या पायावर उभारलेली ही अमर काव्य कृती आहे " असा प्रिन्स मर्स्कीचा ह्या गोष्टीबद्दल अभिप्राय आहे.

गॉर्कीचा यशोगौरवसारखा वाढतच होता. १९०३ मध्यें त्याला " इंपिरिअल ॲकॅडेमी आफ सायन्स " ह्या संस्थेनें आपला सन्मान्य सभासद निवडून त्याच्या कलागुणांचा मोठाच गौरव केला. पण गॉर्कीच्या राजकीय चळवळींमुळें झारनें त्याला सभासद करण्याचें नाकारलें. त्याचा निषेध करण्यासाठीं म्हणून चेकाव्ह आणि करलेंको यानीं आपल्या सभासदत्वाचे राजीनामे दिले.

## बोल्शेव्हिक गार्की

१९०३ पासूनच गॉर्की पक्का बोल्शेव्हिक बनूं लागला. लेनिनच्या लिखाणाचा त्याच्यावर परिणाम होऊन तो त्याच्या पंथाचा अनुयायी बनला.

१९०५ मध्यें " माजी माणसें " हीं उत्कृष्ट कृति त्यानें प्रसिद्ध केली. भांडवलशाही समाजांतील विषमतेचें स्पष्ट स्वरूप यांत सुंदरपणें विशद केलेलें आहे. ह्याच सुमारास " समर हाऊस ड्वेलर्स " आणि "दी सॉंग ऑफ दी सन" हीं पांढरपेशा मेषपात्र वृत्तीवर सणसणीत कोरडे ओढणारीं त्याचीं दोन नाटकें बाहेर आलीं.

१९०५ मध्यें क्रांतीच्या उसळत्या लाटेंत गॉर्कीनें उडी घेतली. " फादर गेपून "नें झारच्या राजवाड्यावर जी कामगारांची मोठी मिरवणूक नेली त्यांत गॉर्की एक पुढारी होता. कामगारांच्या अमानुष कत्तलीनंतर गॉर्कीला पकडून तुरुंगांत टाकण्यांत आलें. तुरुंगांत असतांच त्यानें आपलें " चिल्ड्रेन ऑफ दी सन " नाटक लिहिलें. युरोप अमेरिकेंत त्याच्या अटकेविरुद्ध प्रचंड खळबळ उडाल्यानें झारनें त्याला दहा हजार रुबलसच्या जामिनावर सोडलें. सुटल्याबरोबर त्यानें " नोव्हाया झिझना " म्हणजे नवजीवन नांवाचें पत्र सुरू केलें. लेनिन ह्या पत्राचा एक प्रमुख लेखक होता. १९०५ च्या डिसेंबर क्रांतींत तो पुन्हां जातीनें लढला.

क्रांतिकारी म्हणून तो आतां जाहीर झाल्यानें त्याला रशियांत राहणें कठीण झालें. १९०६ मध्यें पीटर्सबर्ग ( लेनिनग्रॅड ) मधील त्याच्या घरावर छापा आल्यानंतर तो रशिया सोडून इंग्लंडच्या मार्गानें अमेरिकेला गेला. मादाम आंद्रेव ही विख्यात नटी ह्यावेळीं त्याच्याबरोबर रहात होती. रशियन क्रांतिकारकांवर होणाऱ्या जुलमाविरुद्ध युरोप, इंग्लंड, अमेरिकेंत चळवळ करून रशियन क्रांतिकारांना सहानुभूति आणि मदत मिळविण्याची कामगिरी गॉर्कीनें पत्करली होती. मार्क ट्वेन ह्या प्रख्यात अमेरिकन विनोदी लेखकाच्या पुरस्कारानें अमेरिकेंत गॉर्कीचा उतरल्याबरोबर फार मोठा गौरव झाला. पण त्याच्या बरोबरची स्त्री ही त्याची लग्नाची बायको नव्हे असें कळतांच सर्व सनातनी अमेरिकन त्याच्या विरुद्ध उठले. त्यामुळें रशियन क्रांतिकारकांना म्हणण्यासारखी मदत तो मिळवूं शकला नाहीं. "दी सिटी ऑफ दी यलो डेव्हिल" नाटक लिहून त्यानें त्या अमेरिकन भोंदूंचा चांगला समाचार घेतला आहे. विश्वविख्यात "आई" कादंबरी गॉर्कीनें अमेरिकेच्या मुक्कामांत लिहिलीं. ती पुढें १९०९ मध्यें प्रसिद्ध झाली. ह्या "आई" कादंबरीवरून तिच्या इतकी नितान्त सुंदर कलाकृति दृश्यपटांतील फील्मच्या स्वरूपांत तयार झाली आहे.

अमेरिकेंतून परत आल्यावर रशियांत जाणें शक्य नव्हतें. त्यानें इटली जवळच्या काप्री बेटात आपलें निवास स्थान केलें आणि तेथें तरुणांना क्रांतिकारक बनविण्याचा अड्डा सुरू केला. अर्थात हेरांचा सारखा सुळसुळाट त्याच्या भोंवती सुरू झाला. त्यांना अनुलक्षूनच त्यानें आपली "हेर" गोष्ट लिहिली ( १९०६ ) लंडनमध्यें ( १९०७ ) रशियन सोशल डेमोक्रॅटांची सभा झाली. तिला गॉर्की हजर होता. तेथेंच त्याची लेनिनशीं गांठ होऊन त्यांची मैत्री दृढ झाली.

१९१३ मध्यें स्वदेशीं परत येऊन पीटर्स बर्ग येथें त्यानें वर्तमानपत्र सुरू केलें. तितक्यांत लढाई सुरू होऊन त्यांत त्यानें युद्ध विरोधी चळवळींत पुढाकार घेतला. १९१३ ते १५ ह्या काळांत त्यानें आपल्या आठवणीचे तीन भाग लिहिले.

## नव्या संस्कृतीचा भालाइत

१९१७ च्या बोल्शेव्हिक क्रांती नंतर गॉर्कीकडे सहाजिकच नवीन उदयोन्मुख कामकरी संस्कृतीचें पुढारीपण आलें. नवीन सामाजिक क्रांतीचा तो अधिकृत आणि सर्वमान्य पुरस्कर्ता बनला. नवीन सामाजिक घडामोडीचें, नवीन जन्माला

आलेल्या मानवाच्या अचाट कर्तबगारीचें, नवोदित सामाजिक भावनेचें आणि विराट व्यवहार पराक्रमांचें कर्ममर्म दाखवून देऊन त्याला वाङ्मयांत चिरस्थायी करणें, नवीन संस्कृतीचें संवर्धन करणें हें महत्वाचें काम करण्यांत गॉर्कीचीं उरल्या आयुष्याचीं १५।१६ वर्षें खर्चीं पडलीं आहेत. " ऑन गार्ड फॉर दी सोव्हिएट युनियन " म्हणजे " सोव्हिएट संस्कृतीच्या बचावासाठीं " ही त्याची कृति नव्या संस्कृतीच्या पुरस्काराचें मूर्तीमंत प्रतीक आहे. हें नवीन संस्कृतीच्या पुरस्कारसंवर्धनाचें काम इतकें भारी होतें कीं ह्या अखेरच्या १५ वर्षांत त्याला स्वतंत्रपणें लेखन करण्याला फारशी फुरसद मिळालीच नाहीं म्हटलें तरी चालेल. स्वतः लेखन करण्याऐवजीं नवीन रशियन लेखकांना खरोखरीच 'लेखक बनविण्याचें' काम गॉर्कीला करावें लागलें आहे. नवीन सामाजिक संस्कृतीचें कलाजीवनाचें, उदात्त मानवतेचें मर्म शिकवून नवा लेखक वर्ग तयार करण्याचें काम त्यानें केलें आहे. क्रांतीनंतर बदललेल्या परिस्थितींत पूर्वीप्रमाणें लेखनगिरीची मिरास पांढरपेशा सुशिक्षितांच्या हातीं राहिली नाहीं. बंधमुक्त राबणाऱ्या जनतेंतून अनेक कलावन्त पुढें येऊं लागले. ह्या सर्व होतकरू लेखकांचीं हस्त लिखितें तपासून त्यांतील कला तंत्र, संविधानाची सुसंगती लावणें, त्यांवरून वाकबगारीचा हात फिरविणें हें काम गॉर्कीनें अखंड अविश्रांत मेहनतीनें व क्रांतिकारक उत्साहानें केलें आहे. नव्या रशियन लेखकांना गॉर्कीनें लेखक बनविलें आहे. व जुन्याचे नव्यावरील हल्ले आपल्या कसलेल्या ढालीवर झेलून, निष्प्रभ करून, नव्या संस्कृतीची श्रेष्ठता जगाला पटविली आहे.

पण ह्या काळांत त्यानें स्वतंत्र लेखन मुळींच केलें नाहीं असें नाही. " डिकेडन्स " ह्या त्याच्या कृतींत भांडवलशाही कारखानदारीच्या उदयकालचें सुंदर चित्र आलेलें आहे. त्यानें आत्मवृत्तपर " क्लिम सॅमघिम " चा जीवनवृत्तांत तीन भागांत प्रसिद्ध केला आहे. 'बायस्टॅंडर्ड,' 'मॅगनेट' व 'अदर फायरस' ही ती त्रयी होय. गॉर्की स्वतः " अदर फायर्स " ही कृती आपल्या सर्व कृतींत श्रेष्ठ मानतो.

## नवीन कला प्रकार

सन १९२२ मध्यें कांहीं काळ प्रकृती स्वास्थ्यासाठीं जर्मनींत राहिला होता. १९२८ मध्यें रशियांत परत आल्यानंतर सोव्हिएट लेखकांचा संघ बनवून नवीन

संस्कृतींचा आविष्कार करणारा नवा सामुदायिक कलाप्रकार म्हणजे अनेकांनीं मिळून लेखनाचा प्रकार सुरू केला. " व्हाइट सी कॅनॉल " ही ती नवीन कलाकृति होय. रशियांत अस्तित्वांत येत असलेल्या नव्या समाजाच्या अनेकविध घडामोडींचा—पराक्रमाचा संकलित इतिहास लिहिण्याची ही योजना असून ' व्हाइट सी कॅनाल ' हा त्यांतील फक्त एक भाग आहे.

२५ सप्टेंबर १९३२ रोजीं सर्व सोव्हिएट रशियावर गॉर्कीच्या लेखन व्यवसायाला चाळीस वर्षे झाल्याबद्दल मोठा सन्मानोत्सव झाला. गॉर्कीच्या जन्मस्थानाला व अनेक कारखान्याना गॉर्कीचें नांव ठेवण्यांत आलें. व सर्व जगांतून त्याच्यावर अभिनदनांचा वर्षाव झाला. आज लेनिन इतकेंच गॉर्कीचें नांव रशियांतील सर्व आबालवृद्धांच्या प्रेम परिचयाचें होऊन राहिलें आहे. हा महान लेखक गेल्या जून १९३६ मध्यें मरण पावला. त्याच्या मरणानंतर जगभर साहित्यिकाकडून त्याचा स्मृतीदिन पाळण्यांत आला. गेल्या १६ आगस्ट १९३६ रोजीं हिंदुस्थानचा साहित्यिकानीं गॉर्की दिन पाळून आपला आदर व्यक्त केला आहे. ह्या महान कलावन्ताच्या कलाकृतींचा अल्पपरिचय म्हणून हा कथा संग्रह अनुवाद रूपानें मराठी वाचकांना सादर करीत आहें.

**अंबिका बेहेरे**

कृष्णा बिल्डिंग नं. १, परेळ,
मुंबई, ता. ७।११।३६

---

# अनुक्रमणिका.

—:०:—

# १

# माजी—माणसं

## अथवा

# मनुष्यत्वाला मुकलेले जीव.

मुख्य रस्त्याच्या दुतर्फा बैठ्या घरांची—झोंपड्यांचीच म्हणा ना—! रांगची रांग लागलेली होती. जागेच्या अभावीं सर्व झोंपड्या अगदीं खेटून होत्या. बरं! त्या झोंपड्या तरी व्यवस्थित का? छे! नांव कशाला! भिंती कललेल्या, खिडक्यांची मोडतोड झालेली; पडझड झाल्यामुळें झांवळयानीं सांधवलेलीं छपरें, व त्यांवर वाढलेलें शेवाळ—अशी घरांची एकंदर स्थिती होती. मधूनच एखाद दुसरें दुमजली घर आपलें डोकें वर काढतानां दिसे. परंतु त्यांच्या छपरांचीही दशा मोडकळीस आलेलीच. छपरांच्या शाकारणीकरितां उपयोगांत आणलेल्या जुनाट झांवळया व झाडांच्या डहाळया आणि पावसामुळें त्यांवर उगवलेलें हिरवें शेवाळ हाच येथील बागबगीचा असावा असा शहरच्या बंगल्यांभोंवतीं फुललेला बाग पहाण्याची संवय असलेल्या डोळ्यानां भास झाला असता. कारण समाजांतील अगदीं निकृष्ट लोकांचें ठिकाण होतें तें.

खिडक्यांनां लावलेलीं पत्र्यांचीं झांपडें, कित्येक वर्षांत त्यांच्याकडे कोणी लक्ष न दिल्याचें सांगत होतीं. गंजलेल्या पत्र्यावर शेवाळामुळें एक तऱ्हेचा चिकट हिरवट रंग चढला होता. चंचल भित्र्या नजरेनें आसपास पहात हळूच डोकावणाऱ्या चोराप्रमाणें मूळ रंग क्वचित कोठें तरी डोकावत होता. रस्त्याच्या मधूनच मोठ्या पावसानें उकरलेल्या खड्ड्यांतून वेडींवाकडीं वळण

घेत ओहोळ वाहात होता. रस्त्याच्या आजूबाजूला ठिकठिकाणीं मोडक्या तोडक्या विटादगडांचे ढिगारे पडलेले होते. त्यांतून मधूनच गवत उगवलेलें होतें. वेळोवेळीं अनेक लोकांनीं या जागांवरून आपलीं घरें बांधण्याच्या केलेल्या अयशस्वी प्रयत्नांची साक्ष ते देत होते. अनेकांनीं प्रयत्न केले, परंतु कोणाचाच प्रयत्न सफल झालेला नव्हता. डोंगरावरून येणाऱ्या पाण्याच्या लोंढ्यानें हीं दगडाविटांचीं घरें तेव्हांच वाहून जात. डोंगरमाथ्यावर मात्र मोठमोठ्या इमारती, राजेशाही बंगले, आणि वनश्रीचें वैभव दाखविणारा बागबगीचा होता. मधूनच मंदिरांचे कळस व चर्चवरील क्रॉस आकाशाशीं स्पर्धा करतांना दृष्टीस पडत. आणि सूर्यप्रकाशांत तळपणारा त्यांचा सोनेरी मुलामा आकाशांतील सोनेरी ढगांना लाजवीत असे. विषमतेचें आणखी हृदयस्पर्शी दृश्य तें कोणचं हवं ?

पावसाळ्यांत पठारावरील शहरची सर्व घाण, तसेंच उन्हाळ्यांत तेथील सर्व धूळ आणि केरकचरा ह्या गांवावर आणून ओतला जात असे. अशाच एखाद्या उकिरड्याच्या ढिगाऱ्याबरोबर जणूं कोणी आडदांडपणानें ह्या घरांना डोंगरपठारावरून खालीं फेंकून दिलं असावं असा भास होई.

अर्धवट मोडकळीस आलेलीं, जमीनदोस्त होऊं घातलेलीं, मनुष्याचा आसरा म्हटलीं जाणारीं हीं घरें—ह्यानीं टेकडीपायथ्याचा व उतरणीचाही बराचसा भाग व्यापला होता. ऊनपाऊस खात धुळींत पडलेल्या सडक्या जुनाट लांकडाप्रमाणें बुरसट रंग त्यांवर चढला होता.

मूर्तिमंत दैन्य उभें असलेल्या ह्या रस्त्याच्या एका टोंकाला एक जुनं पुराणं दुमजली घर होतं. इतर घरांच्या रांगेपासून जरा तुटक असल्यानं इतर घरांनीं त्याला वाळीत टाकल्यासारखं वाटे. घर रस्त्याच्या शेवटीं तसेंच डोंगराच्या पायथ्याला लागून होतं. व जरा प्रशस्तही असल्यानं ह्या घराला गांवानं वाळीत टाकलं, कीं डोंगरावरील शहरानं पायाच्या ठोकरीसरशीं त्याला उडवून दिलं असा प्रश्न पडे. ह्या घरापासून पुढं

अर्धा मैलपर्यंत–नदीकिनाऱ्यापर्यंत शेतं पसरलेलीं होतीं. घर मोठं व अतिशय जुनं. त्यामुळें इतर घरांपेक्षां ह्यावर एक तऱ्हेची जास्तच भकभकीत कळा आलेली होती. घराच्या सर्व भिंती झुकलेल्या असून एकाही खिडकीला धड आकार राहिला नव्हता. खिडक्यांच्या–चुकून माकून टिकून राहिलेल्या तावदानांना सांचलेल्या पाण्याप्रमाणें घाणेरडा हिरवा रंग चढलेला होता.

दोन खिडक्यांमधील भिंत–जागजागीं चुना निखळून गेला असल्यानं चित्रविचित्र दिसे. चित्रकलेच्या सहाय्यानं भूतकालचा इतिहासच येथें कोणी कोरला होता कीं काय कोण जाणे! ईजिप्त, बॅबिलोन, वगैरे देशांशीं या गांवचा जुना संबंध होता असं सिद्ध करण्यासाठीं एखाद्या इतिहास-संशोधकानं ह्या घरापाशीं कित्येक वर्षं घालविलीं असं कोणी सांगितलं असतं तरी त्यावर सहज विश्वास बसला असता. घराचं छप्पर रस्त्याच्या बाजूला झुकलं असून त्याची अवस्था जास्तच करुण होती. तें जवळ जवळ रस्त्याला टेंकलं होतं. काळाचा शेवटचा हात केव्हां एकदा फिरतो ह्याची जणूं वाट पहाणारं पिकलं पान झालं होतं तें. तें गळून रस्त्यावरच्या ढिगाऱ्यांत केव्हां सामील होणार ह्याचा नेम उरला नव्हता. पण ह्या घराचं एक वैशिष्ट्य होतं. तें म्हणजे घरापुढील आवार. त्यामुळें घर पडलंच तरी रस्त्यावरील रहदारीला फारसा अडथळा येण्यासारखा नव्हता.

घरापुढचा दरवाजा सताड उघडा होता. त्याचं एक दार निखळून रस्त्यांत आडवं पडलं होतं. दाराच्या फळकुटांच्या फटींतून गवत वर आलेलं असून सबंध आवारही गवतानं आच्छादलेलं होतं. आवाराच्या एका टोंकाला दूर अंतरावर टिनच्या पत्र्यांची एक लहानशी गोठेवजा शेड असून तिच्यावर धुरकट रंग चढलेला होता. ह्या घराचा व शेडचा मालक पेनूनकाफ हा एक व्यापारी होता. अर्थात असल्या भिकार जागेंत तो राहणें शक्यच नव्हतें. सहाजिक घर उजाडच पडलं होतं. पण ह्या शेडला मात्र

एक भाडेकरू मिळाला असून तो तिचा उपयोग भाड्याच्या धर्मशाळेसारखा करी. ह्या भाडेकरूचं नांव आरिस्टाइड फोमिच काल्डा. हा एकेकाळीं झारच्या घोडदळांत लहानसा अधिकारी होता. म्हणून लोक त्याला कॅप्टन म्हणूनच ओळखत.

ह्या धर्मशाळेची आंतली जागा एखाद्या लांबलचक सोप्या प्रमाणें होती. आंत बहुतेक काळोखच होता. भिंतींतील चार खिडकीवजा भोंकं आणि झडपं मोडून पडलेल्या दरवाजाची चौकट ह्यांतून काय उजेड येईल तेवढाच. तसं म्हटलं तर दरवाजा तसा बराच प्रशस्त होता. चुना निखळलेल्या त्या विटांच्या भिंतीवर धुराचा काळा रंग चढलेला होता. आढ्याच्या छतावरही धुराच्या व्हार्निशचा हात दिलेला होता जणूं.

शेडच्या मध्यभागीं एक मोठी आगटी असून सभोंवार भिंतीला लागून मारलेल्या पलंगडीवजा लांकडी बांकांवरून जुन्यापुराण्या फटकुरांचीं गाठोडीं पसरलेलीं होतीं. धर्मशाळेंत कायमचं वास्तव्य करणाऱ्या लोकांचा तो संसार होता. भिंती धुरानं काळवंडलेल्या, जमीन ओलानं दमट झालेली व पलंगड्यांचे लांकडी तक्ते लक्तरांनीं झांकलेले—घामानें घामटलेले-असा अत्यंत किळसवाणा देखावा होता तो.

मालकाचा—मुख्य भाडेकरूचा—म्हणजे आरिस्टाइडचा बिछाना शेडच्या मध्यभागीं आगटीनजीक असून त्याच्या पलंगडीच्या आजूबाजूंचीं बांकं ही मोठी मानाची जागा समजली जाई. त्याची कृपादृष्टी असलेल्यानां किंवा त्याच्या खास मित्रमंडळीलाच त्या जागांवरून झोपण्याचं भाग्य लाभे. शेडच्या बाहेर दरवाज्यापाशींच एक खुर्चीसारखी विटांची बैठक होती. आरिस्टाइडनें ती बनविण्यांत आपली सर्व कल्पकता ओतली होती. दिवसाचा बराचसा काळ ह्या खुर्चीवर बसूनच तो घालवीत असे. बाकी वेळांत तो शेजारच्या कलालाच्या दुकानांत सांपडावयाचा. कलालाचं नांव होतं जेगर वाविलाफ. गुत्त्याबरोबर खाणावळीचाही थोडा धंदा चाले त्याचा. कॅप्टनसाहेब तेथेंच जेवीत असत.

आरिस्टाइडचा जीवनवृत्तांत मोठा रम्य होता. भाड्यानें धर्मशाळा चालविण्याची कल्पना डोक्यांत येण्यापूर्वीं, नोकरचाकर पुरविण्याचा ठेका होता स्वारीचा. ठेकेदारीच्या पूर्वीं छापखानावाला आणि त्याच्याही पूर्वीं म्हणजे लढाईवर जाण्यापूर्वीं–त्याच्याच शब्दांत बोलावयाचें तर–त्यानें बरेच चांगले दिवस पाहिले होते. तो एक रंगेल कलावंत होता त्याकाळीं.

आधींच देवीच्या वणांनीं चटईसारखा खडबडीत दिसणारा चेहरा. त्यांत दारूमुळें आलेल्या फुगीरपणाची भर पडलेली. वर मधूनमधून दिसणारे तांबूस तकतकीत डाग, कैंसाळ भुरकी दाढी, रुंद भरींव छाती, असा पन्नाशींचा गृहस्थ होता तो. त्याचे डोळे मोठे व घारे असून त्यांत निष्ठुर हास्य चकाकत असे. त्याचा आवाज गंभीर असून दांतांत नेहमीं एक जर्मन पाइप दाबलेली असे. तो रागावला कीं त्याच्या त्या लाल फेंदारलेल्या नाकपुड्या जास्तच विस्तार पावत, ओंठ थरथरत व त्यांमधून लांडग्याप्रमाणं पिंवळ्या दांताच्या दोन रांगा बाहेर येतांना दिसत. बांकदार पायांचा हा आजानुबाहू शिपाईगडी नेहमीं आपल्या फाटक्या लष्करी पोशाकांतच असे. जुनाट मळका ओव्हरकोट, किटलेली लाल टोपी, आणि गुडघ्यापर्यंत येणारे बूट हा कायम पोशाख होता त्याचा. सकाळच्या प्रहरीं त्याच्या वागण्यांत दारूची मादकता आढळे. संध्याकाळीं मात्र त्याच्यासारखा रंगेल गमती प्राणी दुसरा नाहीं. झिंगलेला असा तो कधींच नसावयाचा. त्यानें कितीही व्होडका ढोंसली तरी त्याच्या आनंदी वृत्तीवर यत्किंचितही परिणाम व्हावयाचा नाहीं त्याचा.

कधीं कधीं संध्याकाळ तो आपल्या विटांच्या खुर्चीवर बसून काढी. अशा वेळीं (त्याचं) मुख्य काम म्हणजे आलेल्या पाव्हण्यांची पूसतपास करणं.

दारुडा म्हणून किंवा इतर कांहींही कारणानं घरांतून काढून दिलेल्या माणसांचं निवासस्थान म्हणजे त्याची धर्मशाळा. असा एखादा दुःखीकष्टी जीव येतांना दिसला कीं ‘ कोण रे तूं ? ’ असा आरिस्टाइडचा ठरलेला प्रश्न होता. त्या प्रश्नाचं उत्तर मिळालं तरी तो कोणी चोराचिलटा लफंग्या

नाहीं ना ह्याची तो खात्री करून घेई. हुडसून खडसून चौकशी करावयाची असा त्याचा शिरस्ता होता. हें सर्व झालं कीं मग भाड्याचा प्रश्न.

" ठीक आहे. पहिल्या रात्रीचे दोन कोपेक.[1] एक आठवड्याचे दहा. महिन्याचे वीस पडतील. जा आपली जागा पाहून घे. पण दुसऱ्याची आधींच पकडलेली जागा घेऊं नकोस हो. येथें रहाणाऱ्या लोकांचा मोठा कटाक्ष आहे त्याबद्दल. "

" चहा, जेवण वगैरे कांहीं मिळेल का येथें ? तुमचंच होटल असतं तर बरं झालं असतं ! " नवखा मनुष्य एकादवेळ विचारी.

" छे रे बाबा ! वरतीं आढं आणि खालीं चार भिंतींचा आडोसा एवढंच माझं भांडवल. मीं फक्त भाड्यानं राहण्याची सोय ठेवली आहे. पण त्याच्याचबद्दल महिना पांच रूबल[2] द्यावे लागतात ना मला त्या बदमाष जूडास पेतूनिकाफला. "

" काय ? पांच रूबल महिन्याचे ? "

" हां ! हां ! या एवढयाशा टीचभर घरट्यासाठीं पांच रूबल बरं कां ! " आरिस्टाइड अगदीं व्यापारी टेसांत सांगे. " येथें राहणाऱ्या लोकांना रोज जेवण्याची संवय नाहीं. पण तुझें चालतच नसेल तर व्होडकाचं दुकान आहे समोर. पण मी म्हणतों तुझ्यासारख्याला हे चोचले हवेत कशाला रे ? शक्य तितक्या लवकर अगदीं टाकून दे ही दुष्ट संवय ! रोजच्या रोज जेवायला तूं मोठा उमरावच लागून गेलास कीं नाहीं ! बरें उमराव राहूं द्या. पण तूं सभ्य गृहस्थ किंवा मध्यमवर्गीय तरी आहेस ? तूं स्वतःलाच कां नाहीं खात त्यापेक्षां ? तें जास्त चांगलं. "

आरिस्टाइडचं असं वक्तृत्व नेहमींच ऐकायला मिळे तेथल्या मंडळीला. बोलतांना आव तर आणी मोठा गंभीरतेचा. पण डोळ्यांत

[1] कोपेक–तांब्याचें रशियन नाणें. किंमत सुमारें दोन पैसे.

[2] रूबल–सोन्याचें रशियन नाणें. किंमत सुमारें ३। रुपये.

हमखास चेष्टेचं हंसू असे त्याच्या. आणि आपल्या मंडळीची विचारपूसही तो मोठ्या प्रेमानं करी. त्यामुळें गांवांतील सगळ्या भणंगांचा मोठा दोस्त होता तो.

कधीं कधीं एखादा जुना रहिवासी आरिस्टाइडला भेटायला येई. परंतु त्याचीं पूर्वींचीं लक्तरं व निराश चेहरा ह्याऐवजीं जरा नीटनेटके कपडे व हंसरं मुख असे त्याचं. ह्यामुळें त्याला ओळखणंही कठीण.

" रामराम, कॅप्टन साहेब ! कसं काय चाललं आहे ? "

" ठीक आहे. पण—कां--काय काम आहे आपलं ? "

" मला ओळखलं नाहीं ? "

" नाहीं बुवा ! "

" गेल्या हिंवाळ्यांतली गोष्ट. पोलीसचा छापा आला होता. आणि तिघांना पकडून नेलं त्यांनीं येथून. आठवतं ? त्यावेळीं मी नव्हतों का इथें महिनाभर ? "

" भल्या माणसा ! माझ्या ह्या छत्राखालीं पोलीस नेहमींच येतात विसाव्याला. "

" आणि शाबास खरी हं तुमची पण ! तुम्हीं कसं पण त्या पोलीस अधिकाऱ्याला खडसावलं ? कां ? कांहींच नाहीं आठवत ? "

" बरं पण जाऊं द्यात त्या जुन्या गोष्टी. आतां तुमचं काय काम करूं तें तर सांगा ! "

" तुमचे उपकार कसे फेडावे म्हणून प्रश्न पडला आहे मला कॅप्टन-साहेब. इथें असतांना तुम्हीं किती पण माझ्यासाठीं—"

" दुसऱ्याचा उपकार कोणी स्मरत असला तर जरूर उत्तेजन दिलं पाहिजे त्याला त्या कामीं. नाहीं का ? कारण क्वचितच भेटतात अशीं माणसं ! मला तुमचं नांव गांव आठवत नाहीं हे खरं. पण तुम्हाला खरोखर सज्जन

म्हटलं पाहिजे. चला शेजारच्या दुकानांत जाऊं या. तुमचं भाग्य उदयाला आलं म्हणून जरा दोन ग्लास व्होडका घेऊन आनंद करूं. ”

“ कमाल आहे बुवा ! अगदीं आहांत तसे गमती आहांत अजून. बदल म्हणून कसा तो नाहींच मुळीं. ”

“ तुमच्यासारख्या दुर्दैवी लोकांत रहायचं, मग दुसरं काय करणार !” असं म्हणत दोघेही गुत्त्यांत जावयाचे. बहुधा हा जुना दोस्त मग झिंगतच परतायचा. दुसऱ्या दिवशींही फिरून खाण्यापिण्याचा रंग उडायचाच. एखादे दिवशीं आपल्या जवळचा सर्व पैसा संपलेला त्या दोस्ताला आढळून येई.

“ पाहिलंत कॅप्टन. मी फिरून आपला कफल्लक. तुमच्या भणंगाच्या पंक्तीला आलों पुन्हां. काय बरं करावं आतां ? ”

“ अभिमान वाटण्यासारखी स्थिती नाहीं खरी ! पण नशिबीं आल्यावर रडण्यांत तरी काय अर्थ ? शांतपणें परिस्थितीला तोंड दिलं पाहिजे. गड्या नुसत्या पश्चात्तापाची हळहळ काय कामाची ? तत्वज्ञान आणि बुद्धिवाद आयुष्याची मजा घालवितात उगाच. तत्वज्ञान नाहीं तरी निरुपयोगीच. पण त्यांतही नशा पुरती उतरली देखील नाहीं तोंच स्मशानवैराग्याचा आव आणणें हा अगदींच मूर्खपणा. दारूच्या मजलसीनंतरची उदासीनता झाडून टाकायला खरं म्हटलं तर व्होडकाचा पेग चढवणं हाच उपाय. तें सोडून पश्चात्तापानं स्वतःचीं मनगटं चावीत बसण्यांत अर्थ काय ! उगाच दांत मात्र पडायचे. आणि मग कोणी ‘ दांत पाडीन ’ म्हणून आला तर त्याची मात्र नसती फजिती. हें बघ. हे घे वीस कोपेक. आणि जा पाहूं प्रथम थोडी व्होडका, डाळ, रोटी वगैरे घेऊन ये. आपलं पिणं संपलं कीं मग सर्व गोष्टींचा नीट सावकाश विचार करूं. ”

दोनतीन दिवसांतच सर्व परिस्थिती उघड होई. पहिले दिवशीं पाव्हण्याकडून जे कांहीं चारपांच रूबल कॅप्टनच्या खिशांत गेले असतील ते सर्व खर्च झालेले आढळत.

"हं. आतां आपण सीमा गांठली खरी. आणि ज्याअर्थी आपण आपली मिळकत ताडींत ओतली त्याअर्थी आतां सज्जन बनायला कांहीं हरकत नाहीं. 'पाप केल्याशिवाय पश्चात्ताप नाहीं व पश्चात्ताप नाहीं त्याला मोक्ष नाहीं.' असं वचन आहे ना कांहींसं ! पहिली अट तर आपण पार पाडलीच. परंतु पश्चात्तापानं कांहीं फायदा होईलसं नाहीं वाटत मला. तेव्हां एकदम मोक्षालाच हात घालूं या. जमलं तर उद्यांपासून बंदरावर जाऊन कामाला लाग. आणि स्वतःचा विश्वास नसला तर कंट्राक्टरला सांग पैसे अडकवून ठेवायला. नाहींतर माझ्याजवळ दे आणून. थोडेबहुत पैसे जमले म्हणजे प्रथम साधारण चांगलीशी तुमान घेईन तुला. जरा कामकऱ्यासारखे तरी नीट कपडे असले म्हणजे अजूनही कांहींतरी नशीब काढतां येईल तुला ! कळलं का अकलेच्या कांद्या ! मग नीघ आतां येथून."

वरीलप्रमाणें उपदेशाचे चार शब्द सांगून क्राल्डा मित्राला कामाला पाठवीत.

क्राल्डाच्या व्याख्यानावर स्वतःशींच हंसत व त्याची तारीफ करीत नवा पांथस्थ बोटीच्या धक्यावर कामाला जाई. क्राल्डाच्या भाषणांतील खांचाखोंचा त्याला कळत नसत खऱ्या, परंतु डोळ्यांतील विनोदी चमक, आनंदी वृत्तीची पडणारी छाप व वेळीअवेळीं होणारी मदत ह्यामुळें सर्वजण त्याला आपला मित्र समजत व त्याप्रमाणें मानही देत. आणि क्राल्डाच्या कडक शिस्तीखालीं एकदोन महिने राहिल्यावर अशा मनुष्याजवळ खरोखरीच थोडाबहुत पैसा जमे. परिस्थिति जराशी सुधारे.

"चला, तुझी कोट पाटलोण झाली एकदांची. अर्धे काम झालं. हंसतोस काय ? फार महत्वाची बाब आहे ही बाबा. माझ्याजवळ जोंपर्यंत चांगले कपडे होते तोंपर्यंत सभ्यगृहस्थ म्हणून शहरांत रहात असें. कपडे फाटू लागले मात्र, माणुसकीला पारखा होऊन येथें यावें लागलें. तें जाऊं द्या म्हणा, पण बाबा रे, ह्या जगांत बाह्य देखाव्यावरून लोक परीक्षा करीत असतात. मग अंदरकी बात

कांहींका असेना. इतका मूर्खपणा भरला आहे जगांत, बरं! पण एक विडी तर ओढ. आणि इच्छा असली तर माझं अर्धं कर्ज फेडून आनदांनं चालू लाग. 'प्रयत्नाअंतीं परमेश्वर'. लक्षांत ठेव!" असें म्हणून आपल्या नवोत्साही मित्राला बारकाईनें न्याहाळीत काल्डा निरोप देई.

"कर्ज किती आहे?" गोंधळून तो मनुष्य विचारी.

"एक रूबल सतरा कोपेक. ह्यापैकीं पाहिजे तर रूबल दे, नाहीं तर सतरा कोपेक दे. आणि तुझ्याजवळ आतांपेक्षां ज्यास्त पैसे जमतील तेव्हां बाकीचे दे, मग ते श्रमानं मिळव नाहींतर चोरी करून. मी वाट पाहीन तोंपर्यंत."

"ह्याला म्हणतात अन्तःकरण! खरंच तुमच्या सारखा चांगला मनुष्य मिळणं कठीण. तुमच्यावर असे कठीण दिवस यावे हा खरोखरीच नशिबाचा खेळ आहे. तुमच्या चालत्या काळांत तुमचा कॅप्टनचा रुबाब किती पण खुलून दिसला असेल." गहिंवरून तो मनुष्य म्हणे.

मोठ्या अगडबंब शब्दांत बोलायचं ही कॅप्टनची मोठी लकब.

"माझा रुबाब आणि योग्यता ह्याचा अर्थ काय बाबा? कोणाची योग्यता किती आहे ह्याचं कांहीं प्रमाण ठरलं आहे कीं काय? स्वत:ची खरी योग्यता तरी कुणाला कळते? कोणाच्या तरी जोखडाखालीं आपली मान असावी अशीच सर्वांची वृत्ती. तसं पाहिलं तर हा जूडास पेतूनिकाफ. काळं पाणी हीच बेट्याची योग्यता. पण पहा कसा मजेनं गाड्याघोडे उडवीत आहे तो. इथं आतां तो फॅक्टरी पण उघडणार आहे लवकरच. आमच्या मास्तरांना खरं म्हटलं तर सुशील बायको, अर्धा एक डझन पोरं अशी सुखाची स्थिती असायला हवी. पण त्या ऐवजीं वाविलाफच्या ह्या गुत्त्यांत तर्र होऊन लोळत पडावयाचं त्यांच्या नशीबीं आहे. आतां तुझंच पहा. तूं एखादा उमदा सैनिक अधिकारी व्हायला हवं होतंस. तुझ्यांत सहनशक्ति आहे, अक्कल आहे, शिस्त कळते, अगदीं फौजी गुण. पण एखादी बालूची

किंवा हमालाची नोकरी मिळविण्यासाठीं तूं जात आहेस. तेव्हां जग हें असं आहे. जगाच्या व्यवहारांत आपण पत्त्याप्रमाणें पिसले जातों. क्वचितच आपल्या योग्यतेनुरूप आपल्याला राहतां येतं. परंतु चुकून कधीं तशी स्थिती लाभलीच तरी किती अल्पकाळ टिकते ती. लगेच डाव संपून फिरून पत्त्यांची पिसणी ठेवलेलीच. ”

निरोपाची अशीं बोलणीं बोलत कित्येक वेळां दोघे गुत्त्यांत जाऊन पोहोंचत. झालं. पिण्याची उजळणी व्हावयाची. आणि बिचारा पाव्हणा खिसा रिता करून मोकळा झाला कीं मग काल्डाचा खिसा खालीं व्हायचा. दोघेही जवळच्या पैशानीं हात धूत अखेर !

अशा प्रकारचा तेथला व्यवहार असला तरी एकमेकांबद्दल गैरसमजुतीचें कलुषित वातावरण नव्हतें तेथें. काल्डाच्या बोलण्यांत आलेले शाळा-मास्तर असल्याच मित्रांपैकीं होते. कितीदां तरी ह्यांनीं तेथून जायचं ठरविलं असेल. आतां पुढें नीट वागावयाचें असा दृढनिश्चय करून त्यांनीं कितीदां तरी पैसे जमविले असतील. पण व्यर्थ. निरोप घ्यायची वेळ आली कीं गेलं. उपड्या घड्यावर पाणी. फिरून त्यांच्या पहिल्या कार्यक्रमाला सुरवात व्हायची. बौद्धिकदृष्ट्या मास्तर व कॅप्टन एकाच दर्जाचे होते. म्हणूनच कदाचित एकदां ह्या धर्मशाळेंत शिरल्यावर बाहेर पडणें त्यांना अशक्य झालं असावं.

इतक्या सर्व मंडळींत कॅप्टन फक्त मास्तराशीं वाद करीत. आपला दृष्टीकोन मास्तरांना कळेल एवढी त्यांची खात्री होती. ह्या एका गुणामुळें काल्डाला मास्तरांबद्दल आदर व आपलेपणा वाटे. त्यामुळें एखादी स्वतंत्र खोली घेऊन राहण्याच्या उद्देशानें मास्तर पैसे मिळवून जायला निघत त्यावेळीं ते असे कांहीं उदास, हृदयस्पर्शी भाषण करीत कीं बाहेर जाण्याऐवजीं दोघेही सरळ गुत्याकडे वळत. आणि आपला पूर्वक्रम सुरू करीत. आपण काय करतों आहों—याची काल्डाला बहुधा जाणीव असावी. आणि मास्तरांना धर्मशाळा सोडून जाण्याची अतोनात इच्छा असून देखील त्यांचा बेत

कधींच पुरा झाला नाहीं एवढं मात्र खरं. बरं ह्यांत काल्डाला तरी दोष कसा द्यावा ? चांगल्या घराण्यांत जन्म झालेला, उच्च शिक्षण मिळालेलं—त्यांच्या रोजच्या संभाषणांतही त्या शिक्षणाचं तेज झळकायचं—ग्रहदशेच्या निरनिराळ्या फेऱ्यांतून जात असतांना उत्पन्न झालेली वादविवादाची हौस. तेव्हां आपल्या दोस्ताने समभावनेच्या मास्तरांनीं—आपणापासून दूर जाऊं नये अशी त्यांची इच्छा असणं अगदीं मनुष्य स्वभावाला धरून नाहीं कां ? केव्हांही झालं तरी प्रथम आपण आपला विचार—सुख पाहतों. मास्तर एकेकाळीं व्होल्गा प्रांतातील एका शहरीं ट्रेनिंगस्कूलवर शिक्षक होते. परंतु कांहीं भानगडीमुळें त्यांची तेथून हकालपट्टी झाली होती. नंतर त्यांनीं एके ठिकाणीं कारकूनी पत्करली. पण थोडया दिवसांनीं तेथेंही खो बसला. नंतर मास्तर एका खाजगी लायब्ररीचे लायब्रेरीयन झाले; दुसरेही पुष्कळ उद्योग केले, ॲटर्नीचीही परीक्षा दिली. पण कुठेंच जम बसेना. तेव्हां स्वारीनें नशा करायला सुरवात केली. त्यांतच कॅप्टनची भेट होऊन त्याच्याच धर्मशाळेंत स्थायी झाले. डोक्यावर टक्कल, लांब धरधरीत व टोंकदार नाक, दुबळा लांबट चेहरा, जराशी दाढी वाढविलेली, चेहऱ्यावर हमेश अस्वस्थता, खोल गेलेले उदास डोळे—मास्तरांना पाहिलं कीं कोणालाही त्यांच्याबद्दल कींवच वाटावी असा एकंदर त्यांचा चेहरा व अंगलट होती. पोटाचं साधन—ताडी पिण्याचं म्हणा हवं तर—म्हणून वर्तमानपत्राच्या रिपोर्टरचं ते काम करीत. ह्या धंद्यांत वेळ प्रसंगीं त्यांना आठवडयाला पंधरा वीस रूबल देखील मिळायचे. रक्कम काल्डाजवळ जमा करीत. मास्तरांनीं म्हणावं,

"बस्स ! आतां शेवटचं. आणखी एक आठवडा कसून काम करणार. म्हणजे कपडे वगैरे नीटनेटके करण्यापुरेसे पैसे मिळतील. 'नी मग नमस्कार. अगदीं कायमचा रामराम' बरं कां !"

"फारच छान विचार आहे. माझा अगदीं पूर्ण पाठिंबा. सबंध आठवडयांत एक ग्लाससुद्धां देणार नाहीं." कॅप्टननें अगदीं निश्चयानें म्हणावें,

"वाहवा! मग तर फारच उत्तम. मी तर म्हणतों ग्लास काय पण एक थेंबसुद्धां मना केला पाहिजे तुम्हीं."

मास्तरांच्या ह्या शब्दांत कमालीचें आर्जव भरलें असल्याचा कॅप्टनला भास होई. आणि ते आणखीच निर्धारानें म्हणत, "ठीक आहे. तुम्हीं कितीही मागितली तरी मी एक थेंबसुद्धां व्होडका घेऊं देणार नाहीं तुम्हाला."

"बरं झालं! सुटलों एकदाचा!" असा मास्तर एक सुस्कारा टाकीत व आपल्या कामाला निघून जात. एकदोन दिवस कसेतरी जात. श्रमानं मास्तर अगदीं थकून जात. उमेद नाहिंशी होई. घशाला कोरड पडे. मास्तर चोरट्या पण आशाळभूत नजरेनें काल्डाकडे पहात. आपल्या मित्राचं हृदय कधीं विरघळतं इकडे मास्तर डोळे लावून बसत. तर कॅप्टन अगदीं करडें कंठोर स्वरूप धारण करी.

"दुबळा स्वभाव असणं कसं लांछनास्पद आहे, दारूपिण्यानं मनुष्य कसा पशू बनतो," वगैरे विषयांवर त्यांचं व्याख्यान सुरू होई. काल्डा स्वतःचा शब्द व निश्चय उत्तम तऱ्हेनें पार पाडीत. पण तेथें रहाणारे लोक कसले वस्ताद. कशावर म्हणून त्यांचा विश्वासच नाहीं! कॅप्टनचं प्रवचन चालू झालं कीं एकमेकांकडे पाहून डोळे मिचकावीत आपसांत म्हणत,

"कां सांगितलं नव्हतं मी काल्डा पक्का धूर्त आहे. आपल्यावर कसलाही ठपका घ्यायला तयार नाहीं तो. पण तुम्हाला माझं म्हणणं पटेना. पण आतां पटलाका दाखला?"

"बाबारे, कांहीं झालं तरी तो शिपाईगडी. माघार घ्यायची व्यवस्था केल्याशिवाय कांहीं हल्ला चढवायचा नाहीं."

एखाद्या कोंपऱ्यांत मास्तर आपल्या मित्राला गांठीत. आपल्या सुकलेल्या ओंठावरून जीभ फिरवीत मास्तर काल्डाच्या शर्टची बाही लहान मुलाप्रमाणें पकडून ठेवीत. त्यांच्या नजरेंत इतकी करुणा सांठविलेली असे कीं त्याचं नीट वर्णनच करतां येणं कठीण. पण मानवी हृदयाला त्या नजरेनें पाझर फुटलाच पाहिजे.

"काय ? नाहीं राहवत ?" कॅप्टन गंभीरपणें विचारीत. न बोलतां उत्तरादाखल मास्तर फक्त मान हालवीत. डोकं छातीवर कलवीत. ह्या वेळीं त्यांचं सबंध दुबळ शरीर कांपत असे.

"आणखी एक दिवस कळ सोसा. कदाचित तसं केल्यानं स्वतःवर जय मिळवालही."

मास्तरांची मान नकारार्थी हाले. त्यांनीं सोडलेला सुस्कारा त्यांची दुर्बलता व्यक्त करी. त्या विषासाठीं आपल्या मित्राचं शरीर जळत असलेलं कॅप्टनला कळे. खिशांतून पैसे बाहेर निघत.

"नशीबाबरोबर कोणी वाद घातला आहे ?" स्वतःचं समाधानं व समर्थन करीत काल्डा मास्तरना पैसे देत.

परंतु कधीं कधीं सबंध आठवडा मास्तर स्वतःला आवरीत. अशा वेळीं ह्या दोन मित्रांची अखेरची भेट हृदयाला हालवून सोडी. परंतु बहुधा अशा प्रसंगाची अखेर वाविलाफच्या गुत्त्यांतच व्हावयाची.

मास्तर आपले पैसे ताडींतच उधळीत असं नाहीं. अर्धे पैसे तरी खेड्यांतल्या मुलांवर खर्च होत. गरीबींत मुलांची रेलचेल नेहमींच आढळून येते. तीच गत ह्या खेड्याची. उघडी, नागडी, मातीनं माखलेलीं, भुकेनं कावलेलीं, अशा मुलांचा रस्त्यावर दिवसरात्र गोंगाट चालायचा. कवि मुलांना फुलांची उपमा देतात, ती जर खरी असली तर ह्या मुलांना अकालीं गळलेलीं फुलं म्हणावं लागलं असतं. नापीक जमिनीवर लागवड झाल्याचा परिणाम असेल कदाचित हा.

ह्या सर्व मुलांना गोळा करून नदीकिनारीं सहल करावयास अगर वनभोजनाला जायचं हा मास्तरांचा दुसरा एक व्यवसाय होता. अशा प्रसंगीं पावरोटी, अंडीं, भाजी, फळं, आक्रोड, बदाम, पिस्ते, वगैरे विकत घेण्यांत बराचसा पैसा खर्च होई. व असे प्रसंगही कांहीं

विरळा नव्हते. खाण्यापिण्याची चंगळ असल्यावर मुलांचा उत्साह काय विचारावा. चट्टामट्टा झाल्यावर मुलांच्या हंसण्या खिदळण्यानं तेथील वातावरण दुमदुमून जायचं. दारुबाज म्हणून नांवाजलेली ती किडकिडीत उंच व्यक्तिही ह्यावेळीं लहान होत असे. आपल्या बरोबर कोणी मोठं माणूस आहे ह्याची मुलांना आठवणही राहत नसे. अगदीं सहज नुसतें 'फिलीप' म्हणून मास्तरांना मुलं संबोधीत. सर्व साधारणपणें मोठ्यांच्या वांटणीला येणारं 'काका' हें उपपदसुद्धां कधीं मुलांनीं वापरलं नाहीं. त्याच्या पाठीवर चढायचं. टक्कल पडलेल्या डोक्यावर चापट्या द्यायच्या, त्याचं नाक ओढायचं, हे मुलांचे आवडते खेळ. मास्तरानांहीं त्यांत मजा वाटायची. त्यांनीं कधीं तक्रार केली नाहीं कीं, कधीं मुलांना दाटलं नाहीं. ते बोलत फारच थोडं, व तेंही अगदी दबत, हलक्या आवाजांत. आपल्या शब्दानं तीं मुलं बिघडतील, दुखावतील अशीच जणू मास्तरांना भीति वाटे. खेळगडी किंवा खेळणं बनून मास्तर मुलांच्या संगतींत तासचे तास घालवीत. त्यांच्या उत्साही चेहऱ्यावर मास्तरांची खिन्न दृष्टी खिळे. मास्तर आपल्याच विचारांत गुंगत व त्या विचारांच्या भरांतच पायांना गती मिळून भटकत भटकत नकळत नेहमींच्या सरावानं नेमके गुत्त्यांत येत. विचारांच्या अति-रेकानं डोकं भणाणलं असल्यानं अगदीं शुद्ध जाईपर्यंत व्होडका झोंकीत.

× × × ×

जवळच्या शहरांतून रिपोर्टरचं काम संपवून परत येतांना मास्तर बहुतेक दररोज न विसरतां एखादं वर्तमानपत्र विकत आणीत. वर्तमानपत्र येतांच धर्मशाळेंतीलच नव्हे तर, आसपासचीही मंडळी तेथें जमत. मास्तर येतांना दिसले कीं पुरे. सर्वांना लगेच वर्दी पोहोंचत असे. कोणी तर्र झालेले, कोणाच्या डोळ्यांवर झांपड, तर कोणी दारुचा विटाळ माननारे, अशी मंडळींत बहुविधता असली तरी गलिच्छता व दुःख सर्वांच्या सारखेंच वांट्याला आलेलें दिसत होतें. वडिलार्जित संपत्तीच होती ती त्या खेड्याची जणू.

सर्वांच्या आधीं यायचा अलेक्सी मॅक्झिमोविच सिम्टझाफ. एखाद्या पिंपाप्रमाणें वाटोळी होती स्वारी. एककाळीं जंगल सर्व्हेअर होता तो. पण आतां आगपेटया, विडया, लिंबू, शाई, बुटपॉलिश वगैरेची पाटी घेऊन हिंडत असे. एक जुना कोट, कोणी तरी दिलेली फाटकी हॅट, हा त्याचा पोशाख. ती हॅट इतकी मोठी होती कीं त्याचं सबंध कपाळ झांकलं जाई. लाल शेंडा असलेलं त्याचं तें आखुड नाक, जाड ओंठ, उभ्या जगावर गैरविश्वास दर्शविणारे डोळे, सार्टीच्या घरांत असूनही हाडापेरानं मजबूत व शरीराप्रमाणेंच भसाडा आवाज, अशी मूर्ती होती ती. त्याचं टोपण नांव "कूबर" म्हणजे 'भोंवरा'. त्याच्या एकंदर गरगरीत वाटोळ्या स्वरूपाला टोपण नांव साजूनच दिसे.

मास्तरांची चाहुल लागतांच पुढें येणारी दुसरी व्यक्ति म्हणजे ल्युका ॲन्टोनिविच मार्टिनाफ, ऊर्फ कोनेत्झ. लोक बहुधा ह्या दुसऱ्या नांवानेंच त्याला ओळखीत. पूर्वी कोनेत्झ जेल इन्स्पेक्टर होता. परंतु सध्यां त्याचा धंदा म्हणजे "तीन पानांचा खेळ" किंवा असलीच कांहीतरी जादूची हातचलाखी. अर्थात पोलीसना कोनेत्झच्या बुद्धिकौशल्याची कदर नव्हती, ही गोष्ट निराळी ! मास्तरांचें नांव निघतांच ही काळी, सुतक्या चेहऱ्याची मूर्ती चूपचाप आपला कोंपरा सोडून पुढें यायची व मास्तराच्या जवळच गवतावर बैठक मारायची. त्याच्या शरिरावर नेहमीं माराचे वळ असत. काळे-भोर डोळे नेहमीं पाण्यानं भरलेले असायचे. स्वारीची पहिली नजर अचाक व्होडकावर जायची; व उगाच विचारल्यासारखें करून सरळ बाटलीला हात जावयाचा त्याचा.

तिसरी प्रमुख व्यक्ति म्हणजे पाव्हेल सोनत्सेफ. तिशीच्या वयांतच ह्याला क्षयानें पछाडलें होतें. एकदां मारामारींत डावी बरगडी निखळली होती. त्याच्या पिवळ्या तरतरीत चेहऱ्यावर अनेकदां लबाडीचें निदर्शक असें दुष्ट हंसू उमटे. त्यामुळें चेहऱ्याला एक प्रकारची मुरड पडे. ओंठामधून काळे

किडलेले दांत स्पष्ट दिसत. तर, त्या हाडकुळ्या खांद्यावरची लकतारें खुंटीवर टांगल्याप्रमाणें भासत. केरसुण्या व एका विशिष्ट गवताचे स्वतः तयार केलेले ब्रश विकून तो स्वतःचा निर्वाह करी. कपडे साफ करण्याकडे ह्या ब्रशांचा चांगला उपयोग होत असे. लोकांनीं त्याचं नांव ठेवलं होतं " स्क्रॅप."

ह्याखेरीज दुसरी महत्वाची व्यक्ति म्हणजे "एकाक्ष". ह्याचं नांव किसोलीकॉफ. हा अगदींच हाडकुळा व भरपूर उंच होता. ह्या माणसाचा आगा-पिछा कोणालाच माहीत नव्हता. ह्याच्यावर चोरीचा आरोप असून त्यासाठीं ह्यानें तीनदां तुरुंगाची हवा खाल्ली होती. त्याचा चेहरा नेहमीं भयभीत असे; इतकेंच नव्हे तर, त्याचे ते मोठाले गोल डोळेही भित्रे, कावरेबावरे असत. एकाक्षाचा जिवलग मित्र "तारास" हा एकदां चर्चमध्यें पाद्री होता. परंतु दारुपायीं त्याला त्या नोकरीवरून डच्चू मिळाला होता. तारास जरा ठेंगू व लठ्ठ परंतु चांगला मजबूत असून आजकालच्या पद्धतीप्रमाणें त्यानें डोक्यावर केंस राखलेले होते. ह्याचें शिक्षण मिशनरी शाळेंत झालें होतें. चांगला दर्दी नाचणारा म्हणून त्याची ख्याती होती. पण नृत्यकलेपेक्षां ब्रोडकावर हात मारण्यांतच त्याचा हातखंडा होता एवढें खरें. तारास आणि किसेलनि-कॉफ ह्यांची फारच गट्टी होती. 'एकाक्ष' 'तारास' पेक्षां जवळजवळ दीड-पट उंच होता. म्हणून लोकांनीं ह्या जोडीला " शहाणा व दीडशहाणा " अशीं नांवें दिलीं होतीं. ह्या जोडीचा उद्योग म्हणजे नदीवर लांकडे कांप-ण्याचा. फुरसतीच्या वेळीं " शहाणे " आपल्या स्वतःच्या म्हणून बऱ्याचशा गोष्टी आपल्या मित्राला व दुसऱ्या मंडळींना ऐकवीत असत. ह्या गोष्टी बहुधा राजेरजवाडे, सेनानी, साधुसंत वगैरेंवर रचलेल्या असून कथानक इतकं अश्लील व अभद्र असायचं कीं ह्या दारुड्या मंडळीलाही त्याची किळस यायची. परंतु "शहाणे" मात्र ह्या अश्लील जुन्या पुराण्या व अद्भुत-रम्य गोष्टी अगदीं शान्तपणें सांगे. त्यावेळीं त्याचे डोळे आनंदानें मिटलेले असत. "शहाण्याची कल्पना शक्ति कांहीं और होती. नवीन नवीन विषयांवर

तो दिवसभर बोलला तरी कधीं एका वाक्याचीही पुनरावृत्ति व्हावयाची नाहीं त्याच्या हातून. आपल्या अभ्दुत कल्पनाशक्तीच्या जोरावर दगडालाही जीवकला आणण्याची शक्ति होती त्याच्यांत. तो असा नंगीभंगी झाला म्हणून, नाहींतर जगांतील एक असामान्य प्रतिभाशाली कवी व्हावयाचा तो.

ह्या मंडळीशिवाय आणखी एक विचित्र तरुण येथें होता. प्रथम एक दिवसासाठीं म्हणून हा तरुण येथें आला. परंतु गंमत अशी कीं फिरून परत जायचं नांव कांहीं काढलं नव्हतं त्यानं. दिवसा सर्वांप्रमाणं हाही आपल्या कामावर जाई. पण संध्याकाळ होतांच धर्मशाळेंतील लोकांत मिसळून जाई. कॅप्टन त्याला " धूमकेतू " म्हणत. प्रथम ह्या धूमकेतूकडे कोणी लक्ष दिलें नाहीं. परंतु एक दिवस कॅप्टननीं त्याची हजेरी घेतलीच अखेर.

" ए पोऱ्या ! कोणरे तूं ? आणि काय करतोस इकडे ? "

" मी होय ? आहे आपला एक भटक्या. भटकतो असाच इकडे तिकडे. " मुलानें धिटाईनें उत्तर दिलें.

कॅप्टन त्याच्याकडे पहातच राहिले. लांब ठेवलेले केंस, थबकडा व अजागळ चेहरा, चपटें नाक, असं ध्यान होतं तें. अंगांत एक निळा कोट असून डोक्यावर टोपी किंवा पायांत बूटही नव्हता.

" वेडा आहेस झालं. येथें कशाला आलास ? तुझं इथें कांहीं काम नाहीं. तूं व्होडका पितोस ? नाहीं ? तर जा. ह्या दोन्ही कला शिकून जरा मर्द बन. आणि मग ये परत येथें पाहिजे तर.

तरुण हंसला. " तें नाहीं व्हायचं. मी येथेंच रहाणार. "

" कां ? "

" त्याचं असं आहे— "

" धूमकेतु आहेस खरा. " कॅप्टन उद्गारले.

" जात नाहीं काय ? थांबा मी ह्याचे दांतच पाडतों. " मार्टिनाफ म्हणाला.

" कां म्हणून ? "

"का म्हणून म्हणजे--"

"ठीक आहे. मी पण एक दगड घेऊन तुमचं टाळकं शेंकून काढलं तर?" तरुणानें अगदीं संथपणें प्रत्युत्तर दिलं.

मार्टिनाफनें त्याला झोडपूनच काढलं असतं खरं म्हटलं तर. पण काल्डा मध्यें पडले.

"जाऊं द्या झालं. सोडा त्याला. आपल्या सारखाच तोही एक भाई आहे. तेव्हां तुझा, तसाच आपला सर्वांचा तो आतच नव्हे का एकप्रकारें? कारण नसतां तुला जसे त्याचे दांत पाडावेसे वाटतात, तसेंच उगाच आपलं त्यालाही आपल्या मंडळींत राहावसं वाटतं. सर्वच वेड्यांचा बाजार. आपणही दिवसामागून दिवस घालवीत आहों. पण आपल्या आयुष्यांत तरी कांहीं अर्थ आहे का? आपण जगतों खरे; परंतु 'कशासाठीं' म्हणून प्रश्न केला तर उत्तर देतां येत नाहीं. खरं ना? तसंच त्याचं. इच्छाच आहे तर राहीना बापडा येथें." त्या तरुणाच्या वतीनें आरिस्टाइड काल्डानीं मार्टिनाफची समजूत काढली.

"तेंही खरंच! तरी पण कोंवळया तरुणा, तूं आमची संगत सोडावीस हें बरं!"

निराश दृष्टीनें त्याला आपाद मस्तक न्याहाळीत मास्तरांनीं आपलं मत जाहीर केलं.

तरुणानें काहींच उत्तर दिलं नाहीं. किंवा तेथून तो हाललाही नाहीं. अखेर सर्वांनाच त्याची संवय झाली. कोणी त्याच्याकडे लक्ष दिलं नाहीं फारसं. परंतु तो मात्र प्रत्येक गोष्ट बारकाईनें पाही, प्रत्येक शब्द कान टवकारून ऐकत असे.

ही सर्व मंडळी काल्डाच्या धर्मशाळेंत राहणारीं होती. पर्यायानें त्याचे ते शरीर संरक्षकच होते जणूं. थट्टेनं तो त्यांना "माजी माणसं"

असेंच म्हणत असे. ह्या मंडळीशिवाय आणखीही पांच सहा भणंग तेथील कायम रहिवाशी झाले होते. ते जरा खेडवळ असून काल्डाच्या खास मंडळी प्रमाणें त्यांचें पूर्वयुष्य मोठं रंगिन नव्हतं खरं, परंतु दैवाचे टक्केटोणपे त्यांनींही कांहीं कमी खाल्ले होते अशांतला भाग नाहीं. बाकीच्यांच्या मानानें ते खेडवळसे दिसत खरे, पण त्यांची स्थिति इतरांप्रमाणें अधोगतीलाही पोहोंचली नव्हती. अद्यापही त्यांच्यांत धमक होती. शहरी वळणाचा सामान्य मनुष्य घरंदाज शेतकऱ्यापेक्षां श्रेष्ठ ठरत असेल कदाचित. परंतु व्यसनी शहरवासी मात्र खेडवळापेक्षांही फारच अधोगतीला गेलेला आढळेल. काल्डाच्या धर्मशाळेंतील सुशिक्षित दारुडे आणि खेडवळ दारुडे ह्यांच्या बाबतींत तरी हा नियम अक्षरशः लागू पडे.

ह्या शेतकऱ्यांत चटकन नजरेंत भरणारी व्यक्ति म्हणजे 'तिआपा.' हा कमालीचा उंच व रोड असून डोकें नेहमी कललेलें, छातीला लागलेलें असे. त्यामुळें त्याची सावली नेहमीं एखाद्या आंकड्याप्रमाणें दिसत असे.

त्याचा सबंध चेहरा दिसणं कठीण होतं. पण तें गरुडासारखें बांकदार नाक, पुढें झुकलेला खालचा ओंठ व जाड भुवया त्याच्या चेहऱ्याला उठाव आणीत. काल्डाचा हा पहिला भाडेकरी. ह्यानं बराचसा पैसा आपल्या शरिरावरील लकतरांत लपवून ठेवला आहे अशी एक दाट अफवा होती. आणि त्यासाठींच दोन वर्षांपूर्वी त्याचा खून पडणार होता. कोणीतरी त्याच्या मानेवर सुरा खुपसला देखील.

पण तिआपाचं नशीब जोरावर म्हणूनच तो वांचला. परंतु मान मात्र कायमची वांकडी झाली. त्याचं डोकं छातीवर टेकलं जाई ह्याचं कारणही हेंच होतें. परंतु कोणीं पैशाची गोष्ट काढलीं तर——

" छे हो ! कुठला पैसा घेऊन बसला आहांत. येणार कुठून पैसा अडका ! कुणीतरी गमतीनं सुरा खुपसला झालं." असें तिआपाचें ठरीव उत्तर आल्याशिवाय रहात नसे.

ह्या नंतर त्यानें रस्त्यावरच्या चिंध्या व हाडं गोळा करावयास सुरवात केली. कारण मान आयतीच जमिनीकडे झुकलेली असे. काठी व ठेला हीं त्याच्या धंद्याचीं प्रमुख साधनें. तीं घरीं विसरून तो कधीं चुकून बाहेर गेला तर त्याच्याकडे पहाण्यांत मोठी मौजच होती. झुकलेली मान व लटपटणारे पाय, ह्यामुळें एखाद्या आपल्याच विचारांत गर्क असलेल्या माणसाप्रमाणें दिसे तो. आणि त्याचं तें ध्यान पाहिलं कीं,

"हें पहा जूडास पेतूनिकाफचें पापी मन. कोठेंतरी लपण्यासाठीं जागा शोधीत आहे. कसें भेंकड ध्यान आहे खरें ना !" असें त्याच्याकडे बोट दाखवीत कॅप्टन थट्टेनें म्हणत.

तिआपाचा आवाज म्हणजे इतका कर्कश व भसाडा होता कीं तो काय बोलतो तें कळणें मोठें मुष्कील होतें. त्यांत त्याची चूक होती असं नाहीं. परंतु टवाळखोरांना काय ! त्यामुळें तिआपा फारच कमी बोले. दिवसें दिवस एकलकोंडा बनत चालला होता तो. कोणी नवीन मनुष्य धर्मशाळेंत आला कीं तिआपाचा पारा वर चढलाच. त्याची घालमेल सुरू होई. आपल्या कठोर उपहासानें तो नवागताला नकोसा जीव करी. आपल्यांतील एखाद्या दाणगटाला त्याच्यावर पाठवायासही तो कमी करीत नसे. रात्रीं खून पाडण्याची धमकी द्यावयालाही त्याची तयारी होती. बिचारा नवागत शेतकरी घाबरून जीवाच्या आशेनं जो पळून जायचा तो पुन्हां येतोय कशाला.

इकडे तिआपाचा राग शान्त झाला कीं, आपले फाटके कपडें शिवीत किंवा आपल्या इतकंच घाणेरडं झालेलं फाटकं तुटकं बायबल उचलून तो जो एखाद्या कोंपऱ्यांत जाऊन बसायचा तो मास्तर परत आले कीं वर्तमानपत्र ऐकण्यासाठीं आपला कोंपरा सोडून पुढें येई. मास्तरांचें वाचन चाललें असतां त्यानें कधीं प्रश्न विचारले नाहीं कीं, टीका केली नाहीं. मास्तरांचें वाचन संपेपर्यंत तो एखाद्या दगडासारखा निश्चल बसे. वाचन संपलें कीं मात्र एक दीर्घ सुस्कारा सोडीत मास्तरांच्या हातून वर्तमानपत्र घेण्यासाठीं त्याचा हात पुढें सरसावें.

"इकडे करा पाहूं पत्र."

"कशाला ?"

"द्या तर. कदाचित आमच्याबद्दल कांहीं बातमी असायची."

"कोणाबद्दल ?"

"आपल्या खेड्याबद्दल."

सर्वांनीं हंसून त्याची टर करावी. परंतु त्याला त्याचं कांहीं नाहीं. पत्र हातीं पडतांच अगदीं बारकाईनं सर्व बातम्या वाची. गारांचा वर्षाव अतिवृष्टि, आग वगैरेमुळें ठिकठिकाणीं झालेली शेतांची नासाडी, लहान मुलांसकट विहिरींत जीव देणारी बाई, अशा तऱ्हेच्या विविध बातम्यांवर त्याचा सर्वांत ज्यास्त भर असे. त्याच्या बातम्यांवरून गरीबांचं जीवन किती कष्टदायी, कठीण रूक्ष असतं ह्याची चांगली कल्पना येई.

आपल्या एकसुरी आवाजांत तिआपा सर्व बातम्या वाचून दाखवी; व एक दुःखाचा सुस्कारा टाकी. रवीवारीं तिआपा कधींच आपल्या कामाला गेला नाहीं. दिवसभर आपलं बायबल वाचीत बसे. व वाचतां वाचतां मधूनच हळहळे किंवा निराशयुक्त शब्द उच्चारी. त्याच्या बायबलला कोणी हात लावला किंवा वाचतांना मधेच कांहीं अडथळा आणला कीं झालं ! त्या माणसाची शंभर वर्षे भरलीच म्हणून समजावं.

ओहो ! वाचनाचा काय पण आव ! कांहीं अर्थ तरी कळतो का ! उगाच कशाला ? ठेवा झालं बाजूला. कोणी हंसणार नाहीं. मीं हमी भरतों. मग तर झालें." आरिस्टाईडनें त्याला चिडवावें.

"आणि तुम्हीं ? तुम्हांला कितपत कळतं हो ?

"मला कळत नाहीं. कबुल. पण मी वाचण्यांत ढोंगीपणा करीत नाहीं."

"तुम्हीं वाचत नसाल, पण मी वाचतों ना !"

"मूर्खपणा म्हणतात तो ह्यालाच. डोक्यांत उवा असणं वाइट खरं पण डोक्यांत विचार असणं त्याहीपेक्षां खराब. अशानं लवकर मरशील कीं !

" चालेल. असे काय फार दिवस काढायचेत आतां ? " तिआपा शांतपणें त्तर देई.

" कायरे कुठें वाचायला शिकलास ? " मास्तरनीं एक दिवस ।चारलें.

" जेलमध्यें " तिआपानं एका शब्दांत सांगितलं.

" काय तूं जेलमध्यें होतास ? "

" होय "

" कशासाठी ? "

" कारण—चूक केली होती मीं एक. तेथेंच मला हें बायबल ळालं. एका बाईनं दिलंय हें. खरंच तुरुंग किती चांगला तुम्हाला हीत नाहीं.

" हे शक्यच नाहीं ! तुरुंगांत काय चांगलं असणार ? "

" कां बरं ? तेथें वाचायला शिकवितात तें मीं शिकलोंच कीं नाहीं । बर. एक पुस्तक दिलं होतं शिकायला अगदीं फुकट बरं कां ? "

मास्तर तेथें येण्यापूर्वींच तिआपाचं बिऱ्हाड त्या धर्मशाळेंत आलेलं तं. तिआपानं बराच वेळ मास्तराकडे टक लावली होती. मास्तराचं ाषण तो अगदीं लक्षपूर्वक ऐके. एक दिवस त्यानंही संभाषणांत ग घेतला.

" तुम्हीं तर विद्वान दिसतां. मग तुम्हीं बायबल वाचल तलच ? "

" हो. "

" तुम्हाला आठवत ? "

" छान आठवतं कां बर ? "

" त्यांतील ' आमलेकाइट ' लोकांचा उल्लेख आहे लक्षांत ?

" हो. "

" त्याचं काय झाल पुढें ? "

" ते सर्व मेले. नाहीसे झाले. "

" सर्व ? अगदीं एकुण एक ? "

" आणि फिलिस्टाईन लोक ? "

" ते सुद्धां. "

" ते सुध्दां नाश पावले ? सर्व जात ? "

" हो. ती सुध्दां सबंध जातचीजात लयाला गेली. "

" ह्याचा अर्थ आपणही नाहीसें होणार असाच ध्यायचा का ? "

" वेळ आली कीं होणारच " मास्तरांनीं अगदीं निर्विकार सरळ उत्तर दिलें. भावनांचा त्यांत पूर्ण अभाव होता.

" बरं मग इस्राइलच्या कोणत्या जातींत आपण मोडतों ? "

मास्तरांना नवल वाटलें ते बराच वेळ तिआपाकडे पहात होते. नंतर त्यानीं सुमेरी, सिथीअन, हूण, स्लाव्ह वगैरेंची माहिती सांगावयास सुरवात केली.

तिआपा नेहमींपेक्षां ज्यास्तच एका बाजूला झुकला.

बावरलेल्या नजरेनं तो मास्तराकडे पाहूं लागला.

" नाहीं. झूट. कांहींतरीच सांगतां आहांत. " मास्तरांचें भाषण संपल्याबरोबर त्यानें फुत्कार सोडला.

" मी खोटं सांगतों ? कशावरून ? " मास्तर आश्चर्यानें उद्गारले.

तुम्हीं जीं नांवे घेतलीं त्यांचा बायबलांत निर्देश सुद्धां नाहीं. " तिआपा उठून बाहेर जात म्हणाला. त्याला भयंकर राग आलेला होता. मास्तरांवर तर लाखोली चालली होती त्याची,

"वेड लागलंय तुला तिआपा." मास्तर त्याच्याकडे पहात म्हणाले.

तिआपाचा राग अनावर झाला. तो अगदीं फणफणतच परत फिरला.

"ईश्वरापासून आदाम झाला. आदामपासून 'ज्यू' झाले आणि आम्ही सर्व ह्या 'ज्यू' लोकांचे वंशज आहोंत." मास्तरांच्या समोर हातवारे करीत तिआपा ओरडला.

"बरं मग ?"

"इस्राईलपासून तार्तर झाले. पण इस्राईल ज्यूपासूनच झाला."

"होय कां ?"

"नाहीं तर काय खोटं ? पहा. फिरून वाचा बायबल एकदां म्हणजे कळेल."

"कळून काय करायचं ?"

"कांहीं नाहीं. पण तुम्ही खोटं कां म्हणून सांगतां ?"

मास्तरांना गोंधळलेल्या स्थितींत सोडून तिआपा निघून गेला. तीन चार दिवस दोघांचा अबोला होता. राग जरा ओसरण्याचा अवकाश. तिआपा फिरून मास्तरांशीं वाद करायला तयारच.

"तुम्ही विद्वान म्हणवितां. मग आपण कोण आहों हें तरी माहीत असायला पाहिजे निदान तुम्हाला."

"आपण स्लाव्ह आहों स्लाव्ह, तिआपा." मास्तरनीं तत्काळ उत्तर दिलें. व ते तिआपाच्या उत्तराची वाट पहात राहिले. त्यांना तिआपाचें म्हणणें समजावून घ्यायचें होतें.

"हें पहा, बायबलाच्या आधारावर बोला. त्यांत तुम्ही म्हणतां तसलीं कांहींसुद्धां नांवें नाहींत. मग सांगा आम्ही बाबिलोनियन आहों कीं इडोमाइट ?"

मास्तरांनीं बायबलवर चर्चा सुरू केली. तिआपानें बराच वेळ शान्तपणें ऐकून घेतलें. पण त्याच्यानें फार कांहीं राहवेना. त्यानें मास्तरांना थांबविलेंच अखेर.

"अहो! पुरे करा तुमचा शहाणपणा! म्हणजे काय, परमेश्वराच्या राज्यांत आम्हां रशियनांना स्थानच नाहीं असें म्हणणें कीं काय तुमचें? देवाघरीं आमची ओळखही नाहीं असाच तुमच्या म्हणण्याचा आशय कीं नाहीं? बायबलांत सांगितलेल्या सर्व लोकांची देवाला प्रत्यक्ष ओळख आहे समजलां, 'क्रिस्तव आणि तरवार' घेऊन स्वतःच्या हातानें त्यानें त्यांना शासन केलें आहे; त्यांचीं खेडीं व शहरें उध्वस्त केलीं आहेत. तरी पण त्यांच्यावर परमेश्वराचें खरें प्रेम होतें. म्हणूनच त्यांना सन्मार्ग दाखविण्यासाठीं त्यानें आपले दूत आणि साधुसंत ह्यांना धाडलें आहे. देवानें ज्यू आणि तार्तर लोकांना देशोधडिला हांकून दिलें खरें, तरीपण त्यांचा समूळ नाश होऊं दिला नाहीं. त्यांचाही त्यानें संभाळ केला आहे. मग आमचाच तेवढा त्याला कां विसर पडला? आम्हाला कोणीच कसा मार्गदर्शक धाडला नाहीं!"

"तेंच तर गूढ पडलंय मला." मास्तर जरा उत्तेजनाच्या स्वरांत म्हणाले. तिआपाचें म्हणणें तरी काय तें त्यांच्या नीटसें लक्षांतच येईना.

त्या म्हाताऱ्या शेतकऱ्यानें मास्तरांच्या खांद्यावर दोन्ही हात ठेवले. व हळूंच त्याला पुढें मागें हलवीत कांहींशा हेटाळणीच्या स्वरांत आपल्या घोगऱ्या आवाजांत तो म्हणाला,

"मग हें प्रथमच कां नाहीं सांगितलं? आपण सर्वज्ञ आहों अशी नसती ऐट हवी होती कशाला? तुमचं बोलणं ऐकून कमालीची चिळस येते. माझ्या हृदयाला घरें पडतात अगदीं. तुम्ही चूप बसलां तर फार उपकार होतील बघा. आपल्यांत साधुसंत, धर्मगुरू कां नाहींत, आणि जीझसच्या अवतारकाळीं आम्ही कुठं होतों हें सुद्धां तुम्हाला माहीत नाहीं आणि खोटं बोलण्याला तरी कांहीं सुमार!"

सबंध समाज कधीं नाहिसा होतो वाटतें? सबंध राशियन राष्ट्रच्या राष्ट्र कसें नाहिसें होईल? सब झूट आहे अगदीं. शक्य नाहीं नाहिसें होणें.

बायबलांत कुठें तरी त्यांचा उल्लेख खास असला पाहिजे. पण कोणत्या नांवानें तो उल्लेख आहे तें मला माहीत नाहीं म्हणून. हः ! म्हणे देश समाज नष्ट झाले ! देश म्हणजे काय तें तरी समजतं ? केवढा प्रचंड असतो देश ! कितीतरी लाखों खेडीं असतात त्यांत. आणि प्रत्येक खेड्यांत लोक तरी किती ! आपल्यावरूनच पहाना. आणि तुम्ही म्हणतां इतके सर्व लोक नामशेष झाले म्हणून ! अहो राव, मनुष्य मरतो. पण सबंध समाज नसतो मरत कधीं, समजलांत ! आणि समाज नष्ट झाला तर शेती कोण पिकवील ? आमलेकाइट लोक कांहीं नष्ट झालेले नाहींत. फ्रेंच नाहींतर जर्मन असले पाहिजेत ते हल्लीं. पण त्यांची हल्लींचीं नांवें नक्की माहीत नाहींत मला एवढेंच. तुम्ही काय थापा मारतां ? देवाची हल्लीं आपल्यावर अशी अवकृपा कां हें तुम्हांला तरी कळायला हवं. पण दैव ! आतां आमच्यावर दैवी आपत्ती पण धड येत नाहींत, ना कोणीं अवतारी पुरुष ! मग आमचे डोळे तरी कसे उघडणार ? ”

आधींच तिआपाचा आवाज घोगरा. त्यांत दुःख, भक्ति, श्रद्धा धिःकार वगैरे नाना भावनांचें संमिश्रण झालेलें. त्याचें भाषण बरंच कडक झालें. बराच वेळ बोलत होता तो. मास्तर नेहमींप्रमाणें अर्धवट गुंगीतच असल्यानें त्यांना ऐकण्याचासुद्धां कंटाळा आला लवकरच, बोलतांना तिआपाचे होणारे वेडेविद्रे हावभाव थोडा वेळ ते गंमतीनें पहात होते. पण त्याचें तें कर्कश बोलणें कानांत भरत होतें अगदीं. त्यानें डोकें नुसतं उठून गेलें मास्तरांचें; आणि त्यांच्या शान्तवृत्तीची जागा त्रासिक, उदासवृत्तीनीं घेतली. स्वतःवरच ते थोडेसे चिडल्यासारखे झाले. आपणही कांहींतरी जोरदार–समर्थनीय मुद्दा पुढें आणावा, तिआपाची नीट समजूत घालावी आणि त्याला शान्त करावें असं मास्तरांना वाटलं. ओठापर्यंत शब्द येत परंतु आपल्या भावना स्पष्ट करण्याला योग्य शब्दच त्यांना सांपडेनात.

" फुकट आहे तुझं आयुष्य ! तुझ्या आत्म्याचा नुसता तळतळाट चालला आहे. आणि तरीही तुझी पोकळ वढाई चालू आहे. चूप राहिलास तर ज्यास्त बरं होईल ह्यापेक्षां." ते मनांत म्हणत असावे.

" तिआपा, तूं म्हणतोस तें खरं. समाजाबद्दलचें तुझें म्हणणेंही खरें आहे. समाज खरोखरच फार मोठा आहे. पण मी लोकांना ओळखीत नाहीं. आणि लोक मला ओळखत नाहींत. परके आहोंत झालं आम्ही एकमेकांना. माझ्या आयुष्यांतली विचित्र घटना आहे ही. पण काय करणार ! नशिबी असेल तें भोगलेंच पाहिजे झालं. पण एकाला कोणाला खरं वर्म कळलं असेल तर शपथ. परंतु खरंच, मी उगाच फार बोलतों. निरर्थक असतं माझं बोलणं. मी चूप बसलें पाहिजे हेंच खरं. पण तिआपा इतका खप्पा नको होऊस ! आः ! गड्या, तुला माहीत नाहीं रे माझ्या मनांत कशी कालवाकालव चालली आहे ती ! पण जाऊं दे झालं. तुला नाहीं तें कळावयाचं." बोलतां बोलतां मास्तर अगदीं रडकुंडीला आले. त्यांच्या डोळ्यांतून घळघळां अश्रु वाहूं लागले. ते मनोसक्त रडले. तेव्हांच कुठें त्यांना जरा हायसं वाटलें. हृदयावरचं दडपण कमी झालें.

" तूं शहरांत जा. मास्तर किंवा क्लार्क हो. भोवतालचं गलीच्छ वातावरण बदललं म्हणजे तुला सुख लागेल जरा. अशा तऱ्हेचं किळसवाणं आयुष्य घालविण्यांत होशील काय ? " तिआपा सहानुभूतीच्या स्वरांत म्हणाला.

परंतु मास्तर रडतच होते. डोळ्यांतून वाहणाऱ्या धारांनीं त्यांना हलकं वाटत होतं. तेव्हांपासून मास्तर व तिआपा दोस्त बनले.

" मास्तर तिआपाला बनवतो आहे बरं कां. त्याच्या पैशावर डोळा दिसतोय लेकाचा."

"कॅप्टनची युक्ति असणार ही. परस्पर आपला साप मारवायचा."

दुसरे लोक म्हणत. त्यांचे हे शब्द त्यांच्या मनांतील विचारांचे पडसाद होतेच असं खात्रीनें म्हणणें जरा कठीण आहे. ह्या सर्व मंडळींची एक अजब टेव होती. ते खरोखरी होते त्यापेक्षां आपण ज्यास्त वाईट आहोंत असं दुसऱ्यांना भासविण्यांत ह्या लोकांना एक प्रकारें भूषण वाटत असे.

अंगीं गूण नसला म्हणजे मग आपण फार वाईट आहों असें मिरविण्यांतच प्रौढी वाटते कधीं कधीं माणसाला.

× × ×

सर्व मंडळी मास्तरांच्या सभोंवतीं जमली कीं वाचन सुरू होत असे.

"आजचा पेपर काय म्हणतो ? ऐकूंद्या एकदां. कांहीं गोष्ट कादंबरी वगैरे ?" क्वाल्डा सुरवात करीत.

"अंहं !" मास्तर नकार देत.

"नीच दिसतो मोठा तुमचा हा एडीटर. बरं पण संपादकीय तरी ?"

"तें आहे खरं. गुलायेफचं दिसतं आहे."

"जरा वाचून तर दाखवा. बेटा लिहितो चांगलं. हुशार आहे मोठा."

"पंधरा वर्षांपूर्वी जमिनीची जी किंमत करण्यांत आली होती त्याच आधारावर आज कर आकारला जातो, हें शहराच्या वाढीला पोषकच आहे." मास्तर सुरवात करीत.

"डांबिस नाहींतर ! म्हणे त्याच किंमतींच्या प्रमाणावर कर आकारला जातो ! जणूं शहाणपणाच आहे हा ! व्यापारी वर्गाचा फायदा आहे कीं नाहीं त्यांत ! आणि सत्ता त्यांच्या हातीं, मग नवल नाहीं बदल नाहीं होत तें." क्वाल्डा आपलें मत मध्येंच प्रगट करी.

"आणि कर वसुलीची हीच पद्धत कायम राहावी म्हणून तर लेख लिहिलेला दिसतोय" मास्तर म्हणत.

"अच्छा, असं काय ? अजबच आहे. गोष्टीला छान विषय आहे. माल मसाला घातला कीं अगदीं खमंग गोष्ट होईल तयार !"

झालं वाद सुरू होई. व्होडकाला नुकतीच सुरवात असल्यानं सर्व मंडळींचं लक्ष वाचनाकडे व वादाकडेच असायचं. संपादकाची हजेरी घेतल्यावर बाकीच्या बातम्या वाचून 'पोलीस व कोर्ट' ह्या सदरावर मंडळीचा ताशेरा झडायचा. एखाद्या व्यापाऱ्याच्या घरीं चोरी झाली तर उत्तमच, आणखी माल लुटला गेला नाहीं हीच खेदाची गोष्ट. घोडे उधळून दुसऱ्या व्यापाऱ्याला दुखापत झाल्यास तो मेला नाहीं म्हणून मंडळीला वाईट वाटावयाचें. एखादा सावकार कोर्टांत हरला कीं मोठा आनंद. कोर्ट दुप्पट नुकसान भरपाई देत नाहीं एवढंच वाईट.

"तसं करणं बेकायदा ठरेल" मास्तर कोर्टाची बाजू उचलून धरीत."

"बेकायदा ! पण सावकार स्वतः कधीं कायद्यानें चालतो का ?" उसळून काल्डा म्हणायचा. "सावकार म्हणजे उभ्या मुलखाचा हलकट. प्रत्येक सावकार सुरवातीला कफल्लकच असतो.

खेड्यांत येऊन शेतकऱ्याच्या औदार्यावर जगतो. दुकानें उघडतों. दुकान चालवायला पैसे लागतात. ते कोठून येतात ? कधीं काम करतांना पाहिलं आहे कोणी सावकाराला ! ह्याचा अर्थ, ज्यांच्या औदार्यानं अन्नाला लागतो त्याच शेतकऱ्यांना फसवून गब्बर होतो. अशा प्राण्याजवळ कसला आला सरळ व्यवहार ?"

"बरोबर आहे" श्रोत्यांमधून दुजोरा मिळे. काल्डाला स्फुरण चढे.

नंतर प्रांतीय पत्रव्यवहाराकडे मंडळीची दृष्टी वळे. हें तर कॅप्टनचें खास खातें. व्यापारी व सावकार, लोकांचं कसं नुकसान करतात व माणसांना जगांतून उठवितात, त्यांच्या आयुष्याचा कसा नाश करतात ह्याचं रसभरीत वर्णन होई. सर्वजण काल्डाच्या जोरकस शिवराळ भाषणावर बेहद्द खूष असत.

मला वर्तमानपत्रांत लिहितां येतं तर व्यापारी व सावकार ह्यांचीं सगळीं बिंगें बाहेर काढलीं असतीं. सावकार म्हणजे मनुष्य-रूपानें वावरणारा शुद्ध पशू आहे हें मीं तेव्हांच सिद्ध करीन. मला ठाऊक आहेत त्यांच्या साऱ्या कारवाया. देशाभिमान नाहीं, संस्कृती नाहीं, साधी माणुसकीची ओळख देखील नाहीं लेकाला. कीर्द खतावणी खेरीज दुसरं कांहीं दिसणार काय ह्यांना ? ह्यांचं जग, देव, धर्म सर्व कांहीं पैसा, परब्रम्ह अगदी. ”

“ सर्व खानदानी लोक देशोधडीला लागले तेव्हां नांव घेण्यासारखं असं दुसरं कोणीच उरलं नाहीं. असंचना म्हणणं तुमचं ? ” काल्डाला चिडविण्याच्या उद्देशानें लकतरें पांघरलेला एक मनुष्य म्हणाला.

“हो अगदीं तसंच बरंकारे बेडकाच्या ! ” मला कितीही चिड-विलंत तरी माझंच म्हणणं खरं आहे. अमीर उमराव नाहिंसा होत असून अखेर बनियाभाई शिवाय कोणी राहाणार नाहीं. व्यापारी पाहिला कीं संताप होतो नुसता माझा. मला कांहीं लाज नाहीं वाटत त्या गोष्टीची ” काल्डा गरजले.

“ तें उघडच दिसतंय म्हणा, तुम्हाला खालीं दावलंय कीं नाहीं, म्हणून ! ”

“ अं ! त्याची कोण पर्वा करतो ? अरे ! आम्ही पडलों असलों तरी आयुष्याची मजा लुटली आहे एके काळीं. जिवाची चैन तर केली ! व्यापाऱ्याला लेकाला मजा म्हणजे काय माहीत तरी आहे ! त्याच्या त्या भिकारपणाचा तिटकारा येतो मला. मी म्हणजे मोठा खानदानी म्हणून कांही उगाच आढयता करीत नाहीं. मींही पण तसं पाहिलं तर मी आतां खानदानीचा कुठें राहिलो आहे ? एकेकाळीं मी मनुष्य होतो, ह्याची आठवण करून देणारा, माझ्या पूर्वीच्या जीवनाची छायाच जणूं उरलों आहें मीं आज. मला आज

कसलीच किंमत नाही. सर्वांवर थुंकतों मी. आयुष्याबद्दलही मी तितकाच उदासीन आहे. खरं जीवन कधींच सोडून गेलं आहे मला. कशांतच राम नाही उरलेला. ”

“ झूट, सब झूट. ”

“ काय ! मी थापाड्या ? खोटें बोलणारा ? ” रागानें लाल होत काल्डा ऊसळे.

“ उगाच डोकं तापविण्यांत काय अर्थ ? व्यापारी काय अनी उमराव काय, दोघेही आम्हांला सारखेच. ह्या तात्विक लढ्यापासून आपला कांहीं तादृश्य फायदा आहे का ? ” मार्टिनाफ शान्त, खिन्न स्वरानें म्हणाला.

“ मार्टिनाफचं म्हणणं रास्त आहे. कोंबडी, मासे, बदकें थोडेच आहेत आम्ही उमराव किंवा व्यापाऱ्यांशीं संबंध यायला ! ” शहाणे थट्टेनें म्हणाला.

“ त्याला चूप राहु द्या ना. आगींत तेल ओतण्या पासून फायदा नांहीं ? ”

सर्वांना शान्त करण्याचा मास्तरांचा उद्देश असे. भांडण तंटे गलबलाट त्याच्या संथ प्रवृत्तीला सहन होण्यासारखा नव्हता. आसपासची मंडळी गरम झाली कीं वेदनेनें मास्तराचं तोंड वेडें वांकडे होत असे. कोणालाच न दुखवितां सर्वांना शान्त करण्याची ते धडपड करीत आणि आणि यश मिळत नाहीं असं दिसलं कीं हळूच मंडळींतून उठून बाजूला होत. “दृष्टी आड सृष्टी. तिकडे एकमेकांची टाळकी शेकून मरे नात ” ते म्हणत. आरिष्टाईडला मास्तरांचा स्वभाव चांगलाच अवगत होता, त्यामुळें सावध असल्यास मास्तरांच्या शब्दासरशीं ते शांत होत. कारण मास्तरांची मैत्री तोडण्याची—आपला उत्तम श्रोता गमावण्याची त्यांची इच्छा असणं शक्यच नव्हतं कधीं.

"मी फिरून म्हणेन—आयुष्याचा सुखोपभोग घेण्याची इतकंच नव्हे तर, सुजनता, सौंदर्य, सरलता वगैरे मानवी जीवनाच्या विकासाचीं साधनें सद्गुणांचे शत्रु असणाऱ्या मूर्ख लोभी लोकांच्यां हातीं आहेत. हे लोक आपला विकास करणार नाहींत, लोकांचा होऊं देणार नाहीं." काल्डा ठासून पण बऱ्याच सौम्यपणानें म्हणत.

"परंतु जिनोआ व्हेनिस, हॉलंड ह्यांच्या वैभवाचं श्रेय व्यापारालाच नाहीं कां? इंग्लंडनें व्यापाराच्या जोरावरच हिंदुस्थान जिंकलें ना? व्यापाऱ्यानींच—"

"मला त्याच्याशीं नाहीं कांहीं कर्तव्य. माझा राग पेतूनिकाफ सारख्या व्यापाऱ्या विरुद्ध आहे." मास्तरांना मध्येंच थांबवून काल्डा आपलं म्हणणं स्पष्ट करीत.

"पण ह्यांच्याशीं तरी तुम्हांला काय करायचं आहे? मास्तर संथपणें विचारीत.

"मी जगांत आहे, जीवंत आहे; तेव्हां ह्या जंगली लोकांचा तिरस्कार वाटल्या खेरीज कसा राहील? त्याला माझा नाइलाज आहे. सगळं जीवन, सौदर्य त्यांच्या हातांत आहे. पण त्याचा सत्यानाश चालविला आहे त्यांनीं."

"आणि कॅप्टन साहेबांच्या—मनुष्यत्वाच्या पदावरून भ्रष्ट झालेल्या एका प्राण्याच्या सात्विक संतापाचा उपहास चालविला आहे त्यांनीं. असंच ना!"

"माझा संताप निरर्थक आहे. किंमत नाहीं कांहीं त्याला. वेडगळपणा आहे माझा हा, हें सर्व मला कबूल आहे. एकेकाळीं मी मनुष्य होतो; माणुसकीच्या भावना व विचार ह्यानीं माझें हृदय फुललेलें होतें. पण आतां मी मनुष्यत्वाला सोडचिठी दिली ना? मग सर्व सद् असद् विवेक वगैरे

सर्वांना भडाग्नी द्यायला हवा हें कळतं मला. परंतु आपल्या भावना मुद्धां जर आपण मारून टाकल्या तर—तर तुमच्या माझ्या सारख्या लोकांना दुसरं हत्यार काय राहिलें ?

" हं. आतां ताळ्यावर आल्या सारखें बोललांत खरं ! " सहानुभूतीनें मास्तर म्हणाले.

" आपल्याला कांहीं तरी नवीन पाहिजे. आयुष्याकडे पहाण्याचा नवा दृष्टीकोन, नव्या भावना, कांहींतरी ताजं नवीन पाहिजे. कारण आम्हीं स्वतःच समाजाच्या नवीन स्थितीचें गमक नाहीं का ? "

" बरोबर आहे, तेंच पाहिजें. " मास्तरनीं दुजोरा दिला.

" वाद आणि विचार करण्यापासून फायदा काय ? आपल्याला कांहीं फार जगायचं नाहीं आतां. माझी चाळिशी उलटली, तर तुम्हीं पन्नासच धर पाहिलं. तिसाच्या आंत कोणीच नाहीं आपल्या मंडळींत. आणि एखादा वीस वर्षांचा उमदा तरुण असला तरी आहे ह्या परिस्थितींत कोणी फार दिवस काढणं शक्यच नाहीं." मॉर्टिनाफ म्हणाला.

" आणि समाजाची नवी पायरी म्हणजे तरी काय ? भिकारी बनणं ? मला तर वाटतं भिकारी जगाच्या सुरवातीपासून असावेत व अखेर-पर्यंत राहणार ! " दुसरा एक जरा व्याजोक्तीनें उद्गारला. त्यानें हें प्रथमच तोंड उघडलें होतें.

" पण अशा भटक्या लोकांनींच रोम शहर वसविलं. " मास्तरा-कडून उत्तर मिळालें.

" वाहवा ! खरंच कीं ! रोम्युलस आणि रेमस भणंगच नव्हेत का ? आणि वेळ आली कीं आम्ही पण दाखवू आमचा पराक्रम !" काल्डा आनं-दून म्हणाले.

" सामाजिक सुव्यवस्थेचा विघाड करण्याची भाषा आहे ही, बरं कां. संभाळून जरा. " असें म्हणून आपण काय खूप केली आशा झोकांत स्वतःशींच हंसत लिव्हिंग म्हणाला.

त्याचं हसणं दुष्टपणाचं होतं; ऐकणाऱ्याच्या अंगावर शहारे येत त्या हसण्यानें. कुवर, शहाणे व दीडशहाणे ह्यांनीं पण साथ दिली. धूमकेतूचे गाल लालीलाल झाले. डोळे चमकले आणि मार्टिनाफ पहाडी आवाजानें गरजला,–

" स्वप्नांतील मांडे आहेत हे नुसते. पोरकटपणा नाहीं तर ! "

आयुष्यांतून उठलेल्या, ताडीनं तर्र झालेल्या, गलिच्छ लोकांनीं अशा व्यंगोक्तीपूर्ण रीतीनें समाजाची–आयुष्याची चर्चा करावी हें नवल होतं. ह्यांत शंकाच नाहीं !

असे वादविवादाचे प्रसंग म्हणजे काल्डाला नुसती मेजवानी वाटे. सर्वांपेक्षां तेचं जास्त बोलत. इतरापेक्षां आपण श्रेष्ठ आहों अशी भावना त्याच्या मनांत ह्यावेळीं उत्पन्न होई. मनुष्य कितीही दुर्गतीला पोहचलेला असो, आपण दुसऱ्यापेक्षां बलवान आहों, श्रेष्ठ आहों ही भावना त्याला आनंद देतेच. काल्डाचें तर कधींच समाधान होत नसे. आपली श्रेष्ठता पटवून देणारे प्रसंग ते नेहमीं ओढून ताणून आणीत. काल्डाची ही घमेंडखोर वृत्ती तेथल्या पुष्कळ मंडळीना आवडत नसे. व अशा सामाजिक प्रश्नाच्या ते फारसा खलही करीत नसत. राजकारण त्यांचे आवडतें तोंडी लावणें. कामगार चळवळीवरचा त्यांचा वाद तर कधींच संपणारा नव्हता. हिंदुस्थानांत इंग्लंडला कसा पायबंद घालावा हाही कांहीं कमी महत्वाचा प्रश्न नव्हता. ह्या प्रश्नाचें पुढारीपण लीव्हिंगकडे यायचें. नानातऱ्हेचे अजब अजब उपाय त्याच्या सुपिक डोक्यांतून बाहेर पडत. परंतु वादविवादपटू म्हणवून घेणारे काल्डा हा विषय शक्य तितका टाळीतच. 'बायका' हाही मंडळीचा आवडता विषय होता. त्यावर तर नेहमींच चर्चा चाले.

पण त्यांत अश्लीलताच फार. बायकांचे कैवारी म्हणून मास्तर प्रसिद्ध होते आणि असभ्यता प्रमाणाबाहेर जातेशी पाहिली कीं लगेच ते नाराज होत. मास्तरांच्या श्रेष्ठत्वाबद्दल मात्र सर्वांचं एकमत असल्यानं त्यांच्या एका शब्दासरशी तो विषय बंद पडे.

मास्तरांच्या शब्दाला इतका मान असण्याचं आणखी एक कारण होतं. तें म्हणजे मास्तरानी आठवडाभर मिळविलेले पैसे बहुतेक सर्वांनाच शनिवारीं उसने हवे असायचे.

मास्तरांना इतरही बऱ्याच सवलती होत्या. वादविवाद नेहमींच हातघाईवर येत. पण मास्तरांवर चूकूनही कोणी हात उगारलेला ऐकिवांत नव्हता. बायकांना तेथें आणावयाचीही त्यानां पूर्ण मुभा होती. इतरांना ह्या बाबतींत काल्डाची सक्त मनाई असे. सुरवातीलाच मुळी ते तशी अट घालीत.

“ बायका, सावकार, तत्वज्ञान ह्या तिघांनीं माझं आयुष्य नासलं आहे. येथें जर कोणी बाई माझ्या दृष्टीस पडली तर त्या बाईची व तिला आणणाऱ्या माणसाची शंभर वर्षे भरली समजा.” ते सर्वांना समज देत.

काल्डाला आपली धमकी खरी करण्याची धमक होती. पन्नाशी उलटली असली तरी त्यांची ताकद कांहीं और होती. शिवाय अशा वेळीं मार्टिनाफ नेहमीं त्यांच्या मदतीला धावावयाचा. मार्टिनाफ एरव्हीं चूपचाप व उदास असला तरी अशा प्रसंगीं काल्डाला खरं सहाय्य मिळायचं त्याच्याकडून. माघार घेणें ठाऊकच नव्हतें त्याला. ही जोडी जमली कीं वाटेल त्याचा धुव्वा उडायला वेळ नाहीं लागायचा. कधीं त्यांची फळी फोडणें मात्र कोणाला शक्य नव्हतं. काल्डा समोरून लढत असले कीं मार्टिनाफनें पाठीमागून त्या माणसाला उचलेंच म्हणून समजावें.

दारूच्या नशेंत एकदा सिमत्साफनें मास्तरांच्या डोकीवरले मुठभर केंस उपटले होते निष्कारणच. काल्डानी एका ठोशांतच त्याला जागच्याजागीं

लोळवला. अर्धातास बेशुद्ध होता. उठल्यावर बिचाऱ्याला ते केंस खावे लागले. नाहींतर कांहीं त्याची धडगत नव्हती.

वर्तमानपत्र, वादविवाद, थट्टा मस्करी ह्याशिवाय चवथें करमणुकीचें साधन म्हणजे पत्ते. मार्टिनाफला मात्र ह्यांतून वगळले जाई. तो सरळ नसे. खोटें खेळतानां तो पुष्कळदां पकडला गेला होता. "खेळल्या शिवाय राहवतच नाहीं मला. माझी संवय आहे झालं ही." त्यानें अखेर कबूल केलें. तेव्हां पासून तो डावांतून वगळला गेला.

शहाण्यानं त्याची तरफदारी केली. "होतं असं एखादवेळीं, मला देखील अशीच एक विक्षिप्त संवय होती. रवीवारीं दुपारीं माझ्या बायकोला मारल्याशिवाय चैनच पडत नसे मला. ती मेल्यानंतर मला अगदीं चुकल्यासारखं होई. रवीवारीं काय होत असे तें वर्णन नाहीं करतां यायचं. पहिला रवीवार तर चुकला. दुसऱ्यालाही कसं तरी मन आवरलं. परंतु तिसऱ्या रविवारीं काहीं राहवलं नाहीं. मीं मोलकरणीलाच मारलं. तिनं महाराज आळी डोक्यावर घेतली. खटला भरला. अखेर तडजोड झाली नीं तिला महिना पांच रुपये द्यायचे व तिनं मारून घ्यायचं माझ्याकडून असं ठरलं!"

"द्या थापा झालं पाद्रीबोवा! तुझं दुसरं लग्न रे कसं झालं लेंका?" पाव्हेल म्हणाला.

"तसा लग्नविधी नव्हता म्हणा झाला, पण आमची दोघांची संमती होती ना. शिवाय ती माझं घर संभाळी."

"तुम्हांला मुलें होतीं का?" मास्तरानीं विचारलें.

"पांच होती. मोठा पाण्यांत बुडून मेला. मोठा विलक्षण होता तो. दोघे डिप्थेरियानं गेले. मुलीनं एका कॉलेज विद्यार्थ्याशीं प्रीतिविवाह लावला. दोघेही सैबिरियांत आहेत. एक पीटर्सबर्गला शिकायला गेला. तो क्षयानं आटपला. अशा पांच मुलांच्या पांच तऱ्हा झाल्या. बाकी आहां पाद्यांना

पोरें फार व्हायची. तशी मोठी सुपीक जात आमची. " असें ह्मणून सुपीकपणाचीं कारणं द्यावयाला सुरवात करावयाचा. कीं मग काय विचारतां हंशाच हंशा पिकायचा.

मंडळीचं हंसणें ओसरल्यावर सिमत्सॉफला आपल्या मुलीची आठवण झाली.

" मलाही एक मुलगी होती बरं का. तिचं नांव 'लिडका.' इतकी लठ्ठ होती ह्मणून सांगूं ! "

त्याला आणखी कांहीं आठवलं नाहीं ह्मणा किंवा काहीं असो. तो असहायपणें हंसला. जरा इकडे तिकडे पाहिलें त्यानें व चूप झाला.

आपल्या गतकालाविषयीं ही मंडळी क्वाचितच बोलत. व विषय निघालाच तरी समाजाची हेटाळणी करण्याकरितांच त्या आठवणींचा ते उपयोग करीत. आपल्या पूर्वायुष्याबद्दल त्यांची नेहमीं उपेक्षावृत्तीच असे. एकाअर्थी बरोबर होतं त्यांचं तें करणें. नसत्या जुन्या आठवणींनीं वर्तमान काळांत उदासवाणी छाया पसरून उमेद खचायची आणि भविष्य काळावर निराशेचे काळे ढग पसरायचे !

एके काळीं मनुष्यत्वांत जमा असलेले हे प्राणी, पावसाळ्या दिवशीं अगर हिंवाळ्यांतील थंडीच्या कडाक्यांत वाविलाफच्या गुत्त्यांतील कायमची गिऱ्हाइकें होऊन बसले होते आज. चोर दरोडेखोर ह्मणून वाविलाफच्या दुकानांतील इतर गिऱ्हाइकांना त्यांच्याबद्दल दहशत वाटे. पक्के दारुडे म्हणून त्यांना धिक्कारलं जाई. तर त्या बरोबरच त्यांचं श्रेष्ठत्व पटल्यानं त्यांचे वाद कौतुकानं ऐकले जात. त्यांना आदराचं स्थान मिळे. वाविलाफच्या दुकानांत आसपासची बरीचशी मंडळी जमे. तो त्यांचा क्लबच होता. आमची मंडळी आपल्या बुद्धिवैभवानं बाकीच्या मंडळींना दिपवी.

शनिवारीं संध्याकाळीं सुरू झालेली रहदारी रवीवारीं मध्यरात्रीपर्यंत चाले. सर्वच मंडळी दुःख व दारिद्र्यानं गांजलेली. आमची ही

"माजी-माणसं" त्यांना हंसण्याचं खाद्य पुरवीत. भाकरीचा लढा लढताना नष्ट झालेली शक्ति, खचलेली मनं फिरून ताजींतवानी होत. भविष्याकडे पहायचा धीर येई त्यांना. कोणत्याही विषयावर वाद करण्याची पद्धत, त्यांतील विनोद, बेधडक कसलीही भीति न बाळगतां आपलीं मतं मांडण्याची हातोटी, समाजांत दिसणाऱ्या भीतीचा अभाव, निडरवृत्ति व बेफाम धाडस, कोणाचंही मन आकर्षून घेणारे गुण होते हे. शिवाय बहुतेकांना थोडीबहुत कायद्याची ओळख होती; त्यांच्याकडून योग्य सल्लामसलत मिळे. अर्ज लिहून दिला जात असे; किंवा गुंतागुंतीच्या प्रकरणांत अंगावर न घेतां मदतही मिळे जरूर पडल्यास. त्यामुळें साहजीकच सर्वांना ही मंडळी हवीशी वाटत. म्होरक्यानें त्यांचा सत्कार होई व त्यांच्या बुद्धिमत्तेबद्दल नानातऱ्हेनें कौतुक केलं जाई.

कमीअधिक सहानुभूतीप्रमाणें गावांत दोन सारखे तट पडले होते. कांहीं लोकांना वाटे मास्तरपेक्षां काल्डा श्रेष्ठ आहे, " धैर्य हुशारी कितीतरी जास्त ! सगळ्यांचं नाकच जणूं."

दुसऱ्यांच्या मतानें प्रत्येक गोष्टींत मास्तरच काल्डापेक्षा श्रेष्ठ ठरत. गांवांतले नांवाजलेले दारूड, चोर, इतर गुन्हेगार—ज्यांना तुरुंग व दारिद्र्य दोन्हीं सारखींच होतीं अशी मंडळी काल्डाची पक्षपाती होती. नेहमीं कसली तरी आशा करणारे, अपेक्षा करणारे, पण उपाशी मरणारे गांवांतील सभ्य समजले जाणारे मास्तरांची योग्यता ज्यास्त समजत.

आसपासच्या खेड्यांतल्या लोकांनीं आपल्या खेड्यांतले रस्ते नीट करावेत. रस्त्यांतले खांचखळगे मेलेल्या जनावरांनीं न बुजवतां दगडाविटांनीं बुजवावेत असा शेजारच्या गांवीं म्युनिसिपालटींत ठराव पास झाला होता.

" आज जन्मभर विटांचं घर बांधावं म्हणून धडपड चालली आहे माझी. अजून एक वीट नाहीं मिळविली. आणि खळगे बुजवायला विटा कोठून आणूं तुम्हीच सांगा. " आपल्या मळ्यांतली भाजीपाला शहरांत नेऊन विकणारा एक भाजीविक्या काकुळतीनं म्हणाला.

एवढा महत्वाचा प्रश्न, तेव्हां काल्डानीं आपलें मत मांडणें जरूरच होतें.

" दगडविटा कुठं मिळवायच्या ठाऊक नाहीं ? चला सांगतों मी. चला, आपण सर्व गांवांत जाऊं या; व करूं टाऊनहॉल उध्वस्त. नाहींतरी जुनीपुराणी निरुपयोगी इमारत आहे ती. दुहेरी काम होइल. एकतर नवा टाऊनहॉल बांधावा लागल्यानं गांवाची शोभा वाढेल व आपल्यलाही रस्ते नीट करण्यासाठीं दगडविटा मिळतील. मेयरच्या घोड्यावरच आणू कीं विटा लादून ! नाहींतर जूडास पेतूनिकाफचं घर पाडूं. म्हणजे लाकडाचे रस्ते तयार करता येतील. नाहींतरी तुझी बायको तिसऱ्या माडीच्या खिडक्या चोरून जाळतेच कीं नाहीं ? " रागानें टेबलावर मूठ आपटीत काल्डानें आपली सूचना पुढें मांडली. काल्डाच्या सूचनेनें उडालेला हंशाचा फवारा व उपसूचनांचा मारा कमी झाल्यावर एक बागवान पुढें आला.

" पण कॅप्टन, ह्यावेळीं आम्ही काय केलें पाहिजे तें नीटपणें कळूं द्या तरी ! "

" माझं म्हणणं कांहीं करू नये. हुकुमाकडे पूर्ण दुर्लक्ष करावं. पावसानं रस्ते खराब होतात हा आमचा अपराध नव्हे. "

" कांहीं कांहीं घरं तर पडायलाही लागली आहेत. "

" पडूं द्या. पडली तर शहरानें नुकसानी दिली पाहिजे. म्युनिसिपालिटीनें नाकारलें तर आपण फिर्याद करूं. पाणी कुठलं येतं ? वरच्या शहरावरून ? अर्थात आमची घरं पडतात ह्याचं कारण शहरच."

" ते म्हणतील पावसामुळें असें होतें. "

" परंतु शहरांतलीं घरं पावसानं पडत नाहींत ती ! आमच्या जवळून कर मात्र सक्तीनं वसूल होतो. आणि आमच्या हक्काचं भांडण भांडायला मताधिकार मात्र नाहीं. शहरामुळं आमचं आयुष्य व पैसा नष्ट होतो. तरी त्याला जबाबदार आम्हालाच धरलें जातें. तेव्हां शहरांतच जाऊन तळ देऊं या. "

काल्डाची ही जहाल सल्ला पटल्यामुळें कांहीं लोकांनीं हातपाय न हालवितां पावसाचं पाणी येऊन त्यांचीं घरं वाहून जाईपर्यंत स्वस्थ बसण्याचं ठरविलें.

ज्यास्त विचारी लोकांनीं मास्तरना गांठून त्यांच्याकडून एक चांगला मुद्देसूद सविस्तर अर्ज लिहून घेतला. आणि मेयरकडे पाठविला. म्युनिसिपालटीचा हुकूम पाळणें कसें अशक्य आहे हें नीट पद्धतशीर व मुद्देसूदपणें अगदीं स्पष्ट व जोरदार भाषेंत मांडलें होतें. त्यावर विचार करणें म्युनिसिपालटीला भागच पडलें. आणि सरकारी इमारती बांधून झाल्यावर उरलेला चूरा नेण्याची, इतकेंच नव्हे तर, त्यासाठीं म्युनिसिपल गाड्या व पांच घोडीं हीं हा चूरा वाहून नेण्यासाठीं वापरण्याची परवानगी देण्यांत आली. शिवाय गांवांतून गटार बांधून देऊन शहरची घाण बाहेर काढून देण्याची व्यवस्था करण्याचाही ठराव पास झाला.

ह्या व अशाच इतर कारणांमुळें आसपासच्या खेड्यांत मास्तरांचं नांव प्रत्येकाच्या तोंडी झालें होतें. अर्ज लिहून द्यायचे, वर्तमान पत्रांतून लोकांच्या अडीअडचणी प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करायची हें मास्तरांचें काम होतें. एकदां त्यांनीं वाविलाफच्या खाणावळींतील घाणेरड्या अन्नाबद्दल झोड उठविली. दोन दिवसांनीं त्यानें लोकांची जाहिर माफी मागितली. ह्या जाहीर माफीचा फारच छान परिणाम झाला. लोकांना फिरून चांगलं अन्न तर मिळू लागलेच, पण खेड्यांतील लोकांना वर्तमानपत्रांचें महत्व कळून आलें. मास्तरांचा मान आणखीच वाढला.

मास्तर कधीं कधीं ' नीतीवर ' तोंड घेत.

" काय रे यास्कॉफ, आपल्या बायकोला किती मारत होतास काल ? " घरांना रंग देण्याचें काम करणाऱ्या यास्का तुरीनला गांठून एकदां मास्तरांनीं सुरवात केली.

आधींच यास्का गमत्या, त्यांत व्होडकाचे दोन ग्लास पोटांत गेलेले. कांहींतरी गंमत होणार ह्या अपेक्षेनें सर्वजण त्याच्याकडे पाहूं लागले.

" अच्छा, तुम्हीं पाहिलं तर, आवडलंना तुम्हांला ? " मंडळींत हंशा पिकला.

" नाहीं, मुळींच आवडलं नाहीं मला, " मास्तरांचा स्वर गंभीर होता. हंशाचा भर एकदम थांबला.

" मला करतां येण्यासारखं होतं तेवढं केलं मी. बाकी चांगलाच प्रसाद मिळाला आहे. आज तरी बिछान्यांतून बाहेर येण्याची आशा नको. " विषय थट्टेवारी नेण्याचा यास्कानें प्रयत्न केला. परंतु मास्तरांकडून होणाऱ्या कानउघाडणीची मनांतून भीतीच वाटत होती त्याला. यास्काचं बोलणं चाललं असतां मास्तर समोरच्या टेबलावर बोटानें कांहींतरी आंकडे काढीत होते.

" हें पहा यास्कॉफ मला मारणं कां आवडलं नाहीं तें सांगतों. आपण अगदीं बारकाईनें विचार करूं या. तुझं कृत्य व त्याचा परिणाम नीट पाहिला पाहिजे. तुझ्या बायकोला दिवस गेलेले आहेत. तूं कसलाही विचार न करतां वाटेल तेथें मारलंस, कदाचित तें मूल मेलंही असेल. आणि असं झाल्यास तुझ्या बायकोच्या जिवावरच ओढवायचं. निदान ती आजारी पडण्याचाही संभव कांहीं कमी नाहीं. बायको आजारी पडणं म्हणजे कोण महान आपत्ती. आजार म्हटला कीं, औषधपाणी आलंच. कीं खर्चाचा प्रश्न उभा राहणार. बरं मूल मेलं नाहीं असं समजूं. तरी दुखावलं खात्रीनें असणार. म्हणजे लुळं पांगळंच मूल जन्माला येणार. एकूण कामाला नालायकच तुझ्या दृष्टीनें. मुलानं काम करून स्वतःचं पोट भरणं किती आवश्यक आहे विचार कर. बरं समजा, मूल अधु नसलं पण नुसतं नाजूक प्रकृतीचं झालं तरीही पंचाईतच तुला. आईच्या जिवाशीं घोर. सारखं औषधपाणी व जपणूक करतांना मेटयास येणार. तुझ्या माराचे परिणाम किती घोर व्हायचे पाहिलेस का ? ज्यांना स्वतःचं पोट भरायचं आहे त्यांनीं स्वतः धडधाकट, कणखर असलं पाहिजे; व अशाच मुलांना जन्म दिला पाहिजे. नाहींतर त्यांचे हाल कुत्राहि खाणार नाहीं. खरं ना ! "

" बरोबर आहे." मंडळीनीं होकार भरला. मास्तरांच्या शब्द-चित्रानें यास्का चांगलाच चरकला मनांत. पण वरून बेपर्वाईचा आव ठेवणं जरूर वाटलें त्याला.

" असं कांहीं होणार नाहीं अशी आशा करायला कांहीं हरकत नाहीं ती इतकी सशक्त आहे कीं मुलाला धक्का पोहोंचणं शक्यच नाहीं. आणि करावं तरी काय ? अशी कजाग आहे. एवढ्या तेवढ्या गोष्टीवरून भांडायला उठते एकदम." स्वत:चं लंगडें समर्थन करीत तो उद्गारला.

" रागाच्या भरांत बायकोला मारण्याचा मोह आवरत नाहीं तुला हें माहीत आहे मला. तुझीं कारणं कांहींही असतील, परंतु तुझ्या अविचारी वर्तनाला कारण फक्त तुझ्या बायकोचा वाईट स्वभाव हें मात्र खरं नाहीं. तुझ्या मनाला सुसंस्कृततेचा गंधही नाहीं. आणि त्यांत भरीला तुझी दुर्दशेची दैन्य स्थिति. हेंच त्याचें खरें कारण." मास्तर विचारपूर्ण स्वरांत बोलत होते.

" खरं आहे. अगदीं आम्ही घोर अंधारांत चांचपडतों आहोंत." यास्का उद्गारला.

" सभोंवतालच्या निराशाजनक परिस्थितीनें कातावतोस तूं. आणि त्याचा वचपा काढतोस घरीं बायकोवर. अरे ! तुला उभ्या जगांत जवळचं म्हणून कोणी असेल तर तीच एक. असें असून त्या निरपराध जीवाला—त्या अबलेला केवळ तूं पुरुष पडलास म्हणून तूं छळावंस ना ! ती तुला हाताशीं सांपडते. जाणार कुठें बिचारी ? म्हणून तूं असं वागावंस म्हणजे मूर्खपणाच नव्हे का ?"

" तें सर्व कबूल ! पण मी तरी काय करूं ? मी मनुष्य नाहीं का ?"

" नाहीं कोण म्हणतें ? माझं म्हणणं लक्षांत नाहीं आलं तुझ्या. बायकोला मारल्यावांचून राहवलंच नाहीं तर निदान जपून तरी मार. भलतेंच कांहीं झालं तर बायकोच्या आणि मुलाच्या जिवाला अपाय व्हायचा ह्याची

आठवण ठेव. दिवस गेलेल्या बाईला छातीपोटावर मारणें फार वाईट. मानेवर मार नाहींतर दोर घेऊन मांडीबिंडीवर मार पाहिजे तर."

भाषण संपतांच मास्तरांनीं वर डोळे उचलून आपल्या श्रोतृगणाकडे एकप्रकारच्या उत्सुकतेच्या नजरेनें पाहिलें. त्यांचे खोल गेलेले काळेभोर डोळे क्षणभर चमकले. मंडळी अगदीं रंगांत आली होती. दारिद्र्याच्या व म्होडकाच्या त्या सांप्रदायालासुद्धां हे "माजी–माणसाचे" माणुसकीचे विचार पसंत पडल्यासारखेच दिसले.

"काय समजलं कीं नाहीं यास्कॉफ ? मी म्हणतों तें खरं आहे कीं नाहीं, तूंच सांग हं ! "

"आहे खरं, कबूल केलंच पाहिजे."

अविचारानें बायकोला मारल्यानं भलतंच एखादं संकट ओढवायचं आपल्यावर एवढी एक गोष्ट मात्र यास्कॉफला पक्की पटली. मित्रांच्या थट्टेला खालच्या मानेनें उत्तर देत तो चूप बसला होता.

"आणि तसेंच पाहूं गेलें तर बायको मित्राप्रमाणेंच आहे. आपल्या आयुष्याशीं तिचा जन्म बांधलेला असतो. जन्मठेपीच्या दोन कैद्याप्रमाणें एका सांखळीनें जखडलेले असतों आपण. तेव्हां नीट जपून पाऊल नाहीं टाकलं तर सांखळी शरिराचं मांस काढल्याशिवाय राहणार नाहीं ! "

"हं. पुरे करा तुमची हुशारी ! तुम्ही सुद्धां आपल्याला–"

"नाहीं कोण म्हणतो लेकाचा. माझा नाइलाज असतो. ज्यावेळीं कोणालातरी मारण्यासाठीं हात शिवशिवतात त्यावेळीं भींतीवर मुठी आपटूं काय ? "

"माझंही तसंच होतं ! " यास्कॉफ उद्गारला.

"काय दु:खदायक टाकावूं आयुष्य आहे आपलं ! कमालीचं आकुंचित न् गुदमरविणारं ! जरा हूं कीं चूं करणंही कठीण ! "

" अगदीं स्वतःच्या बायकोलासुद्धां जपून मारावं लागतं. " कोणी-तरी थट्टेनं विषय संपविला.

अशा तऱ्हेनें त्यांच्या गप्पा पहांटेपर्यंतसुद्धां चालत. संभाषणाच्या भरानं किंवा व्होडकाच्या नशेंत मारामारीला सुरवात झाली तरच ह्या बैठकीचा लवकर अंत व्हावयाचा.

बाहेर पाऊस व बर्फासरखा थंडवारा सुटला होता. आंतली हवा कोंदट धुरानं भरलेली पण गरम होती. रस्त्यांत पाणी सांचलेलें असून थंडीचा कडाका व अंधार मी म्हणत होता. वाऱ्याचा झोत खिडक्यांशी उन्मत्तपणें झुंजत होता; व आंतील मंडळींना बाहेर खेंचून केरकचऱ्याप्रमाणें पृथ्वीच्या पाठीवर उडवून देण्याची धमकी घालीत होता जणूं. मधून मधून कुत्र्याच्या रडण्याचा केविलवाणा स्वर कानावर येई. व त्यांतच कोणाच्या तरी विच-कट हंसण्यांचा आवाज अस्पष्टसा ऐकूं येई. हे आवाज म्हणजे आगामी हिवाळयाची दुश्चिन्हेंच होतीं. हिवाळा म्हटला कीं त्याचे ते लहान दिवस, मोठ्या रात्री, भरपूर अन्न व गरम कपडे ह्यांची तीव्र आवश्यकता, हीं डोळयासमोर उभी रहात. उपाशी पोटीं ह्या हिवाळयाच्या रात्रीं झोप येणार कशी ? हिवाळा तर आलाच अंगावर. ह्या दिवसांत आतां जगायचं तरी कसं ? ही विवंचना लागे.

ह्या उदास विचारांनी धर्मशाळेंतल्या लोकांच्या घशाला ज्यास्तच कोरड पाडली. " माजी माणसांचे " पूर्वस्मृतीबद्दलचे सुस्कारे व कपाळा-वरच्या चिंतेच्या आठ्या वाढल्या. त्यांचे आवाज ज्यास्तच घोगरे झाले. विचारशक्ति बधिर झाल्यानें ते एकमेकांचे अस्तित्वच विसरले जणू. चौता-ळलेल्या रानटी पशू प्रमाणें किंवा दैवानें पाठ घेतल्यामुळें वैतागून आततायी बनलेल्या माणसाप्रमाणें किंवा त्याहीपेक्षां. आपला ज्यानें सत्यानाश केला आहे असा एखादा हाडवैरी समोर सांपडला असतां जसें उसळावें तसा परिस्थितीच्या गांजणूकीनें आंतल्याआंत धुमसणारा त्यांचा क्रोध अनिवार्य

होऊन बाहेर पडला. परंतु राग काढावयाला आपला शत्रु कोण ह्यांचेच त्यांना आकलन होण्यासारखे नसल्यानें अखेर त्यांनीं आपापसांतच मारामारीला सुरवात केली. अत्यंत क्रूरपणें एकमेकांचें वाभाडे काढले आणि जरा शान्त झाल्यावर आपसांत समजी करून व्होडका घ्यायला सुरवात केली. ज्या वस्तूला थोडीशी तरी किंमत होती अशी प्रत्येक वस्तु कलालाच्या —वाविलॉफच्या घरांत जाईपर्यंत सर्वजण पीत राहिले.

आपल्या ह्या तापदायक जीवनाचें पर्यवसान काय होणार ह्याबद्दलची विवंचना, निर्बल राग, व दुर्धर संकटें ह्या तापत्रयीनें हैराण झालेल्या मनस्थितींत पावसाळा घालवून खडतर हिंवाळ्याची ते वाट पहात होते. अशा कठीण काळांत काल्डाचाच त्यानां काय तो आधार.

बेट्यानों ! असे डरूं नका. धीर खचू देऊं नका ! अरे, हेही दिवस जातील. प्रत्येक गोष्टीला अंत आहे, हीच तर जीवनाची मजा. हिंवाळा हां हां म्हणतां चुटकी सारखा निघून जाईल. अन् मग उन्हाळ्याचा वसंत फुलल्या शिवाय थोडाच राहतो. " काल्डानें समाधान करावें सर्वांचें.

परंतु त्याच्या शब्दांनीं समाधान होणारं नव्हतं. भुकेलं पोट कधीं चुळकाभर पाण्यानं भरलें आहे कां !

आपल्या कविता व गोष्टींच्या योगानें मंडळीचें मनोरंजन करण्याचा तारास ( पाद्री ) प्रयत्न करीत. त्यांना त्यांत थोडेंबहुत यशही येई कित्येक वेळां. मंडळी वेड्यासारखी गायला नाचायला लागत. आरोळ्या, हंसणं वगैरेंनीं वाविलाफचं दुकान दुमदुमून जाई. परंतु थोडाच वेळ. फारच थोडा वेळ हा विसर टिकत असे. त्यानंतर फिरून निराशेचा झटका येई. मंडळी चूपचाप तंबाखू ओढीत किंवा दिव्यांतून निघणाऱ्या धूराकडे पहात बसत. कोणी बोललंच तरी उत्तरादाखल उदास, संदर्भहीन, अर्थहीन शब्द बाहेर पडत. कान मात्र बाहेर वहात असलेल्या सोसाट्याच्या वाऱ्याकडे टवकारलेले

असत. प्रत्येकाच्या हृदयांत एकच तीव्र विचार थैमान घालीत होता. बेशुद्धी येईपर्यंत, भावनांचा विसर पाडण्या इतकी व्होडका कशी मिळेल ह्या विचारानें सर्वांना ग्रासलें होतें. प्रत्येकजण दुसऱ्याचा निष्कारण, निरर्थक, पण भयानक द्वेष करी. परंतु तो द्वेष हृदयाच्या आंतील कपाटांत दडविलेला असे.

× × × ×

जगांत कोणत्याही गोष्टीला स्वतःची किंमत नसते. दुसऱ्या गोष्टीच्या तुलनेनें ती किंमत ठरत असते. तोच नियम परिस्थितीलाही लागू होतो. कितीही वाईट परिस्थिति असली तरी त्याहुन वाईट स्थिति आढळतेच.

सप्टेंबरचा महिना. काल्डा नेहमींप्रमाणें आपल्या आरामखुर्चीवर बसले होते. वाविलाफच्या गुत्त्याजवळच पेतूनिकॉफची नवीनच विटांची इमारत उभारली जात होती. तिच्यावर त्यांचे डोळे खिळलेले होते. काल्डा आपल्याच विचारांत गुंग होता.

इमारतीचें बांधकाम अजून संपले नव्हतें. मेणवत्त्यांचा कारखाना उभारला जागार होता तेथें, इमारतीचा लाल रंग, पायथ्यापासून छपरापर्यंत बाहेरच्या बाजूनें बांधलेल्या बांबूच्या पराती, कांचा नसलेल्या खिडक्यांच्या रांगा, सर्व देखावा काल्डाच्या डोळयांत कांट्याप्रमाणें सलत होता. एखाद्या स्वस्थ बसलेल्या मगराप्रमाणें ती इमारत दिसत होती. 'आ' करून कोणत्या क्षणाला सर्व गोष्टींचा स्वाहाकार करील ह्याचा नेम नव्हता जणूं. तें वाविलाफचें लहानसें दुकान, त्याचें तें कललेलं व शेंवाळीमुळें हिरवें पडलेलें छप्पर, एका बाजूनें इमारतीला भिडलेलें होतें जणूं. त्या दुकानापासून त्या इमारतीला खाद्य मिळत होतें. हें जुनें पुराणें घरही पाडलें जाणार. त्याबरोबर आपली धर्मशाळाही नाहींशीं होणार, ह्याबद्दल काल्डाला संशय उरला नव्हता. ह्याच विचारांनीं त्याच्या विचारांत काहूर उठविलें होतें ह्यावेळीं. आपल्याला नवीन जागा पहावी लागणार, इतकी स्वस्त व सोयीस्कर मिळेल कीं नाहीं ह्याची वानवाच. फार दिवस राहिलेली ही जागा सोडावी लागणार, कां ?

तर, एका धनिक व्यापाऱ्याला मेणबत्या आणि साबण करण्याची लहर लागली म्हणून. काल्डाच्या अंगाचा संताप उडाला होता. आपल्या ह्या शत्रूला कसा हाणून पाडावा ह्या विचारांत तो पडला होता. क्षणांत त्याचे डोळे आनंदानें चमकले.

आदले दिवशींच आव्हान पेतूनिकॉफ आपला मुलगा आणि एक इंजिनियर यांना घेऊन कम्पौन्डमध्यें आला होता. जागेची बारकाईनें पहाणी करून त्यांनीं कांहीं खुंट्या ठोकल्या होत्या. ते निघून जाताच काल्डाच्या सूचनेवरून ' धूमकेतूनें ' त्या उपटून टाकल्या होत्या.

तो ठेंगु, लठ्ठ व्यापारी काल्डाच्या डोळ्यासमोर नाचत होता. त्याचा तो लांब पायघोळ कोट, त्याच्या आंत मखमालीचें जाकीट, डोक्यावर बनातीची टोपी, पॉलिश केलेले बूट, आंठ्यानीं व्यापलेलें भव्य कपाळ, अर्धवट मिटलेले परंतु सर्व गोष्टीवर लक्ष ठेवणारे ते घारे डोळे, घट्ट आवळलेले ओंठ असें त्याचें एकंदर स्वरूप पाहून त्याच्याविषयीं अत्यंत प्रतिकूल मत बने पहाणाऱ्याचें.

पेतूनिकाफ आणि काल्डाचें आज बरेच दिवसांचें हाडवैर होतें. सुमारे दीड वर्षांपूर्वी म्हणजे ही बखळ खरेदी करण्यापूर्वी आपल्या एका मिजासखोर शहरी दोस्ताला घेऊन पेतूनिकाफ ह्या जागेची पहाणी करायला आला होता. काल्डा त्यावेळीं घरासमोरच उभा होता. त्याला पाहतांच आपल्या बरोबरच्या माणसाला गांवठी भाषेंत तो म्हणाला–"हा भ्रमिष्ट इथें भाडेकरू आहे कीं काय ? "

काल्डाला ती आठवण विसरणें शक्य नव्हतें. तेव्हांपासून केव्हांही भेट होवो. एकमेकांना शिवीगाळ ही व्हायचीच. तीच गत त्या दिवशींही झाली.

" डुकराची अवलाद लेकाची. " पेतूनिकॉफची पाठ फिरतांच काल्डा उद्गारला.

इंजिनियरची पाठवणी केल्यावर पेतूनिकॉफ काल्डाकडे वळला.

" काय? अजून आळस सुटत नाहीं? बसूनच आहांत कीं!" डोक्यावरील टोपी सारखी केल्यासारखें करीत पेतूनिकॉफ म्हणाला.

" आणि तुम्ही! तुमचें सावज हेरणें चाललेंच आहे कीं! " तोंड वेडेवांकडे करीत काल्डा उत्तरला.

" माझ्याजवळ सपाटून पैसा आहे. पैसा नेहमीं खेळतां असला पाहिजे त्यासाठीं मलाही फिरावें लागतें सतत." आपला आवाज चढवीत डोळे आकुंचित करीत आयऱ्हान म्हणाला.

" म्हणजे तुम्ही पैशाचे गुलाम आहांत. पैसा तुमचा गुलाम नव्हे. असंच कीं नाहीं?" काल्डानें हळूच चिमटा घेतला. खरें म्हटलें तर आपल्या शत्रूच्या पोटांत एक लाथ ठेऊन द्यावी अशी अनावर इच्छा त्याला झाली होती.

" पैसा तुमचा गुलाम असला काय कींवा तुम्ही पैशाचे गुलाम असला काय दोन्हीं एकच. परंतु एखाद्याजवळ जर पैसा नसला तर मात्र—" दिखावू सहानुभूतीनें काल्डाकडे पहात पेतूनिकॉफ बोलत होता. हालणाऱ्या ओठांतून त्यांचे मोठाले दांत लांडग्याच्या सुळ्यासारखे दिसत होते.

" माणसाला अक्कल असली व प्रामाणिक बुद्धि असली म्हणजे पैशावाचून कोणाचें फारसें अडत नाहीं. सद्सद्विवेकबुद्धि ढळली म्हणजेच बहुधा हातांत पैसा खेळूं लागतो. चोखपणा जितका कमी तितकाच पैसा ज्यास्त!"

" खरं आहे. पण ह्या दोन्ही गोष्टी नसणारे लोक देखील आहेत कीं जगांत."

" हा बहुतेक तुमचा तारुण्यांतला स्वानुभव दिसतो!" पेतूनिकाफला चांगलाच झोंबला हा टोला. त्याचें नाक फेंदारलें. बारीक डोळे पार मिटले.

" माझ्या लहानपणीं माझ्यावर केवढा भार होता कल्पना नाहीं यायची ! " एक दीर्घ सुस्कारा टाकीत तो म्हणाला. जणूं तो भार आतांच प्रत्यक्ष उतरला गेला होता.

" नाहीं. मला कल्पना आहे कीं ! "

" काम ! सारखं काम करावं लागे ! "

" लोकांना फसविण्याचें काम असेल तें ! "

" तुमच्यासारख्या लोकांना कल्पना नाहीं यायची. परंतु आतां तुमचे लोक शिकताहेत माझ्यापासून. देवाला स्मरून, कसें काम करावें तें मीच शिकवावें. "

" हां हां ! म्हणजे तुम्ही खून पाडले नाहीं. फक्त दरवडे घालून लोकांना बुचाडलें ! असेंच कीं नाहीं " काल्डानीं मध्येंच पेतुनिकाफला थांबवित म्हटलें.

पेतुनिकाफ हिरवा निळा पडला. त्यानें विषय बदलला.

" वाहवा ! पाव्हणा उभा आहे आणि मालक आपला बसला आहे खुशाल ! चांगली रीत राव ! "

" मग बसावं कीं पाव्हण्यानें. नको कोण म्हणतोय ? "

" परंतु बैठक कुठे आहे ? "

" बैठक ! बैठक जमीन. वाटेल ती घाण पाठीवर घ्यायला जमीन सदा तयार आहे. "

"तुला तो नियम बरोबर लागू पडतो खरा. पण जाऊं द्या ! तुझ्या तोंडी कोणी लागावें ?" पेतूनिकाफ वरकरणी शान्तपणें बोलत होता. काल्डा-कडे पहाणारी त्याची दृष्टी त्याला जाळू पहात होती जणूं.

" हलकट कुत्रा ! " जातां जातां त्यानें आगींत तेल ओतलेंच.

पेतुनिकाफ आपल्याला भिऊन निघून गेला ह्या कल्पनेनें काल्डा अगदीं खूष होता. भ्यायला नसता तर ह्यापूर्वी कधींच त्यानें आपल्याला

बाहेर काढलें असतें, पांच दहा रुपयासाठीं असला भाडेकरू कोण ठेवतंय" असा मनातल्यामनांत विचार करीत काल्डा बराच वेळ हळू हळू दूर जात असलेल्या पेतूनिकाफकडे पहात राहिला. पेंतूनिकाफ आपल्या नवीन घराच्या बांधकामाची पहाणी करीत परातीच्या शिड्यांवरून चढत होता. अद्याप काल्डाची नजर त्याच्यावर खिळली होती. हा चढउतार करतांना जर हा पाय घसरून पडला, त्याचें डोकें फुटलें, तर काय बहार होईल. असे विचार काल्डाच्या मनांत सारखे घोळत होते. तो पडावा, त्याला दुखापत व्हावी अशीच त्याची तीव्र इच्छा होती. तो पडला तर कसें होईल, याची काल्पनिक चित्रें–तो जमिनीवर कोळ्याप्रमाणें सरपटत आहे; इतक्यांत वरून इमारतीचा एक भाग ढासळला–वगैरे चित्रें अनेक वेळां त्यानें आपल्याशींच काढली असतील विचाराच्या भरांत. खरोखरीच पेंतुनिकाफा उभा असलेला तक्ता निसटल्याचा त्याला भास झाला. त्या आवेशांत काल्ड उठून उभा राहिला. पण काय ? कल्पना चित्रच होतें तें नुसतें.

परंतु नेहमीं प्रमाणें आजही तीच इमारत काल्डाला जाळीत होती. वेडावित होती. मावळत्या सूर्याचीं किरणं आसपासच्या मोडकळीस आलेल्या घरावर पडलीं होतीं. एकाच जमिनीवर उभारलेलीं घरें पण त्यांची ती दशा आणि ह्या इमारतींचीच फक्त अशी भक्कम, सर्वांना आकर्षक अशी उभारणी कां म्हणून !

" परंतु असं केलं तर ! " मनांत विचार येण्याचा अवकाश काल्डाचा चेहरा खुलला. इमारतीवर डोळे निश्चल ठेवून त्यानीं मनांतल्या मनांत विचाराची फिरून उजळणी केली. ताडकन ते जागचे उठले गुत्त्याकडे धांव घेतली त्यानीं. वाविलाफ दुकानांतच होता. " कसं काय आज इतक्या सकाळींच? " त्यानें हटकलें.

डोक्यावर भलें मोठें टक्कल व चोहों बाजूनें पांढरे पांढरे पडत चाललेले केस, बारीक मिशा, मध्यम बांधा, परंतु अति चपल असा मनुष्य

होता तो. ह्यावेळीं त्यानें एक मळकट जाकीट घातलेलें होतें. त्याची प्रत्येक हालचाल तो एके काळीं, पोलीस खात्यांत असावा असें दर्शवीत होती.

"एगॉर, तुझ्या घराचा नकाशा व खरेदीपत्र आहे का तुझ्या जवळ?" काल्डानें घाईघाईनें विचारलें. त्याचा श्वास जोरानें चालला होता.

"हो आहे कीं." वाविलाफ संशयित नजरेनें काल्डाकडे पहात होता. आज कांहींतरी खास बात आहे हें त्याला तेव्हांच समजून चुकलं.

"मला जरा पाहूं दे बरं!" टेबलावर मूठ आपटीत व जवळच्या स्टूलावर बसत काल्डानें मागणी केली.

"कशाला?" काल्डाचा फाजील उत्साह त्याला साशंक करीत होता.

"मूर्खच आहेस! आण झटपट, मग सांगतों."

वाविलाफचें कपाळ आकुंचित झालें. डोळे आढ्यावर खिळले. जणूं तेथेंच कागद शोधित होता तो.

"कुठें बरें ठेवले आहेत ते कागद!" काय उत्तर द्यावें हें निश्चित न झाल्यामुळें तो अर्धवट स्वतःशींच पुटपुटला.

आढ्यावरून त्याची नजर जमिनीकडे फिरली. एकीकडे बोटांनीं टेबलावर रेघोट्या चालल्या होत्या त्याच्या.

"ह्या गमजा जरा बंद कर सध्यां," काल्डा गरजले. त्यांना मुळांतच वाविलाफबद्दल आपलेपणा वाटत नव्हता. पोलिस अधिकाऱ्यानं गुन्हा उघड-ण्यापेक्षां चोर व्हावं असं त्याचें प्रामाणिक मत होतें.

"हं आठवलं. हे कागद कचेरींतच आहेत त्या केसमध्यें—"

"हें पहा एगॉरका कोणाला बनवितोस तूं? सर्व कागद मला एकदम दाखव तुझाच फायदा होईल. पहा. निदान शंभर दोनशें तरी खास मिळतील समजलं का आतांतरी?" वाविलाफला एक अक्षर समजलं असेल तर शपथ. पण काल्डाचा स्वरच असा कांहीं गंभीर व अधिकारयुक्त होताकीं काय

भानगड आहे ती समजून घेण्याची त्यालाही उत्सुकता वाटूं लागली. पेटींत कागदपत्र आहेत, कीं काय हें एकदां पहाण्याच्या निमित्तानं तो आंत गेला. पांच दहा पळांतच कागदाचं बंडल घेऊन तो बाहेर आला. त्याच्या चेहऱ्यावर आश्चर्य दिसत होतें.

पाहिलं कां ? घरांतच निघाले. माझी समजूत कीं कोर्टांत राहिले. ”

“ पक्का विदुषक आहेस. ‹ पोलीसांत होतास म्हणून कोण म्हणेल ? ” त्याला लाजविण्याचा मोह काल्डाला आवरला नाहीं. तोंडानें बोलत असतां त्यानें तें बंडल हिसकलं व भराभर सर्व कागद आपल्या समोर पसरले. एक एक कागद उचलून पहात असतां प्रत्येक कागदागणिक वाविलाफची उत्सुकता वाढत होती, इकडे काल्डाचें वाचन चालू असतां ‘ ठीक ’ ‘ उत्तमच ’ ! ‘ वाहवा ! ’ इत्यादि हर्षोद्गार तोंडानें बडबडत होता तो. सर्व कागद वाचून संपले. काल्डाचा मनांतच कांहींतरी निश्चय झाला. तो बाहेर जायला निघाला.

“ एक मिनीट थांब. कागद इतक्यांतच नको आवरून ठेवूं” बाहेर जाता जातां कागद तसेच असूं देण्याबद्दल त्यानें वाविलाफला बजावलेंच.

वाविलाफनें सर्व कागदपत्रं उचलून पेटींत ठेवले. सर्व सुरक्षित आहेत अशी खात्री करून घेतली व पेटीला कुलूप लाविलें. डोकें चोळीत तो दरवाजांत जाऊन उभा राहिला. काल्डा हातानं दुकानाची लांबी मोजीत होता. बोटं मोडून कांहीं हिशोब केला; फिरून मोजणी केली. काल्डा खूष झालां होता.

वाविलाफच्या कपाळावर चिंतेचं पटल पसरलें. चेहरा लांबट झाला. आणि नंतर एकएकी चेहरा फुलला.

“ काल्डा, हें शक्य आहे कां ? ” काल्डा जवळ येतांच त्यानं उतावळीनं विचारलं.

" शक्य नाहीं. खात्री आहे. चांगली एकवार—जादाच जागा गेली आहे. ही झाली लांबीची गोष्ट. रुंदी पाहिली पाहिजे. पाहतों आतां. " रुंदी बत्तीस वार "

" अच्छा ! एकूण मी काय करतों आहे हें लक्षांत आलं तर तुझ्या. बेवकूफ आहेस पक्का झालं."

" तुमची धन्य आहे बाकी, आरिस्टाइड फोमिच. दोन यार्डांचा फरकसुद्धां तुमच्या डोळ्यांना तेव्हांच उमगतो. "

वाविलाफचा आनंद ह्या वेळीं वर्णन करणं शक्य नव्हतें. इतका फुगला होता तो.

थोड्याच वेळांत दोघांचें वाविलाफच्या आंतल्या खोलींत खलबत सुरू झालें. काल्डा बोलताना व्होडकाचे घोंट घेत होता.

फॅक्टरीची सबंध भिंत तुमच्या जागेवर आहे. हें तर दिसलं, कांहीं दया माया दाखवूं नका. मास्तर आले कीं एक तक्रार लिहून घेऊं कोर्टांत दाखल करण्यासाठीं. नुकसान भरपाई अव्वाच्यासव्वा नाहीं मागायची; म्हणजे 'स्टॅंप! नाहीं फार लागायचे. पण भिंत पाडली पाहिजे असा हट्ट धरूं. स्पष्ट ट्रेसपास आहे हा. उघड जमीन खाली आहे लेकानें. तुझं भाग्य जोरावर आहे लेका. बांधलेली भिंत पाडून दुसरीकडे उभारणं तोंडच्या गोष्टी नव्हेत. फार खर्चाचं काम आहे. आतां तुझ्या हातांत आहे. घे पिळून मारवाड्याला हवा तसा. भिंत पाडण्याचा खर्च, फुटलेल्या विटांचा खर्च, नवीन पाया, खोदण्याचा खर्च, सर्व विचारांत घेऊं. अरे लेका, जूडास ! बरा सांपडलास कचाट्यांत ! दोन हजाराची चाट द्यायला कांहीं हरकत नाहीं. कसं काय ?"

" इतकं कबूल नाहीं करणार ? " वाविलाफच्या डोळ्यांत लोभ भरला होता.

"नाहींतर त्याला बाहेर पडण्याचा प्रयत्न करून पाहूं दे. तो काय करीलसें वाटतें ? भिंत पाडील. दुसरा मार्गच नाहीं. पण हें पहा एगार, तूं खंबीर रहा.

आमिष दाखवून तुला विकत घेण्याचा प्रयत्न करतील ते. सहजासहजीं हातीं सांपडूं नकोस. भीति घालतील. डरण्याचं कारण नाहीं. आमच्यावर विश्वास ठेव. आम्ही बरोबर संभाळून नेऊं तुला. ”

काल्डाचे डोळे हर्षानें नाचत होते. चेहरा भावनांच्या अतिरेकानें लालीलाल झाला होता. ओंठांना वारंवार मुरड पडत होती. आमिष दाखवून वाविलाफला तर बळविलेच. पेतूनिकाफ विरुद्ध फिर्याद करण्याचं वचन घेऊन काल्डा विजयानंदांत आपल्या मठीकडे परतला. सूड उगविल्याचं समाधान त्याच्या गतींत उतरलें होतें.

संध्याकाळीं सर्वांना बातमी कळली. पेतूनिकाफ पुढें काय करतो ह्यांची चर्चा जिकडे तिकडे सुरू झाली. समन्स लागूं होईल त्या दिवसाचा त्याचा राग व आश्चर्य ह्याचं प्रत्येक जण चित्र रंगवीत होता. काल्डा तर मुख्य नायक.

स्वतःच्या होणाऱ्या स्तुतीनें तो नुसता खुलला होता. पेतूनिकाफला ओळखत नव्हता कोण ? आपल्याच मदांत धुंद असणारा, कःपदार्थ समजून सर्वांच्याकडे दुर्लक्ष करणारा, दीन दुब यांचा तिरस्कार करणारा तो घमेंड-नंदन असल्यानें त्याच्याबद्दल सर्वत्रच द्वेष होता. आपल्यापैकीं एकजण त्याचा नक्षा उतरविणार ह्या विचारानें सर्व आनंदले होते.

कोणाचं नुकसान करायचं म्हटलं कीं ह्या लोकांचें चित्त वेधलें जाई. तेवढेंच एक यशस्वी हत्यार त्यांच्याजवळ उरलं होतं. त्यांच्याप्रमाणें उपाशी न मरणाऱ्या, लक्तरें न पांघरणाऱ्या लोकांचा—भिन्न वर्गाच्या लोकांचा—स्वाभाविकतःच कळत वा न कळत ही मंडळी द्वेष करीत आली होती. आणि म्हणूनच काल्डा व पेतूनिकाफच्या झगड्याबद्दल प्रत्येकाला कुतुहल होतें. प्रत्येकजण काल्डाचा पक्षपाती होता. प्रकरण कसें काय रंगतें आहे याचा खल करीत, आज नवीन कांहींतरी होईल उद्यां होईल करीत पंधरवडा वाट पाहिली त्यांनीं. मध्यंतरी पेतूनिकाफ आपल्या इमारतीकडे फिरकला नाहीं.

तो बाहेर गांवीं गेला असावा म्हणून समन्स लावलं नसेल अशी त्यांनीं आपापसांत समजूत काढली. कोर्टाच्या दिरंगाईबद्दल काल्डा जळफळत होते. ह्यांच्या इतक्या आतुरतेनं पेतूनिकाफची मार्गप्रतीक्षा कोणी कधीं केली असेलसें वाटत नाहीं. पाद्री महाराज तारास तर त्यावर निरनिराळया लावण्या रचून मंडळींना हंसवीत असे.

अखेर एकदांचा पेतूनिकाफ उगवला. एके दिवशीं संध्याकाळच्या सुमारास आपल्या गाडींत बसून पेतूनिकाफची स्वारी आली. त्याचा मुलगाच गाडी हांकीत होता. लांब कोट, निळे गॉगल्स, वर आलेले लाल गाल अशी ती तरुण मूर्ति होती. आपल्या खिशांतून टेप काढून बापलेकांनीं चूपचाप मोजणी सुरूं केली.

" पाहिलंत कां " काल्डानें गर्वानं बाकीच्या मंडळींना ती गोष्ट दाखविली.

सर्वजण फाटकाशीं जाऊन उभे राहिले. प्रत्येकजण त्या बापलेकांना ऐकूं जावं म्हणून मोठमोठ्यानं बोलत होता. जणूं ती जोडी तेथें आहे हें त्यांना माहीतच नव्हतें.

" चोरीची संवय असली म्हणजे काय होतं पहा. नकळतही त्याच्या हातून चोरी होते. व चोरीच्या दसपट भूर्दंड बसतो " वरून सहानुभूतीचा आव॰आणीत काल्डानीं सुरवात केली. त्यांच्या आविर्भावानें सर्वांनाच हंसूं लोटलें. त्याचेंच अनुकरण करीत प्रत्येकानें काल्डाच्या म्हणण्याला पुस्त्या जोडल्या. पेतूनिकाफनें प्रथम तर ह्या मंडळीकडे दुर्लक्षच केलं. परंतु अखेर त्याला सहन झाला नाहीं तो प्रकार.

" जरा तोंड संभाळा ! नाहींतर कोर्टांत खेंचीन. याद राखा " चिडून त्यानें मंडळींना धमकाविलं.

" साक्षीशिवाय व्यर्थ आहे. मुलाची साक्ष बापाला कामास येत नसते." काल्डानें त्याला प्रत्युत्तर दिलें.

"ठीक आहे. आम्ही पाहून घेऊं. तुला वाटतं तूं फारच हुशार आहेस. पण तुलाही सव्वाशेर भेटल्यावाचून राहणार नाहीं." पेतूनिकाफ काल्डावर दांतओंठ खात म्हणाला. त्याचा मुलगा अगदीं शान्तपणें आपलं काम करीत होता. आपल्या बापाची टिंगल करणाऱ्या ह्या मंडळीकडे त्यानं वर मान करून पाहिलंसुद्धां नाहीं.

"हें कोळ्याचं पिलुं चांगलंच तयार झालं आहे. बरं कां" त्याची प्रत्यक हालचाल बारकाईनें निरीक्षण करीत लीव्हिंगनें आपलें मत फर्मावलें.

मोजणी संपली. आयव्हान पेतूनिकाफ जळफळत गाडींत बसून निघून गेला. त्याचा मुलगा मात्र बाविलाफच्या दुकानांत शिरताना दिसला. त्याचा चेहरा करारी असून पावलेंही त्याच तालसूरावर धीर गंभीर पडत होतीं.

"चोर असला तरी आहेत, गुण आहेत अंगांत! पाहूं या काय निष्पन्न होतें तें." काल्डा म्हणला.

"काय व्हायचं? बांविलाफचा हात ओला करील. आणखी काय?" आपल्या उत्तराप्रमाणेंच घडून येणार ह्याची लीव्हिंगला खात्री होती.

"म्हणजे तुझे डोळे घातील. होय ना?" काल्डाचा स्वर कठोर होता.

"मनुष्याचे अंदाज चुकीचे ठरले कीं नेहमींच बरं वाटतं मला.?" डोळे मिचकावीत व हात चोळीत लीव्हींगनें उत्तर दिलें.

रागाच्या भरांत काल्डाना कांहीं उत्तर सुचलें नाहीं. ते फक्त लीव्हींगच्या नांवानें थुकले व स्वस्थ बसले. गुऱ्याकडे पहात, काय होणार अशां उत्सुकतेनें सर्व जण जागींच उभे होते. तासापेक्षां ज्यास्तीच वेळ लोटला असेल. कोणीच कांहीं बोलत नव्हतें. अखेर बाविलाफचा दरवाजा उघडला गेला. व पेतूनिकाफचा पोरगा बाहेर पडला. त्याच्या चेहऱ्यावर कसलाही भाव नसल्यानें काय झालें हें कळण्याला कांहींच मार्ग नव्हता. एक क्षणभर तो थांबला, खांकरून घसा साफ केला, कोटाची कॉलर नीट केली. सभोंवार

पाहून ह्या मंडळीवर एक ओझरती नजर टाकली व तो आपल्या रस्त्याला लागला.

तो दृष्टिआड होईपर्यंत काल्डा त्याच्याकडे पहात होते. "एकूण तुझं भविष्य खरं झालेलं दिसतं. वाईटाचा वास तुला चटकन येत असतो. त्या चोराची ऐटच सांगते त्याचं काम फत्ते झालें म्हणून. एगॉरनें स्क्रू किती पिळला तेंच पाह्यचं आहे. आतां कांहींतरी मिळालं असणार हें खास. दोघेंही एकाच माळेंतले मणी. मीच गाढव ठरलों. गड्यानों, आपले नशीबच खोटें. शेजाऱ्याच्या तोंडावर थुंकू नये. आपल्याच डोळ्यांत उडते असें म्हणतात, तेंच खरं." लीन्हिगकडे वळून काल्डानें औपरोधिक स्वरांत म्हटलें.

अपेक्षिल्याप्रमाणें गोष्टी घडून आल्या नाहींत असें वाटू। सर्वांचीच निराशा झाली होती. सर्व जण चिडले होते. वाईट करणें किती सोपं आणि आणि सहज असतें, पण तें सुद्धां करतां आलें नाहीं म्हणजे बुद्धीची टोंचणी असह्य होतें. दुसऱ्याचें चांगलें नाहीं करतां आलें तर इतकी टोंचणी लागत नाहीं मनुष्याला.

"चला, येथें उभें राहण्यापासून कांहीं फायदा नाहीं आतां. एगॉरला मेजवानी देणार असलां तर गोष्ट निराळी. चला, ह्या घरांतले आपलें शान्त, सुखी जीवन पण संपलेंच म्हाणायचं. पेतूनिकाफ आपली हकालपट्टी केल्या-खेरीज थोडाच सोडतो आतां ! म्हणून मी पण सर्वांना नोटिस देतों आतांच. गुत्याकडे रागानें पहात काल्डा उद्गारला.

"अं. जाऊं द्या झालं." म्हणत मार्टिनाफ विमनस्कपणें हंसला.

"काय जेलर, हंसायला काय झालं ?" काल्डानें विचारलें.

"कांहीं विशेष नाहीं. पण विचार पडलाय कीं जाणार कुठें ? मरणांत ?"

"तो तर प्रश्न आहेच. पण काळजी कशाला करा ! नशीब नेईल कुठेंही. धर्मशाळेकडे जात काल्डा म्हणाले,

बाकीच्या मंडळींनीं त्यांचंच अनुकरण केलं.

" अखेरची वेळ कांहीं अजून भरली नाहीं. ती घटकाभरेपर्यंत थांबूया. नोटीस मिळाल्यावर दुसरी जागा पाह्यला भरपूर वेळ आहे, आतां पासूनच जीवाचा संताप कशाला उगाच. असल्या अडचणी तर नेहमीच्याच आहेत. संकट येऊन ठेपलं कीं मार्ग मिळतोच. प्रत्येक क्षणाला जर अशीं संकटं आलीं, प्रत्येक क्षणीं ही कुडी कशी जगवायची अशी फिकिर पडूं लागली तर, मी पैज मारून सांगतों कीं जगांत ज्यास्त स्वारस्य येइल. लोकांत जरा खरा खुरा जिवंतपणा दिसूं लागेल.

" म्हणजे लोक एकमेकांच्या नरडीला लवकरच हात घालतील असंच ना ! "

" आणि तसं झालं तरी वाईट काय आहे त्यांत ? "

आपल्या विचारावर कोणी मस्खलाशी केलेली क्वाल्डाला आवडत नसे.

" वाईट कांहीं नाहीं. चांगलंच उलट. आपल्या इच्छित स्थळीं लवकर पोहोचण्यासाठीं घोड्याला चाबूक मारावा लागतोच म्हणा !"

"तेंच बरोबर आहे. जितक्या झपाट्यानें सर्व विध्वंस होईल तितकें बरें. एकाएकीं आगीचा कहर होउन जमीन दुभंगली, तुकडे तुकडे झाले, तर मला फार बरं वाटेल. फक्त मी शेवटीं रहायला पाहिजे, म्हणजे मला. सर्वांचा नाश पहातां येईल.

" वाहवा ! आहेस खरा बुवा ! "

"त्यांत काय? बोलून चालून मी "माजी माणूस!" ना मला कसला बंध ना पाश. मी जगावर सहज थूंकू शकतों. जुन्या कल्पना, चांगले आचार विचार, सभ्य पोशाख सर्व सोडून देणें आज भाग आहे मला. कारण आज मी अशाच चमत्कारीक रीतीनें राहात आहे. दुसरा मार्गच नाहीं, पोटभर

अन्न व अंगभर वस्त्र मिळणारे सुखवस्तु लोक आज माझा तिरस्कार करतात, कां ? तर, मी दरिद्री आहे हा माझा गुन्हा. तेव्हां साहजीकच कांहींतरी नवीन गूण, नवीन शक्ति, स्वतःचं असं भयंकर वैशिष्ट्य उत्पन्न केलं पाहिजे मला. जूडास पेतुनिकाफ सारख्याला नुसता माझा वास आला तरी कांपरं भरलं पाहिजे. रक्त गोठलं पाहिजे त्याचें "

"विचार धाडसी बाकीं तुमचे !"

"अरे दारिद्र्यानों ! तुम्हाला काय समजणार ? आणि अक्कल तरी कोठं आहे कळून घ्यायची ! विचार कसा करावा हें सुद्धां कळत नाहीं तुम्हाला. मीं पुष्कळ विचार केला आहे. एका अक्षराचे सुद्धां तुम्हांला ज्याचें ज्ञान होणार नाहीं अशी मोठमोठीं पुस्तकं पालथी घातली आहेत मीं." काल्डा म्हणाले.

"ओहो ! अशा विद्वान मनुष्याची बूट पुसण्याची सुद्धां नाहीं लायकी माझी. तुम्हीं वाचलंय खूप व विचारही केलेला आहे. आणि मी दोन्हींहीं नाहीं. तरीपण आपल्यांत फारसं अंतर नाहीं खास."

"धाड कां नाहीरे पडली तुला !" काल्डा उद्गारले.

त्यांचें लिव्हिंग बरोबर होणारें संभाषण काल्डाला असेंच वैतागून नेहमी सोडून द्यावे लागे.

मास्तर जवळपास नसले कीं आपलं बोलणं फुकट जातें. तें समजण्याची, त्यांतील खुमास कळण्याची पात्रता दुसऱ्या कोणांत नाहीं असं काल्डाला कळून चुकलें होतें. पण बोलल्या वाचून तर राहवत नसे. आतांहि आपल्या प्रतिस्पर्ध्याला चूप बसविल्यावर त्याना सर्व मंडळीत असहाय एकाकी वाटू लागलें. परंतु संभाषणाची खाज तर शमली नव्हती. आतां काल्डानीं सिमत्साफवर मोर्चा वळविला.

"कसं काय? अलेक्सी मॉक्झिमोव्हिच. म्हतारं डोकं कुठें टेकणार आतां?"

" अं ! माझं काय ? पाहूं आस्ते ! मी कांहीं कोणाच्या आध्यामध्यांत नसतों. एक ग्लास व्होडका मिळाली कीं झालं." हातानें नाक चोळीत हास्यमुखानें म्हातारा उद्गारला.

" अगदीं साधी महत्वाकांक्षा आहे हं. आणि स्तुत्यपण ! "

" मला इतरांपेक्षां लवकर जागा मिळेल. बायकांना सहानुभूति आहे माझ्याबद्दल." थोडावेळ शान्त बसून सिमत्साफ म्हणाला. आणि तें खरंपण होतं. त्याच्या नेहमी दोनतीन रखेल्या असत व आपल्या धंद्याच्या अपुऱ्या मिळकतींतून त्या कित्येकदां दोनदोन तीनतीन दिवस म्हाताऱ्याला आपल्या घरीं ठेवून घेत. नेहमीं मारीतही त्याला. पण त्यानें तें कधीं मनावर घेतलं नाहीं. कांहीं असलं तरी त्याचं चांगलं पटत असे खास. कदाचित त्यांना त्याच्याबद्दल कींव वाटत असावी. बायकांबद्दल त्याला फार कौतुक होतं. पण आपल्या दुर्दैवाच्या मुळाशीं बायकाच आहेत असंही त्याचें म्हणणें होतें. बायकांचें व त्याचें किती सख्य होतं हें कळण्याला एकच उदाहरण पुरे आहे. तें म्हणजे त्याचे कपडे नेहमीं व्यवस्थित शिवलेले असत व इतरांपेक्षां स्वच्छही असत. आपली लिडका आपल्याला बोलावते आहे. पण सध्यांची मित्रमंडळी सोडायची नाहीं म्हणून आपण तें आमंत्रण नाकारलं असं त्यानं घमेंडीनं सांगितलं. त्याचं भाषण सर्वजण कुतुहलपूर्वक ऐकत होते. पण सर्वांना एक तऱ्हेची असूया वाटली त्याच्याबद्दल. कारण लिडकाला सर्वजण ओळखत. जवळच रहात असे ती. चोरीसाठीं दुसऱ्यांदा तुरुंगाचा अनुभव घेऊन गेले वर्षींच परतली होती. ती उंच, धिप्पाड बाई होती. तोंडावर देवीचे वण, डोळे सुंदर पण दारूमुळें कांहींसे निस्तेज झालेले होते. पूर्वीं नर्सचा धंदा करीत असे.

" म्हातारा बदमाश आहे पक्का !" स्वत:शींच हंसत असलेल्या सिमत्साफकडे पाहून लीव्हिंग आपल्याशींच उद्गारला.

" आणि आमचं एवढं पटतं ह्याचं रहस्य नाहीं माहीत कोणाला. "

" स्त्रीच्या हृदयाला कशाची तहान असते हें मला बरोबर माहीत आहे."

" खरंच " काल्डा उद्गारले.

" बायकांच्या मनांत आपल्याविषयीं करुणा कशी उत्पन्न करावी हें बरोबर कळतं मला. आणि जेव्हां त्यांच्या हृदयांतील करुणा जागी होते तेव्हां कींव आल्यानं त्या खून करायलासुद्धां मागेंपुढें पहाणार नाहींत. त्यांच्यासमोर रडा आणि त्या विरघळल्याच म्हणून समजा. मग काय वाटेल तें करतील. "

" मी सुद्धां खून करीन !" मार्टिनाफ निग्रही स्वरांत गुरगुरला.

" कोणाचा " त्याच्यापासून जरा बाजूला होत लीव्हिंगनें विचारलें.

" कोणाचाही. सर्व सारखंच ! पेतूनिकाफ, येगारका किंवा तुझाही हवा असल्यास."

" कां बरं ? " काल्डाचें कुतुहल जागें झालें.

" कारण मला सैबिरियांत जायचं आहे. ह्या किळसवाण्या आयुष्याचा कंटाळा आला. सैबिरियांत गेलं तर आयुष्याचा कसा उपयोग करावा हें तरी कळेल."

" हं तेवढं मात्र खरं ! " काल्डा विचारांत गढले.

पेतूनिकाफ प्रकरणाविषयीं अगर धर्मशाळेंततून हकालपट्टी होण्याबद्दल विषय कोणींच वाढविला नाहीं. जागा सोडावी लागणार ह्याबद्दल सर्वांची खात्री होती. प्रश्न होता कधीं ? कदाचित आजचं मरण थोडे दिवस आणखी पुढें ढकललें जाणं शक्य होतं इतकंच. मग त्यावर नसता विचार करून काल-क्षेप कां करा—डोक्याला निष्कारण कां तापवा ? वादविवाद करून कांहीं हा प्रश्न सुटणारा नव्हता. पावसाळा होता खरा, पण उघड्यावर निजणं शक्य होतं. हिंवाळ्याला अवकाश असल्यानें शहरांत पावसापुरतं आडोशाला कुठेंही अंग टाकण्यापुरती जागा मिळती.

गवतावर बसून त्यांच्या गप्पा चालल्या होत्या. त्याला आगा ना पिछा. विषय भराभर बदलत होते. बोलण्याकडेही लक्ष तितपतच होतें. संभाषणाला

खळ पडला नाहीं कीं झालें. एवढंच त्यांचें धोरण असावेंसें दिसलें. चूप बसणें कंटाळवाणं तर होतंच. पण दुसऱ्याचं बोलणं लक्षपूर्वक ऐकणंही तितकंच त्रासाचं होतं. एकेकाळीं मनुष्यत्वाच्या पायरीवर असलेल्या ह्या प्राण्यांत एक नांवाजण्यासारखा गुण होता. उगाच चांगुलपणाचं नसतं ढोंग कोणी करीत नसे. आणि तसला दांभिकपणा कोणी करावा अशीही पण कोणाची येथें अपेक्षा नव्हती. सरळ स्पष्टपणा होता त्यांच्या वर्तनांत.

पाठीवरच्या चिंध्या व डोकीवरचे अव्यवस्थित केस सूर्याच्या किरणांत तापत होते. परसांत तऱ्हतऱ्हेचीं गवतीं झाडें आणि रानवेलीच्या जाळ्या माजल्या होत्या. हीं निरुपयोगीं रोपटीं; निरुपयोगी, टाकावू लोकांखेरीज कोणाला आवडणार ?

× × ×

मंडळी छोटा पेतूनिकाफ वाविलाफकडून बाहेर पडण्याची वाट पहात असतां तिकडे वाविलाफच्या गुत्यांत दुसराच प्रकार चालला होता.

छोटा पेतूनिकाफ आंत शिरतांच त्यानें चोहोंकडे नजर फेंकली; बेपर्वाईनें चेहऱ्यावर आंठ्या घातल्या व सावकाश टोपी काढून हातांत घेतली.

" येगार वाविलाफ आपणच. नाहीं का ? " स्वागत करण्यासाठीं पुढें आलेल्या वाविलाफला उद्देशून त्यानें प्रश्न टाकला.

" हो मीच. कांहीं काम आहे वाटतं ? " टेबलावर दोन्ही हात टेकीत वाविलाफनें उत्तर दिलें. जणूं उडी मारण्याची त्यानें तयारी केली होती.

" जरासं काम आहे तुमच्याशीं. "

" ठीक आहे. चला आपण आंतल्या खोलींत जाऊं. " आंतल्या खोलींत जाऊन ते वाटोळ्या टेबलाजवळ बसले. मेणकापडानें आच्छादिलेल्या एका कोचावर पाहुणा आरूढ झाला. वाविलाफ जवळच एका खुर्चीवर बसला.

एका कोंपऱ्यांत व्हर्जिन मेरीची मूर्ती असून जवळच मेणबत्ती जळत होती. तो प्रकाश मूर्तीच्या पाठीमागच्या भिंतीवर पडला असल्यामुळें तेवढीच भिंत नुकतीच सफेदी झाल्याप्रमाणें दिसत होती. दुसऱ्या कोंपऱ्यांत डबे, जून पुराणं फर्निचर वगैरे सांठविलेलं असून खोलींत टरपेंटाइन, एरंडेल, तंबाखू, सडलेल्या कोबीचे कांदे वगैरेंचा उग्र वास नुसता भरला होता. पेतुनिकाफनें फिरून खोलींत नजर फिरविली व नाकाला रुमाल लावला. एक सुस्कारा टाकीत वाविलाफनें मूर्तीवर नजर टाकली. कदाचित काम व्हावं म्हणून देवाला नवस करीत असावा तो. नंतर दोघांनींही एकमेकांच्या मनाचा ठाव घ्यायला सुरवात केली. वाविलाफची ती चोरटी भित्री नजर पाहून पेतुनिकाफ मनांत आनंदला. तर पेतुनिकाफची ती थंड, निश्चयी मुद्रा तो रुंद जबडा व त्यांतील पांढरे शुभ्र दांत पाहून वाविलाफ खूष झाला.

" मला ओळखतां ना ? मग माझं काम ओळखलंच असेल ? "

" समन्सबद्दलच असावं बहुधा. " नम्रतेनं त्या माजी शिपायानें विषयाला सुरवात केली.

" बरोबर आहे तुमचा तर्क. तुम्ही इतके सरळ असाल व इतक्या खुल्या दिलानं विषयाला सुरवात कराल असं नव्हतं वाटलं मला. मला असलाच स्वभाव आवडतो. एक घाव अन् दोन तुकडे. " वाविलाफला खुलविण्याचा त्याचा उद्देश सफल झाला.

" मी शिपायी गडी आहे. " वाविलाफनें विनयानं सुचविलं.

" तें उघडच दिसतंय कीं. मग आपण एकदम कामालाच हात घालूं या व संपवून टाकूं. उगाच रेंगाळत नको पडायला. "

" जरूर. "

" तुमची तक्रार रास्त आहे. आणि तुमच्या बाजूला कायदा आहे, हें मी प्रथमच सांगून टाकतों. "

" ह्याला म्हणावं प्रामाणिकपणा. अगदीं मोकळ्या मनानें तुम्ही हें कबूल केलें हें ठीक झालें." मुस्करत बाजूला पहात वाविलाफ म्हणाला.

" परंतु मला एक कोडं मोठं पडलं आहे. आपण लवकरच शेजारी होणार. असं असतांना कोर्टांतच आपली पहिली पहिली ओळख करून घेण्याची कल्पना तुम्हाला कां सुचावी ? शेजाऱ्यांत पहिल्यापासूनच कलुषित वातावरण नाहींका राहणार ?"

वाविलाफनें नुसते खांदे उडविले व अनिश्चित भावानें तो चूप राहिला.

" तुम्ही प्रथम आमच्याकडे आला असतां तर बरं झालं असतं. आपण आपसांत मिटवली असती भानगड. निष्कारण कोर्टाची पायरी कशाला चढा ? असा वैरभाव वाढविणं आपल्याला कांहीं पसंत नाहीं. तुम्हाला नाहीं असं वाटत ?"

" तुमचं म्हणणं योग्य आहे. तसं झालं असतं तर ज्यास्त बरं ह्यांत शंकाच नाहीं. परंतु एक अडचण होती. जो मार्ग घेतला गेला तो सर्वस्वी माझ्या मर्जीप्रमाणें होता असं नव्हे. दुसऱ्यांचाच हात ज्यास्ती होता त्यांत. चांगला मार्ग नंतर ध्यानांत आला माझ्या. पण मग काय उपयोग ! हातचा बाण सुटला होता. तो परत घेणं शक्य नव्हतं."

अस्स मला वाटलंच असं कांहीं असेल म्हणून एखाद्या वकीलाचा सल्ला असेल हा होय ना ?"

" अशाच पैकीं प्रकार होता काहींसा "

" बरं तें जाऊंद्या. पण आपापसांत तडजोड करायला तयारी आहे का तुमची ?"

" तडजोड व्हावी ही तर माझी मोठी इच्छा."

ह्यावर पेतूनिकाफ क्षणभर स्वस्थ बसला. आणि मग सरळ वाविलाफ-कडे पहात त्यानें अवचित प्रश्न टाकला, " पण तडजोड व्हावी असं तुम्हाला आतांच कां बरं वाटूं लागलें ?"

असला कांहीं प्रश्न येईल अशी वाविलाफची अपेक्षा नव्हती. तो क्षणभर गोंधळला. काय बोलावें तें त्याला झटकन सुचेना. ह्या प्रश्नाचा रोखच त्याच्या ध्यानांत येईना. तेव्हां किंचित बेपर्वाईच्या रुबाबांत खांदा उडवीत पेतुनिकाफकडे पहात तो नुसता मिस्किलपणें हंसला मात्र. त्यानें जरा वेळ कांहींच उत्तर दिलं नाहीं. व मग सावकाशपणें म्हणाला.

" मत कां बदललं म्हणतां ? कारण उघड आहे. शेजाऱ्या पाजाऱ्या बरोबर उगाच भांडणतंटा वगैरे बखेडा न होतां गोडीगुलाबीनें राहतां यावं असं स्वाभाविकच सर्वांना वाटतं. नाहीं कां ? तुम्हीं सुद्धां म्हणूनच ही वाटाघाट करायला आलांत नव्हे का "

" हं. तें तर खरेंच. पण मीं म्हणतों तुम्ही म्हणता एवढंच एक फक्त कांहीं कारण नाहीं त्याचं. दुसऱ्याशीं मिळून मिसळून सलोख्यानेंच कां वागायला हवं ह्याचा उमज झालेला दिसत नाहीं तुम्हाला. मी सांगतों त्याची फोड करून."

त्याची ही अभिनव ऐट पाहून वाविलाफ थोडासा चाकितच झाला. हा कालचा पोर. धड मिस्रुडही नाहीं पुरी फुटली ओंठावर आणि मोठा एखाद्या अनुभवी वृद्धाचार्याचा आव आणून बोलतो. त्याची ही धिटाई पाहून मनांतल्या मनांत त्याला त्याच्या पूर्वीच्या लष्करी दिवसांची आठवण झाली. सेनापती राष्किनची तरणी बांड साहसी मूर्ती त्याच्या डोळ्यांसमोर उभी राहिली. तो जसा रागावला कीं बेधडक आपल्या सैनिकाच्या तोंडांत भडकावी तसेंच हें पेतुनिकाफचें कृत्य वाटलें त्याला.

" आमच्याबरोबर सलोखा राखणं तुमच्या फायद्याचंच आहे. कसं तें पहा. आमच्या कारखान्यांत निदान दीडशें कामगार सुरवातीस असतील. कारखान्याचं काम जसं जसं वाढेल तशी ही संख्याही वाढेल. समजा दीडशें-पैकीं शंभर कामगार पगाराच्या दिवशीं एक ग्लास व्होडका प्याले. महिन्यांत चार पगाराचे दिवस. म्हणजे आज तुमची जी विक्री होते त्यापेक्षां चारशें

ग्लास व्होडका महिन्याकाठीं ज्यास्त खपेल हें उघड आहे. हा झाला अगदीं कमींतकमी हिशेब. ह्याशिवाय तंबाकू, चहा, ब्रेड वगैरे इतर आहेतच. तुम्हीं कांहीं वेडगळ नाहीं अगदीं. शिवाय कांहीं नाहीं तरी थोडा बहुत अनुभव घेतला आहे तुम्हीं जगांत. तेव्हां आमच्या सारख्या शेजाऱ्याशीं गोडीगुलाबीनंच राहणें कसें हिताचें व जरूर आहे ह्याची तुम्हाला ह्या पेक्षां मीं फोड केली पाहिजे असें नाहीं !"

"तुम्हीं म्हणतां तें खरें आहे एका अर्थीं. मलाही त्याची जाणीव नाहीं असं नाहीं." किंचित नरमाईच्या आवाजांत वाविलाफच्या तोंडातून उद्गार निघाले.

"मग" चढत्या आवाजांत व्यापारी बच्चानें पृच्छा केली.

"मग काय ? मीं कुठें नाहीं म्हणतों. तुमची तयारी असेल तर आपण तडजोडीच्या अटी ठरवून टाकूं"

"छान ! तुमचा हा समजुतदारपणा पाहून खरोखर मला फार आनंद वाटतो. मग हें पहा, त्या जमिनीवरील हक्क सोडण्याबद्दलचे सर्व कागद हे मीं बरोबर तयार करूनच आणले आहेत. मला खात्रीच होती मुळीं तुमच्या समजुतदारपणाची. ह्या एवढया कागदावर सही करा म्हणजे झालं. हवे तर वाचून पहा. वकिलाकडून सर्व पक्के करूनच आणले आहेत ते मीं, पण तुम्हाला पाहिजे तर पहा वाचून. तुम्हीं सही केली म्हणजे भानगडच उरली नाहीं कांहीं. माझ्या वडिलां विरुद्ध गुदरलेली फिर्याद तुम्हीं काढून घेतली असें होईल म्हणजे !"

बाविलाफ डोळे फाडून त्याच्याकडे पहातच राहिला नुसता. त्याचा तो व्यापारी कावा, तो डाव पाहून आपल्या हिताला कांहींतरी मोठा धोका उत्पन्न होत आहे अशा स्वाभाविक जाणीवेनें विस्मया बरोबर सावधही झाला तो. स्वःला सांवरून तो म्हणाला.

"सही ! कसली सही ! म्हणजे समजलों नाहीं मीं !"

"नाहीं ! तसं विशेष नाहीं कांहीं. नुसतं तुमचं नांव आणि आडनांव लिहायचं येथें" बोटानें सही करण्याची जागा दाखवीत पेतूनिकाफ संथपणें म्हणाला.

"तसं नव्हे हो. सही करायला हरकत आहे असं नाहीं. पण म्हटलं माझ्या जमिनी बद्दल नुकसान भरपाईचें कसें काय ? त्याबद्दल काय देतां तें तर कळूं द्या !"

"नुकसान भरपाई ! ती कशाबद्दल ? ती जमीन निकामी तर पडली होती. तुम्हांला तिचा उपयोग तर कांहीं सुद्धां नाहीं." पेतुनिकाफ त्याची समजूत घालण्याच्या इराद्यानें म्हणाला.

"परंतु जमीन माझी आहे मालकीची. आज ना उद्यां मला उपयोगांत आणतां आली नसती कशावरून ?"

"हां. तें कबूल आहे ! पण मग तुमचं म्हणणं काय आहे तें तर बोला."

"आणखी नव्यानें काय बोलायचं आहे. समन्समध्यें तर लिहिलंच आहे स्पष्ट. रक्कमही स्पष्टपणें लिहिली आहे कीं त्यांत." बाविलाफ मनांत जरा कचरतच होता पण वरून मात्र धिटाईचा आव आणून बोलत होता.

"जमिनीवर हक्क माझा आहे. मालक आहें मी. वाटलं तर दोन हजार रुबलही मागू शकेन मी. भिंत पाडून टाकली पाहिजे असाही हट्ट धरूं शकतों मीं. आणि तसं म्हणायचं तर मला तेंच हवं आहे. म्हणून तर मीं रक्कम अगदीं कमी मागितली आहे. तुम्हीं भिंत पाडावी असंच म्हणतों मी."

"ठीक आहे. चालूं द्या मग आहे तेंच. आम्हाला कदाचित भिंत पाडावी लागेलही. पण निदान दोन तीन वर्षं तरी नाहीं. कोर्ट कचेरीचा भयंकर खर्च तुमच्या डोक्यावर बसल्या शिवाय नाहीं. नंतर आम्ही स्वतःच इथें गुत्ता खोलूं. केव्हांही आमचें दुकान तुमच्यापेक्षां सरस राहील. आणि मग तुम्हीं मातीला मिळा. तुमचा सर्वस्वी सत्यानाश करण्याची शक्ति आहे

आमच्यांत. आम्ही इतक्यांतच गुत्ता उघडणार होतों. परंतु सध्यां बरीचशीं कामें हातीं आहेत म्हणून तें लांबणीवर टाकावं लागत आहे. शिवाय तुमच्या तोंडचा घांस कां काढून घ्या म्हणून आलों होतों तडजोड होते कां पहाण्याकरितां. पण तुम्ही फारच ताणून धरतां बुवा. मर्जी तुमची. ”

एगार तेरेतोव्हिच दांत ओंठ खात होता. आपल्या समोर बसलेल्या ह्या कालच्या पोराच्या हातीं आपली मान अडकली आहे असें पाहून त्याला स्वतःचीच कींव करावीशी वाटली. अशा थंड, व्यापारी, अढळ व्यक्तीबरोबर प्रतिस्पर्धी म्हणून उभं राहवं लागलं म्हणून त्यानें दैवाला दोष दिला.

“ आणि आमच्या शेजारीं राहून आमच्याशीं मैत्री केल्यानं तुमचाच फायदा झाला असता. वेळ प्रसंगीं आमच्याकडून मदत मिळाली असती. मी आतांही सांगतों. व्होडका बरोबरच तंबाखु, आगपेटया, चहा वगैरेचं दुकान काढा. पहा गिऱ्हाइक कसं झपाट्यानं वाढतं तें. ”

वाविलाफ मुकाट्यानं ऐकत होता. तो कांहीं अगदींच मूर्ख नसल्यानं शत्रूच्या औदार्यावर अवलंबून राहण्यांतच फायदा आहे. खरं म्हटलं तर पहिल्यापासूनच तो मार्ग घ्यायला हवा होता असं त्यानं मनांतल्या मनांत ठरविलं. झालेली मानहानी त्याला असह्य झाली. काल्डावर शिव्यांची लाखोली वाहिलीं त्यानें. “ दारुडा नाहींतर ! मला गोत्यांत घालीत होता ! वाटोळं होवो हरामखोराचं ! ”

“ कोणाचं वकिलाचं होय ? बाकी केस लढविणं आम्हांलाच कसं तरी वाटलं. कांहीं झालं तरी तुमची न्याय्यबाजू होती. तेव्हां उगाच गरीबाच्या पोटावर पाय कशाला ? असा विचार करून आम्हीं तडजोडीला तयार झालों म्हणून. नाहींतर ह्या वकिली काव्यानें चांगलेच फशी पडणार होता तुम्हीं !

अगदीं शक्ति गेल्याप्रमाणें वाविलाफचे हातपाय लुले पडले.

“ बदमाशांची जोडीच आहे ती. एकानं गळ टाकून सुरवात केली प्रकरणाला आणि दुसऱ्यानें पांढऱ्यावर काळं करून फिर्याद गुदरली. नतद्रष्ट

लेकाचा. माझें मात्र काळें व्हायची वेळ आली त्याच्या त्या फडणिशीनें. वर्तमानपत्री खर्ड्या कोठला ! स्वतःला लेखक समजतो मोठा ! ”

“ लेखक ? वर्तमानपत्राचा ? त्याचा संबंध कसा येतो या प्रकरणांत ?”

“ अहो, तो वर्तमानपत्रांत लिहित असतो. दोघेही तुमचे भाडेकरी आहेत. काय पण सभ्य आहेत म्हणतां ! त्यांना काढून दुसरीकडे पाठवा बुवा. पक्के चोर आहेत. आणि नेहमीं आपापसांत कलागती लावायला तयार, एरवी त्यांना स्वस्थ बसवतच नाहीं मुळीं. कायदा कानू कसली पर्वा नाहीं त्यांना. लूटमार, जाळपोळ हीं त्यांचीं कामं. नेहमीं डोळ्यांत तेल घालून जपावं लागतं. ”

“ परंतु हा वर्तमानपत्रांत लिहिणारा कोण !” पेतूनिकाफ उत्सुकतेच्या स्वरांत म्हणाला:

“ तो ? तो आहे एक दारुडा. शाळामास्तर होता पूर्वी. तेथून हकालपट्टी झाली. होतं नव्हतं तें झोडकांत उधळलं. आतां वर्तमानपत्रांत लिहित असतो व आपल्या सुपीक डोक्यांतून काढलेल्या तक्रारींचे अर्ज लिहित असतो लोकांच्या नांवावर. ” नंबर एकचा बदमाश आहे. तोच तर मुळाशीं आहे ह्या भानगडीच्या.

“ अच्छा आतां समजलं. त्यानंच तुमचा अर्ज लिहिला वाटतं ? बरोबर. आमची इमारत नियमानुसार बांधलेली नाहीं असं वर्तमानपत्रांत खरडणारा हाच मनुष्य असला पाहिजे.

“ तोच. दुसरा कोण ? त्यानं इथं वाचून दाखविला तो लेख. म्हणत होता पेतूनिकाफला चांगलाच चट्टा बसेल आतां ? ”

“ हं. हं ! बरं पण तडजोडीबद्दल काय म्हणणं आहे ? ”

“ तडजोड होय ! ” असें म्हणून विचारानें भारावल्याप्रमाणें वाविलाफची मान खाली झुकली.

" किती कष्टमय जीवन असतं आमचं पहातांच तुम्ही." डोकं खाजवीत तो म्हणाला

" सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे तुम्ही. " एक सिगारेट पेटवीत पेतुनिकाफ म्हणाला.

" सुधारणा ! म्हणायला सोपं आहे महाराज ! परंतु आमचे हातपाय मोकळे कुठें आहेत ? प्रयत्न करायला आम्ही स्वतंत्र नाहीं हीच तर गोम आहे त्यांत. माझंच आयुष्य पहाना ! नेहमीं धास्ती. सतत डोळ्यांत तेल घालून बसलें पाहिजे. एक मिनिटसुद्धां मोकळीक नाहीं. ह्याचं कारण काय ? तर भीति ! एखादा हलकट शाळामास्तरही माझ्या विरुद्ध वर्तमानपत्रांत लिहितो, कीं लगेच सॅनिटरी हेल्थ ऑफिसर मागें लागलेच म्हणून समजा. दंड भरतां भरतां माझ्या नाकीं नव येतात. आमच्या ह्या भिऱ्हाडकरूंबद्दल तर नेहमींच धास्ती असते. जाळपोळ, चोरी इतकंच काय पण खून करायलासुद्धां कमी करायचे नाहींत. ह्यांना पोलीसची सुद्धां भीति वाटत नाहीं. जेलमध्यें जायची पाळी आली तर त्यांना उलट बरंच वाटतं. कारण मग पोटाची सोय लागली आयती ! अशा लोकांना मी कुठवर पुरा पडणार तें तुम्हींच सांगा ! "

" तेंही खरंच म्हणा ! तुमचें आमचें हें जर जमलें तर आम्ही करूं त्यांचा पूर्ण बंदोबस्त " पेतुनिकाफनें आश्वसन दिलें.

" बरं मग तुम्ही काय सुचवितां ? वाविलाफच्या स्वरांत चिंता व उदासीनता होती.

" तुमच्याकडूनच सुरवात होऊं द्या."

" मग समन्समध्यें सांगितल्याप्रमाणें तुम्हीं सहाशें रुबल द्यावे व हा झगडा तोडावा."

" शंभरावर नाहीं का मिटण्यासारखं ?" व्यापारी भाई तो. शान्तपणा त्याच्या अंगीं पक्का बाणलेला होता. आपल्या भाषणाचा वाविलाफवर काय

परिणाम झाला हें पहात, "शंभरावर एक रुबलही जास्त मिळणार नाहीं" असें त्यानें मंदस्मित करीत म्हटलें.

एवढें बोलून त्यानें चष्मा काढला व रुमालानें कांचा पुसण्यास सुरवात केली, वाविलाफची स्थिती अगदींच केविलवाणी झाली होती. पेतूनिकाफकडे तो भीतीयुक्त आदरानें पहात होता. पेतुनिकाफचा तो शान्त चेहरा. घारे डोळे, फुगीर गाल न बांधेसुद शरीर ही त्याच्या दांडग्या आत्मविश्वासाची खात्री पटवित होतीं. मनावरही त्याचा ताबा चांगलाच होता. शिवाय त्याची बोलण्याची पद्धतही दुसऱ्याला खुष करणारी होती. मोठेपणाची घमेंड नाहीं. एखाद्या बरोबरीच्या मित्राशी बोलावं तशी खेळीमेळीची साधी व सहज भाषा. आपली योग्यता इतकी कमी असतां पेतुनिकाफ आपल्याशीं इतका बरोबरीनें वागतो ह्या विचारानें तर वाविलाफच्या मनावर भुरळच घातली जणुं. त्याच्या विषयींच्या वाढत्या आदरानें वाविलाफ ज्यास्तच विरघळला, ज्यास्तच त्याच्यापुढें नम्र झाला. त्या तरुणाची ज्यास्त ओळख करून घेण्याची इच्छा त्याच्या मनांत प्रबळ झाली. क्षणभर दुसरे सर्व विचार बाजूला पडले आणि——

" आपलं शिक्षण कुठं झालं ? " असें नकळत त्याच्या तोंडावाटे शब्द बाहेर पडले.

" टेक्नालॉजिकल इन्स्टिट्युट मध्यें. " कां बरं ?

" कांहीं नाहीं. उगाच चौकशी केली झालं. "

वाविलाफ फिरून विचारांत गढला. नंतर एकाएकी उत्तेजित होऊन त्यानं बोलण्यास सुरवात केली. त्या तरूण व्यापाऱ्याबद्दल वाटणारा आदर व हेवा ह्याचं त्याच्या स्वरांत मिश्रण झालेलं स्पष्ट दिसत होतें.

" ह्याला म्हणतात शिक्षण. शिक्षणानं मनुष्य खरा सुसंस्कृत, समंजस आणि सभ्य बनतो ह्यांत शंकाच नाहीं. मनुष्य खरा उदार आणि मोठा

होतो. नाहीं तर आम्हीं दिवसाच्या उघड्या उजेडांत घुबडाप्रमाणें आंधळे. झालं. आमचं नशीब. दुसरं काय ! पण चला. काम उरकून टाकूंया. पांच-शेला तोंड करूंया राव ! "

त्याच्या आवाजांत कंप होता. पण डोळ्यांत निश्चयाची झांक होती. आणि त्या आवेशांतच कागद घेण्याकरितां त्यानें हात पुढें केला.

" शंभरापुढें बोलायलाच नको एगॉर ! " खांदे उडवीत पेतुनिकाफ म्हणाला. बोलतांना त्यानें वाविलाफच्या हातावर हात मारला. आवाज जणूं काय इच्छा असूनही देण्याची असमर्थता प्रगट करीत होता.

काम होणारसा रंग दिसला. पेतुनिकाफ शब्द फिरवायला मुळींच तयार नसल्यानें मिळतें घेण्यासाठीं वाविलाफ भराभर आपली मागणी खाली उतरवीत होता. अखेर शंभरावर सौदा पटला आणि वाविलाफला शंभर रुबल मिळाले. सहीचा कागद पेतुनिकाफच्या हातीं पडला.

"आतां त्या भिकाऱ्याचं तोंड बंद करावं लागेल. नाहो तर माझा जीव खातील नुसता. " सही करून पेन टेबलावर ठेवीत वाविलाफ उद्गारला.

" समन्समध्यें सांगितलेली सगळी रक्कम दिली असं सांगा त्यानां, " पेतूनिकाफनें सिगारेट पेटवीत सुचविलें. सिगारेटचा धूर चक्राकार गतीनें वर जाऊन नाहींसा होई. त्याकडे तो आतां समाधानानें पहात होता.

" त्यांचा त्यावर कधींच विश्वास नाहीं बसायचा. बदमाश असले तरी हुशार आहेत मोठे. असे चलाख आहेत म्हणतां-- " तो तुलना करणार होता. पण एकदम आपला वेडेपणा लक्षांत येऊन त्यानें जीभ चावली. पेतूनिकाफला कांहीं समजलं का हे पहाण्याकरितां त्यानें एक चोरटी नजर त्यावर फेकली परंतु तो पूर्वीप्रमाणेंच सिगारेटच्या धुराची वर्तुळें पहाण्यांत गंर्क होता. वाविलाफचं बोलणं त्यानें ऐकलेंच नसा-वसं दिसत होतं. लवकरच तो उठला. जातानां त्या सापानां बिळ सोडून नाहींसं करण्यांचं अभिवचन देऊन त्यानें वाविलाफचा निरोप घेतला. तो

जात असतां त्याच्याकडे वाविलाफची टक लागली होती. रस्त्यावरील उकीरड्यावरून उड्या मारीत निश्चयी पावले टाकीत जाणाऱ्या त्या मनुष्याला उद्देशून कांहींतरी अपशब्द उच्चारावेत, त्याचा अपमान करावा अशी त्याला आतां प्रबल इच्छा झाली होती.

× × ×

रात्री नवाचा सुमार. काल्डा गुत्यात शिरले. त्यांच्या भिंवया संतापानें नाकाजवळ येऊन भिडल्या होत्या. व उजव्या हाताची मूठ वळलेली होती. त्याला पहातांच वाविलाफ त्याच्याकडे अगदी दीनवाणा पाहू लागला.

" अच्छा महाराज ! काय झालं, सांगा पाहूं !

" मिटविली ती भानगड सगळी "

" त्याबद्दल शंकाच नाहीं मला. पण तुला काय मिळालं तेवढं सांग. "

" नगद चारशें रुपये. अगदी रोख. "

" खोटं. साफ खोटं. बरं कांहीं हरकत नाहीं. तुला चारशें मिळालें असतील तर माझा फायदाच आहे. हें पहा युक्तिं माझी. तेव्हां मला शेंकडा दहा रुपये दिलेच पाहिजेस. अर्ज लिहिल्याबद्दल मास्तरांना पंचवीस व आमच्या मंडळीना एक गॅलन व्होडका[1] तूं पुरवली पाहिजेस. व त्या बरोबर चांगलसं खाद्य पण. पैसा आतां ह्या घटकेला दे. बाकीचे जिन्नस उद्यां संध्याकाळला तयार हवेत. एक शब्दसुद्धां नाहीं ऐकून घ्यायचा या बाबतींत.

काल्डाचे भाषणानें वाविलाफ हिरवा पिवळा होऊन व डोळे फाडफाडून त्याच्याकडे पहातच राहिला.

" बरंच पाणी सुटलय तुमच्या तोंडाला. पण ती आशा सोडा महाराज. मी द्यायला बसलोय ! ही तर चोरी आहे धडधडीत. काय आरिस्टाइड डोकें ठिकाणावर आहे ना पण ? अशी मागणी करतां

[1]टीप—व्होडका रशियन दारू.

म्हणून विचारतों! दुसऱ्यांना पाडण्याची दुसरी संधी मिळेपर्यंत भूक आवारून धरा जरा समजलं! तुमच्या दरडावणीला भिणार नाहीं मी आतां. काळ बदलला आहे महाराज. ह्यांत काय तें समजा!”

काल्डानें घड्याळाकडे पाहिलें.

“एगॉर, मी तुला दहा मिनिटांची मुदत देतों. तेवढ्यांत काय बरळायचं असेल तें बरळून घे. पण मग मात्र वटवट बंद करून जिभेला लगाम घाल आणि मी काय मागतों तें आणून दे. नाहीं दिलेंस तर–तर मग तुझा विचार तूं पहा! बसॉफच्या चोराची हकिकत वाचलेली आठवतच असेल. मार्टिनाफ चोरीचे जिन्नस तुलाच विकीत होता–काय समजलं? लपवाछपवीची संधी नाहीं म्हटलं मिळायची तुम्हांला. त्याचा पक्का बंदोबस्त केलाय आम्ही बच्चंजी. आणि आज रात्रींच मिळाले पाहिजेत काय समजलं ना?”

“आरिस्टाइड फोमिच इतकं निष्ठूर नका हो बनूं” वाविलाफ गयावया करूं लागला.

“वटवट नको रिकामी. होय कीं नाहीं तें सांग?”

काल्डाच्या रागाचा परिणाम झटकन झाला. काल्डा बोलत होता हळू. पण त्याच्या गंभीर पडसादानं दुकान हादरलें. काल्डा एकेकाळीं लष्करी ऑफिसर होता. आणि त्यांत आतां सडाफटिंग. कशाचा कांहीं बंध नाहीं असा जगातून उठलेला बेडर मनुष्य. एरव्हीं सुद्धा वाविलाफला त्याची भीति वाटायची. परंतु आज त्याला त्याचें वेगळेंच स्वरूप दिसलें. नेहमीं बडबड करणारा काल्डा फारच कमी–अगदीं तोलून शब्द बोलत होता. त्याचे शब्दच धमकीवजा होते. दुसऱ्यानीं त्या शद्बांना मान तुकविली पाहिजे अशी त्यांत हुकमत भरलेली होती. मनांत आलं तर काल्डा सहज लीलेनें आपली चटणी उडवील ह्याबद्दल त्याला संदेह राहिला नाहीं. त्याला काल्डाचें मागणें कबूल करणें भागच होतें. सुटकेचा मार्ग नाहीं हें स्पष्ट दिसत होतें, त्याचा

आंतल्याआंत नुसता जळफळाट होत होता. पण त्यानें वरकरणीं शांतता धारण करीत अखेरचा प्रयत्न करून पहायचं ठरविलें.

" खोट्याच्या कपाळीं सोटा, म्हणतात तेंच खरं आहे अगदीं. मीं खोटें बोललों तुमच्याशी. आरिस्टाइड तुम्हाला फसविलें. मी फार शहाणा आहे असं मला वाटत होतें. परंतु मला फक्त शंभरच रुबल मिळाले आहेत." दु:खाचा सुस्कारा टाकीत अगदीं लीनतेनें गयावया करीत तो म्हणाला.

" मग म्हणणं काय तुझें ? " काल्डा तुसडेपणानें म्हणाला.

" चारशेचा आकडा प्रथम सांगितला ती लबाडी होती माझी म्हणून—"

" म्हणून बिणून कांहीं नाहीं, कोणास ठाऊक, तेव्हां खोटं बोललास कीं आतां बोलत आहेस ! तें कांहीं नाहीं. मला पासष्ट रुबले मिळालेंच पाहिजेत. अगदीं योग्य हिशेब आहे. मग बोल काय तें ! "

" हायरे दैवा ! आरिस्टाइड फोमिच मी नेहमीं तुमचा न्याय्य हिस्सा देत आलों आहे तुम्हांला. कधींच तो हिस्सा बुडविला नाहीं. "

" एगॉरका ! अरे ए जूडासच्या ! तुझी फाजील बडबड नको उगाच ! निमूटपणीं रुबल काढ. "

" ठीक आहे देतो बाबा. पण धडधडीत जुलूम आहे हा. देव पाहून घेईन तुला. "

" चूप ! नीच नाहींतर ! देवानं मला पुरेशीं शिक्षा केली आहे आधींच. तुला पाह्यचं, तुझ्याशीं बोलायचं नशीबी आलं आहे ही काय कमी शिक्षा आहे ? ज्यास्त बकवा केलास तर इथल्या इथं चिलटासारखा चिरडून टाकीन. समजलास. " दांत ओंठ चावीत बाविलाफच्या नाकासमोर मूठ वळून काल्डा गरजला. संतापानें त्याचे डोळे जंगली जनावराप्रमाणें गरगर फिरत होते.

काल्डा जातांच वाविलाफ स्वतःशींच डोळे मिचकावीत लबाडीनें हसला. दोन उष्ण अश्रू गालांवरून ओसरत खालीं पडले व त्याच्या दाढींत ते दिसेनासे होतात न होतात तों त्यांच्या जागीं दुसरे दोन आले. वाविलफ उठून आंतल्या खोलींत गेला व 'इकॉन'[1] समोर गुडघे टेकून, हात जोडून प्रार्थना करूं लागला. हालचाल न करतां बराच वेळ तो तशाच स्थितींत होता. गालांवरून घसरत असलेले अश्रूंचे सर पुसण्याची सुद्धां त्याला पर्वा नव्हती.

× × × ×

डेकन तारासला खुल्या हवेची— सौंदर्याची फारच आवड होती. तेव्हां एखाद्या खो-यांत निळ्या आकाशाखालीं बसून सृष्टिसौंदर्याचा आस्वाद घेत वाविलाफकडून आलेल्या व्होडकावर रंग उडवावा अशी सूचना त्यानें त्या 'माजी मनुष्य' प्राण्यांपुढें मांडली. परंतु काल्डासकट सर्वांनीं त्याच्या सौंदर्य दृष्टीची टरच उडविली. अखेर सर्वानुमतें अंगणांत बसूनच मेजवानी करावयाचें ठरलें.

" एक, दोन, तीन " आरिस्टाइड मंडळी मोजूं लागले. " आपण एकंदर तेरा जण आहोंत. मास्तर न जाणे कुठें गेले आहेत. परंतु आणखी कोणी तरी उपटसुंभ चुकलेले फकीर आयत्यावेळीं येणार हें नक्कीच. आपण वीस जण हिशेबांत धरूं या. मला वाटतें प्रत्येकीं अडीच कांकड्या आणि एक पौंड मांस रोटीं कांहीं कमी नाहीं. तसेंच दरेकाला १ बाटली व्होडका. कोबीची भाजी, सफरचंद, टरबूज आहेतच शिवाय. आणखी काय पाहिजे !"

" कायरे गडे ओ ; काय म्हणणं आहे तुमचं ? "

" चला तर मग, एगार वाविलाफला फस्त करून टाकूंया. कारण ही सर्व मेजवानीची सामुग्री म्हणजे त्याच्या काळजाचं रक्त मांसच म्हणायचं. निदान त्याला तरी तें तसें खास वाटलें असणार ! "

त्यांनीं कांहीं फटक्या सतरंज्या जमिनिवर हांतरल्या. त्यावर खाद्य पेय व्यवस्थित मांडून सर्वजण त्या भोवतीं वर्तुळाकार बसले. प्रत्येकाला व्होडकावर

[1]टीप=इकॉन—ख्राइस्टची क्रॉसची प्रतिमा.

हात मारावयाचा होता. प्रत्येकाच्या डोळ्यांत त्या इच्छेचं प्रतिबिंब पडलं होतं. पण प्रत्येकजण मोठ्या मुष्कीलीनं स्वतःला आंवरीत होता.

संध्याकाळ होत आली होती. अव्यवस्थित गलिच्छ अशा त्या अंगणांत तिची छाया पडायला लागली होती. सूर्याची मावळतीं किरणं मोडकळीस आलेल्या घराच्या छपराला शोभा अणीत होतीं. शान्त थंड संध्याकाळ होती ती.

" चला पाडा फडशा ! विचार कसला आतां ! आपल्याजवळ किती ग्लास आहेत. सहाच. आणि आपण आहों तेरा. अलेक्सी मार्टिनाफ तुम्ही ग्लास भरा. हं तय्यार ! चला उचला संपवा घटाघट " मेजवानी देण्याचा मान सहाजीकच काल्डाला मिळालेला होता. त्याच्याच अक्कल हुशारीमुळें ही चैन चालली होती.

भराभर सर्वांचे ग्लास रिकामे झाले. सर्वांनीं बोकणे भरावयास सुरवात केली.

" परंतु मास्तर नाहींत येथें. मी दोन दिवसांत पाहिलं नाहीं त्यांना. तुमच्या पैकीं कोणाला दिसले होते रे ?" काल्डानीं चौकशी केली.

" नाहीं ! कोणीच पाहिलेलें नाहीं त्यानां ! "

" पण मास्तर असे रहायचे नाहींत कुठें. असुंद्या झालं. फिरून एकेक ग्लास भरूंया मास्तरांच्या नांवानें. ह्या जगांत तेच कायते माझे एकच एक मित्र आहेत. सबंध आयुष्यांत त्यांनीं कधींच मला सोडलं नाहीं. अर्थात्, त्यांनीं जर कधीं सोडलं असतं तर माझा फायदाच झाला असता ही गोष्ट निराळी."

" वाहवा अगदीं बरोबर ! " खाकरत लीव्हिंग गरजला.

इतरांपेक्षां आपण श्रेष्ठ आहों ही भावना काल्डाच्या मनांत जागृत होती. त्यांनीं आपल्या प्रभावळीकडे एक नजर फेंकली. पण कांहीं बोलले नाहीं. कारण त्यांच्या हातातोंडाची लढाई चालली होती ह्यावेळीं.

दोन दोन ग्लास झोंकतांच मंडळी खुलली. कारण ग्लास भरपूर भरलेले होते. "दीड शहाण्यानं" हळूंच गोष्टी सांगण्याचा बूट काढला. परंतु रोड स्त्रिया चांगल्या कीं लठ्ठ चांगल्या ह्या महत्वाच्या प्रश्नांवर पाद्रीबाबांचें " कूबरशीं एकमत होईना. 'तारास' आपला मुद्दा अनुभवी माणसाच्या तोऱ्यानं पटवून देण्यांत गुंतला होता. त्यांच्या जवळच आडवा पडून " धूमकेतु" ह्या लढवय्यावीरांकडे 'आ' पसरून आदरानें पहात होता. आपल्या मोठ्या, केंसाळ हातांनीं गुडगे चोळीत मार्टिनाफ शान्तपणें व्होडकाच्या बाटलीकडे एकाग्र दृष्टीनं पहात असून जीभेखालीं मिशा दाबून दांतांनीं कुरतडण्याचा सारखा प्रयत्न करीत होता. लीव्हिंग उगाच तिआपाला चिडवीत होता.

" तुम्हीं पैसे कोठे लपविले आहेत तें मला कळलं आतां !"

"मग मजा झाली कीं" तिआपा आपल्या घोगऱ्या आवाजांत म्हणाला.

" एक दिवस काढून नेईन सर्व पैसे !"

" शक्य असेल तर घेऊन जा कीं ! "

ह्या असल्या मंडळींत काल्डाला लवकरच कंटाळा आला. त्याचं वक्तृत्व ऐकणारा-समजणारा-एकही लायक इसम ह्या मंडळींत नव्हता.

"मास्तर गेले आहेत तरी कोठें ?" तो स्वतःशींच पण मोठ्यानें म्हणाला.

" येतील कीं आतां परत ! " त्याला उत्तरादाखल पण स्वतःशींच मार्टिनाफ पुटपुटला.

" पै. ! मीं म्हणतों मास्तर स्वतःच्या पायानींच चालत येणार. गाडींत येणें शक्य नाहीं. "

" अरे ए कैदी ! " हेंच खरें तर. भर बघूं.आणखी एक ग्लास. तुझ्या भविष्याच्या नांवानें. आणखी एकएक ग्लास झोंकायला मुळींच हरकत नाहीं. आणि हें बघ. खून करून जर कां तुला पैसे मिळाले तर त्यांतले अर्धे माझे बरं का ! माझा वांटा घेऊन मीं अमेरिकेंत जाणार. आणि तें ' लँपास का

फँपास ! कायसेसें म्हणता तुम्हीं तें त्यांतून रस्ते बांधणार. तेथें जाऊन अखेरीस मीं युनायटेड स्टेटचा अध्यक्ष होणार. मग युरोपवर मी स्वारी करीन. आणि अशी खोड मोडीन युरोपची कीं कधीं देखली होती कीं नाहीं. सैन्य म्हणाल, तर मी मुळीं युरोपमध्येंच खुद्द भाडोत्री लोक जमा करून सैन्य उभारीन. फ्रेंच, जर्मन, तुर्क सर्वांना एकत्र करून त्यांच्याच जातभाईविरुद्ध त्यांना लढायला लावीन. इलिया–डी–मुरोमेत्झनें नाहीं का तार्तरांच्या जोरावरच तार्तरांना जिंकलें ? पैसा असला तर इलिया व्हायला काय लागतें ? इलियाचसा काय पण युरोप उध्वस्त करून जूडास तूनिकाफलाही नोकर करायला वेळ कितीसा लागणार. शंभर रूबल दिले त्याला महिना तर तो सांगाल तें काम करील. शंकासुद्धां नको त्याची. परंतु त्याला नोकर ठेवणं, छे ! उपयोगाचं नाहीं तें. तो सुरवातीपासूनच चोऱ्या करील. ”

“ आणि शिवाय रोड बायको लठ्ठ बाईपेक्षां दुसऱ्याही तऱ्हेनें श्रेष्ठ आहे. माझ्या पहिल्या बायकोला वीसवार कापड लागे झग्यासाठीं. दुसरीला फक्त दहा वार पुरत असे. अन्नाचीही तीच गत. ” पाद्र्याचें पुराण जोरांत चालूच होतें.

“ दीड शहाण्यांनीं करुण दृष्टीनं शहाण्याकडे पाहिलें. एक डोळा त्याच्यावर रोखला व संकोचानें गोंधळलेल्या स्वरानें संभाषणांत भाग घ्यायला सुरवात केली.

“ मला पण बायको होती. ”

“ कोणालाही बायको असू शकतें. बरं चालूं दे तुझ्या थापा. ” काल्डांनीं मध्येंच तोंड उघडलें.

“ ती रोड होती खरी. पण फारच खादाड. तिच्या मृत्यूलाही तिचा खादाडपणाच कारण झाला. ”

“ तुम्ही वीष पाजलंत तिला. शंकाच नको त्याबद्दल. ” लिङ्गिनें मध्यें तोंड घातलें, तिआपाला चिडविणं संपलं होतं त्याचं.

" नाहीं. मुळींच नाहीं ! तिनं माशाचं लोणचं खाल्लं सपाटून. "

" एकाक्षा. तूंच वीष पाजलंस " लिव्हिंगनें आपल्या वाक्यावर जोर दिला. ही त्याची नेहमींचीच पद्धत होती. कांहींतरी मूर्खासारखं विधानं करायचं व सिद्ध करण्यासारखा पुरावा न आणतां तेंच पालुपद उगाळीत बसायचं, पोरकट खोड्या करायला सुरवात करायची आणि अखेरीस चिडून भडकायचं हें त्याचें नेहमींचेंच होतें. तेंच आतांही झालं. तारासनें आपल्या मित्राची बाजू घेतली.

" बायकोला मारायचं कांहीं कारण नव्हतं त्याला. "

" परंतु मी म्हणतों मारली म्हणून. "

" चूप ! " काल्डानी धमकाविलं.

त्यानां आलेल्या कंटाळयाचं हळूंहळूं रागांत रूपांतर होत होतें. आपला राग दाबण्याचा त्यांनीं शिकस्तीचा प्रयत्न चालविला होता ही गोष्ट वेगळी. खुनशी नजरेनें त्यांनीं सभोंवार पाहिलं. परंतु सर्वच मंडळीच्या डोळ्यांवर निशा आली होती. आपला राग काढण्याला कांहींच कारण न सांपडल्यानें काल्डा खाली मान घालून बसले. पण लवकरच तसं बसण्याचाही त्यांस कंटाळा आला. बसल्याजागींच त्यानीं जमिनीवर ताणून दिली.

" धूमकेतू " दातांनीं कांकड्या खात होता. आधीं कांकडी तोंडांत कोंबायची, व मग एकदम दोन तुकडे करायचे हा त्याचा उद्योग चालला होता. तो उपाशीं होता असं नव्हे, पण तसं करण्यांत त्याला मजा वाटत होती एवढंच.

मार्टिनाफनें एकदां जी बैठक घेतली होती त्यांत त्यानें काडीचाही बदल केलेला नव्हता. जणूं एखादा पुतळाच समोर ठेवलेला होता; त्यानेंही आतां काल्डाचें अनुकरण केलं. आपल्याच उदास विचारांत गुंग झालेली त्याची शून्य दृष्टी व्होडकाच्या पिंपावर खिळली होती. आतांपर्यंत अर्ध्यापेक्षां

अधिक पिंप रिकामं झालं होतं. तिआपा जमिनीवर नजर खिळवून तोंडानं मांसाचा तुकडा चघळीत होता. आपल्या पोटावर पडून लिव्हिंग सारखा खोकत होता. ढांसेच्या योगानं त्याचं सबंध शरीर उसळत होतं. बाकीची मंडळीही चूपचाप बसली किंवा पडली होती. तिन्ही सांजा टळल्या असल्यानं वाढत्या अंधारांत हे दुर्दैवी जीव आसपास उगवलेल्या गवतांपासून ओळखतां येत नव्हते. हातापायांची जुडी केलेली, अंगावर नुसती लक्तरें ह्यामुळें त्यांना विद्रुप जनावरांचं रूप प्राप्त झालं होतं. मनुष्यत्वाची चेष्टा करण्याकरितांच जणुं कोणी ह्या विचित्र जनावरांनां उत्पन्न केलें होतें !

तारास हलक्या आवाजांत गुणगुणत होते. त्यांनीं अलेक्झी मॅक्झिमोव्हिचला आलिंगन दिलं होतें. मॅक्झिमोव्हिच बावळटपणें हंसत होता. दीडशहाणा ह्या प्रकाराकडे अधाशी दृष्टीनें व आसक्तीनें चोरून पहात होता.

रात्र झाली. आकाशांत तारा चमकत होत्या. डोंगरावरील शहरांतले दिवेही लकाकत होते.

वाविलाफच्या दुकानाचं दार किरकिरत उघडलं गेलं. उघडतानां एक ग्लास फुटला देखील. दोन अनोळखी व्यक्ति हळू हळू ह्या मंडळीजवळ येऊन पोहोचल्या.

" काय व्होडकाचा सपाटा चाललाय ना. " एकानं ! भसाड्या घोगऱ्या आवाजांत विचारलं.

" नशीबवान लोक आहांत झालं. " दुसऱ्यानें हळूच पुस्ती जोडली. त्याच्या आवाजांत हेवा व आनंद ह्यांचं मिश्रण होतं. नंतर तारासच्या डोक्यावरून एक हात पुढें आला व त्यानं एक बाटली उचलली. ग्लासमध्यें व्होडका ओतण्याचा आवाज ऐकू आला. इतक्यांत कोणींतरी जोरानं खोकला.

"किती अरसिक आहांत रे सर्वजण ! एकाक्षा चल ये. आपण जुन्या आठवणी काढून एखादं गाणं म्हणू या."

शहाण्यानीं दीडशहाण्यानां सूचना केली.

" पण आधीं गाणं येतं कां ? " सिमत्साफनें विचारलं.

" कोणाला त्याला ? वाहवा ! हेंच माहीत आहे वाटतं इतक्या दिवस सहवासांत राहून ? चला म्हणूं येरे. "

दोघांनीं गायला सुरवात केली. तारासचा आवाज भसाडा बेताल होता. तर त्याच्या मित्राच्या पहाडी आवाजांत उत्तम रागदारी व तालबद्धता होती. ह्या मंडळीच्या आरडा ओरडण्याचे भयान प्रतिध्वनि उठत होते. आकाशांत दूरवर एक ढग उत्पन्न झाला. तो हळूं हळूं ह्या घराकडेच येत असावा असें त्याच्या गतीवरून दिसत होतें. मंडळीपैकीं एकजण डारडूर झोंपला होता. ह्यावेळीं बाकीची मंडळी अजूनही सर्वस्वी व्होडकाच्या कह्यांत गेली नसल्यानं खाद्य पेयावर वेडावांकडा हात मारीत होती, तर कोणी हलक्या आवाजांत मधूनच एखाद दुसरा शब्द उच्चारी. व्होडका व अन्न ह्यांची रेलचेल असतांही मंडळीचीं मनें कसल्या तरी अज्ञात कारणानं भारावलीं होती. नेहमींप्रमाणें कांहीं केल्या रंग कांहीं भरत नव्हता.

" तुमची ही कोल्हेकुई बंदकरा पाहूं क्षणभर. कोणीतरी गाडींतून येत आहे. " जमोनीवरून डोकं वर उचलीत व कान टवकारून कांहींतरी ऐकत असतां गाणाऱ्या मंडळीना काल्डार्नें इशारा दिला.

रात्रीच्या वेळीं ह्या भागांत गाडी येणं म्हणजे मंडळींना जरा चमत्कारिकच होतं. शहर सोडून येथल्या खांचा खळग्यांत जीव द्यायला कोण येतो रात्रीचा ! मग कोणाची गाडी ? कोण आलं असावं ? आणि कशासाठीं ?

गडबड थांबली. सर्वांच्या माना वर झाल्या. रात्रीच्या शान्तवेळीं गाडीच्या चाकांचा खडखडाट स्पष्ट ऐकूं येत होता.

गाडी जवळ आली.

" मग ती जागा कुठें आहे ? " कोणीतरी खसदिशीं विचारलें.

" समोरचं घर दिसतं तेंच असावं. " दुसऱ्यानें उत्तर दिलें.

" मीं मुळींच पुढं जाणार नाहीं आतां. " पहिला म्हणाला.

" इकडेच येताहेतसं दिसतं " काल्डानीं आपलं मत सांगितलें.

" पोलीस ! " घाबरलेलं कुजबुजणं ऐकूं आलं.

" पोलीस गाडींत कशाला येतील मूर्खांनों !" मार्टिनाफनें हलकेच त्या कल्पनेतील फोलपणा दाखवीत म्हटलें.

काल्डा जागचे उठले व फाटकाकडे चालूं लागले. काल्डाच्या मागून रस्त्याकडे मान उंचावून लीव्हिंगनें कान दिले होते.

" हीच धर्मशाळा कां ? " कोणीतरी फुटक्या आवाजांत विचारलें.

" होय, हीच आरिस्टाइड काल्डाची धर्मशाळा. काल्डाचें खणखणीत उत्तर होतं तें.

" बरोबर तीच पाहिजे. टिटॉफ रिपोर्टर येथेंच रहातातनां ? "

" हो त्यांना आणलं आहे वाटतं बरोबर ? "

" होय. "

" नशेंत ? "

" आजारी. "

" त्याचा अर्थ फार झाली आहे. मास्तर चला उठा. उतरा गाडींतून खालीं."

"थांबा अशी गडबड नका करूं. मी मदत करतों तुम्हाला. अत्यवस्थ आहेत ते अगदीं. दोन दिवस माझ्या घरीं होते. हातावर घ्या उचलून, आम्ही डॉक्टरला बोलाविलं होतं. परंतु आशाच नाही आहे कांहीं. "

तिआपा मुकाट्यानं उठून फाटकाकडे गेला. हेटाळणीचं हसूं हंसून स्कॅपनें आणखी एक ग्लास ढोंसला.

" दिवा आणारे इकडे !" काल्डानें आरोळी दिली.

धूमकेतू उठून आंत गेला व दिवा लावून घेऊन आला; दिव्याचा उजेड बऱ्याच दूरवर पडला होता. त्या प्रकाशाच्या मदतीनें काल्डानीं मास्तरनां आंत आणलं. त्यांच डोकं निजीर्व होऊन छातीवर झुकलं होतं. पायांत जोर नव्हता. हात हवेंतच लोंबकळत होते. जणूं काय हाताचा सांधा निखळला होता पूर्णपणें. तिआपाच्या मदतीनं त्यानीं त्याला एका बिछान्यावर निजविलं. मास्तरांनीं हातपाय पसरले. वेदनांनीं ते कण्हत होते व सर्व शरिरांतून चमका निघत होत्या त्यांच्या.

" आम्ही एकाच छापखान्यांत काम करतों. दुर्दैवी आहे बिचारा ! माझ्या घरीं रहा. मला कांहीं तकलीप नाहीं म्हणून किती सांगून पाहिलं, परंतु घरीं घेऊन चलण्याविषयीं त्यांनी सारखी विनवणी चालविली होती. घराचा नुसता ध्यास घेतला होता. अगदीं तडफड चालली होती त्यांची. त्यासाठीं मनासारखं न झाल्यानं कदाचित दुखणं वाढायचं म्हणून अखेर आज घेऊन आलों घरीं.

" मास्तरांचं दुसरं कुठें तरी घर असेल अशी तुमची कल्पना दिसते." काल्डाचा घसा घोगरा झाला होता. आपल्या मित्राकडे त्यानीं टक लावली होती. " तिआपा, थोडं थंड पाणी आणा पाहूं. "

" बरं. मला वाटतं माझे कांहीं आतां फारसें काम नाहीं. " इकडे तिकडे चोरटी नजर टाकीत तो छोटा मनुष्य म्हणाला.

" उपयोग ! कोणाचा उपयोग ? तुमचा ! " काल्डानें तिरस्कारानं त्याला न्याहाळलं.

नवीन माणसाच्या अंगावर खूपसा फाटलेला कोट असून, कॉलरीनं हनुवटीपर्यंतचा भाग झाकून घेतला होता. विजारीला ठिगळ होतं, तर कित्येक

वर्षं लोटल्यामुळें टोपीचा मूळ रंग ओळखतां येत नव्हता. त्याचा चेहरा दुष्काळांतल्या माणसाप्रमाणें दिसत होता.

" नाहीं. तुमचा कांहीं उपयोग नाहीं. तुमच्यासारखे दुसरे पुष्कळ आहेत येथें. " दुसरीकडं तोंड फिरवीत काल्डानीं अनुमती दिली.

" बरं. येतो मग. नमस्कार ! "

नवीन मनुष्य दरवाजापर्यंत गेला. तिथेंच थबकून तो म्हणाला, "माझं नांव रोझाफ. कांहीं कमी अधिक झालं तर ऑफिसांत कळवा. लहानसा मृत्युलेख लिहीन मी. कांहीं झालं तरी छापखान्यांतलाच कामगार होता. "

" हं ! काय म्हणालांत ? मृत्युलेख ? वीस ओळी, चाळीस कोपेक. मास्तर मेल्यावर मी ह्यापेक्षां असेंच करीन कीं, एक पायच तोडून पाठवीन ऑफीसमध्यें तुमच्या नांवावर. त्याचं मूल्य खात्रीनं ज्यास्त ठरेल. चांगले लठ्ठ पाय आहेत. तीन चार दिवस सहज पुरतील कीं. मास्तर जीवंत असतां त्याच्या रक्तावर तुम्हीं लोक जगलां हें मला माहित आहे. मेल्यावर त्याच्या शरीरावर जगा ! काय हरकत आहे ! "

कांहींतरी पुटपुटत तो मनुष्य दिसेनासा झाला. काल्डा मास्तरांच्या जवळ बसले. छाती व कपाळ पहात त्यानीं हांक मारली " फिलिप "

त्या घाणेरड्या भींतींतून प्रतिध्वनि उठला व नाहींसा झाला.

" उठरे दोस्त ! हें वेड्यासारखं काय ? " निपचित पडलेल्या मास्तराचे अव्यवस्थित झालेले केंस आपल्या हातानें सारखे करीत काल्डानीं फिरून मास्तरांना हांक मारली. मास्तरांना घरघर लागली होती. चेहऱ्यावर प्रेतकळा पसरत होती. काल्डानीं एक निश्वास टाकला. भुंवया कमालीच्या आकुंचित करून त्यानीं चोहोंबाजूला पाहिलें. दिव्याचा मंद उजेड पडला होता. ज्योत वर खाली होत होती. भींतीवर काळ्या सांवल्या नाचत होत्या. त्यांच्याकडे पहात, दाढीवरून हात फिरवीत काल्डा स्वस्थ बसला.

तिआपानें एक पाण्याची बादली आणून मास्तरांच्या बिछान्याजवळ ठेवली; व मास्तरांचा एक हात उचलून आपल्या हातांत घेतला. जणूं तो त्या हाताचं वजनच अजमावत होता.

" पाण्याची कांहीं जरूर नाहीं. " निराशपूर्ण स्वरानें काल्डा म्हणाले.

" पाद्र्याला बोलावलं पाहिजे ? " तो चिंध्या जमा करणारा म्हातारा म्हणाला.

" कशाची कांहीं जरूर नाहीं. " काल्डा उद्गारले. मास्तरांना पहात दोघेही चूप बसले थोडा वेळ.

" म्हाताऱ्या चल. एक ग्लास घेऊं या. "

" आणि ह्याचं काय ? "

" त्याच्यासाठीं काय करणार आतां ? "

तिआपानें मास्तरांकडे पाठ फिरविली. दोघेही अंगणांत येऊन मंडळींला मिळाले.

" कसं काय चाललं आहे ?" आपला धूर्त चेहरा काल्डाकडे वळवून लीव्हिंगनें प्रश्न टाकला. "

" नेहमीचंच. निराळे नाहीं कांहीं. मास्तर मरत आहेत झालं. " काल्डानें थोडक्यांत उत्तर दिलं.

" कोणींतरी मारलेलं दिसतं ! " कुतुहलपूर्वक लीव्हिंगनें दुसरा प्रश्न टाकला.

काल्डाकडून उत्तर आलं नाहीं. व्होडकाचा ग्लास रिकामा करण्याकडे त्याचं लक्ष होतं.

" जणूं काय त्याच्वा मृत्यूचीच मेजवानी आहे ही. " विडी पेटवीत लीव्हिंग बोलतच होता.

एकजण हंसला. दुसऱ्यानें सुस्कारा सोडला. परंतु लीव्हिंग व काल्डामध्यें चाललेल्या संभाषणाचा मंडळीवर फारसा परिणाम झाला नाहीं. कुतु-

हल, चिन्ता, विचार ह्यांचं जरा सुद्धां चिन्ह मंडळींत दिसलं नाहीं. मास्तर नेहमींच्या स्थितींत नाहींत हें सर्वांनीं पाहिलं होतं. परंतु आतां बहुतेक मंडळी नशेंत होती, आणि बाकिची चूप होती. बाह्य जगाचा संबंध जणूं त्यांनीं तोडला होता. फक्त डेकन तारासची भयंकर चलबिचल उडालेली दिसत होती. त्याचे ओंठ हालले. कपाळावरून हात फिरविला त्यानें आणि "मृत्यूनंतर तरी शान्ति लाभो ? " तो मोठ्यानें म्हणाला.

" चूप. काय बडबडतां आहां ?" लीन्हिंगन गुरकावलें त्याला.

" थोबाड फोडा लेकाचं ? " काल्डा म्हणाले.

" मूर्खा, कोणी मरत असलं तर चूप राहिल पाहिजे. शान्तीचा भंग करतां कामा नये. " तिआपाहि चिडले होते.

फिरून शान्तता पसरली. आकाशांत ढग पावसाची धमकी घालीत होते, म्हणून शान्तता होती. तर पृथ्वीवर पावसाळ्या रात्रीची स्तब्धता पसरली होती. झोंपलेल्या मंडळींच्या घोरण्यानं, ग्लासामध्यें ओतल्या जाणाऱ्या व्होडकाच्या आवाजानं व अन्नाच्या चावण्यानं मधून मधून शान्ततेचा भंग होई. तारास कांहींतरी बडबडत होते. ढग इतके खालीं उतरले होते कीं घराचं छप्पर ह्या मंडळीवर उलथून पाडण्याचा ढगांचा विचार असावा असा भास होत होता.

" जिवलग मित्र मरत असतां जीवाची कशी घालमेल होते ? " काल्डा अडखळत म्हणाले. त्यांचं मस्तक खालीं छातीवर टेंकलं होतं.

कोणीच्च उत्तरादाखल बोललं नाहीं.

" तुम्हां सर्वांत तोच हुशार, उत्तम व सच्चा मनुष्य होता. त्याच्या-साठीं माझे मन हळहळतं. "

" देवाच्या–घरीं–पोहोंचो बिचारा. ए! एकाक्षा उठ! आपण शोक गीत म्हणू या एखादं. " जवळच निजलेल्या आपल्याला मित्राला हालवित तारासची बडबड चालली होती.

" चूप राहतोस कीं नाहीं. " म्हणत चिडलेला लीव्हिंग ताडकन् उभा राहिला.

" मी जाऊन टाळकं शेंकतों त्याचं." मार्टिनाफ उद्गारला.

" काय ? झोंपला नाहींस अजून ? कळलं कां ? आपले मास्तर–" आरिस्टाइड काल्डाचा स्वर कमालीचा हळूवार झाला होता.

मार्टिनाफ कुशीवर वळला. उठून उभा राहिला. दरवाजांतून व खिडक्यांतून येणाऱ्या दिव्याच्या प्रकाशाकडे पाहिलें त्यानें. खांदे उडविले व तोंडावाटे एक शब्दही न काढतां मुकाट्यानं काल्डा शेजारीं जाऊन बसला.

" चला. आपण घेऊं या आणखी. "

दोघांनीं भराभर ग्लास रिकामे करावयास सुरवात केली.

"कदाचित् त्याला कांहीं हवं असेल. मी पाहून येतो." तिआप्पा म्हणाला.

" कांहीं नको. फक्त ' कॉफिन ' " घसा साफ करीत काल्डा उद्गारले.

" असं बोलूं नका बुवा !" कळवळून लीव्हिंगनें विनविलें.

तिआप्पा उठला व त्याच्या पाठोपाठ " धूमकेतू " तारासनेंही उठण्याचा प्रयत्न केला. पण तो फसल्यानं त्यानीं शिव्या द्यायला सुरवात केली.

तिआप्पा आंत गेला. काल्डानीं मार्टिनाफच्या खांद्यावर हात ठेवले व हळूंहळूं बोलावयास सुरवात केली.

" हें असं असतं. मार्टिनाफ सर्वांपेक्षां तुम्हालाच हें ज्यास्त वाईट लागायचं. तुम्हीं सर्वांत–पण हा विषय सोडलेलाच बरा. फिलिपबद्दल वाईट वाटतं कां तुम्हांला ? "

" नाहीं. तसा कांहीं प्रकार नाहीं. ह्या सर्व भावना विसरलों आहे मी. आयुष्याचा अगदीं कंटाळा आला आहे. कोणाचा तरी खून करण्याबद्दल मी जें बोललों तें अगदीं मनापासून होतं. " थोडा वेळ थांबून त्या माजी जेलरनें उत्तर दिलें.

" खरं! मग आणखी काय? चला आणखी एकेक ग्लास उचला की. " काल्डाचे शब्द भावनारहित होते.

" आपला उपयोग काय? काय किंमत आहे आपल्याला? फक्त वाटेल तेवढी व्होडका प्यावी आम्हीं. कोण आहे तेथें? गड्यानों मला म्हातान्यासाठीं एक ग्लास भरा कीं " सिमत्साफ झोंपेंतून बडबडतच जागा झाला होता. अगदीं आनंदांत होती स्वारी.

त्याच्या हातीं एक ग्लास देण्यांत आला.

पिणं संपल्याबरोबर तो फिरून कोणाच्या तरी अंगावर कोसळला.

त्यानंतर अगदीं पावसाळ्या रात्री सारखी तापदायक शान्तता होती. कांहींकाळानंतर थोड्या वेळानें कोणीतरी आपसांत कुजबुजले, त्याबरोबर " काय आहे? " करीत दुसरी मंडळी जागी झाली.

" कांहीं नाहीं. पण म्हटलं उमदा प्राणी होता. तल्लख डोकं होतं बेट्याचं. किती शांत आणि सभ्य! आणि पैसे मिळाले कीं मित्रमंडळीवर खर्च करायला कधींच कांकूं नव्हती त्याची."

फिरून मंडळीवर स्तब्धतेचं राज्यं पसरलं.

" तो चालला! "

तिआप्पाचा आवाज काल्डाच्या कानांत शिरल. ते उठले. स्वतःला सांवरीत घरांत जावयास निघाले.

" कशाला जातां आंत. तुमच्यावर सध्यां व्होडकाचा अंमल आहे. आंत जाणं चांगलं नाहीं हें कळत नाहीं का? " तिआप्पानें त्याला थांबविलें.

काल्डा घुटमळले; क्षणभर विचारांत पडले.

"ह्या जगांत कोणती तरी गोष्ट बरोबर आहे का? चल बाजूला हो."

तिआप्पाला एके बाजूस सारीत काल्डा पुढें सरसावले.

भींतीवर अजूनही सांवल्या नाचत होत्या. जणूं एकमेकांशीं लढत झगडत होत्या चूपचाप.

एका बिछान्यावर मास्तर पडले होते. घशाला शेवटची घरघर लागली होती. डोळे सताड उघडे होते. छाती मोठ्या कष्टानं उडत होती व तोंडाच्या कोंपऱ्यांतून फेस बाहेर येत होता. चेहऱ्यावर त्यांना होणाऱ्या वेदना स्पष्ट उमटल्या होत्या. जणूं कांहीं तरी महत्त्वाचं बोलायचं मनांत असून बोलतां येत नसल्यानं पराकाष्ठेच्या वेदना होत होत्या त्यानां.

आपले हात पाठीशीं घेऊन क्काल्डा मास्तरांच्या जवळ बसले. मरणाऱ्या मनुष्याकडे त्यांची नजर खिळली होती. दुःखानं घसा दाटला होता.

"फिलिप माझ्याशीं बोलायचं नाहीं कां? एक तरी शब्द बोल नारे! माझं तुझ्यावर केवढं प्रेम आहे माहीत नाहीं कां! बाकी मंडळी खरोखरीच पशूच्या कोटींतील आहेत. तुला एकट्यालाच मी मनुष्य समजतों. लोक दारुडा म्हणेनात. व्होडका पिण्यांत तरी किती वस्ताद होतास. तेंच तुझ्या नाशाला कारण झालं. तूं स्वतःवर दाब ठेवला नाहींस, माझं पण ऐकलं नाहींस तुला नेहमीं सांगत होतों. तरी ऐकलं नाहींस."

मृत्यु म्हणून ओळखली जाणारी ती अगम्य, सर्व–नाशी शक्ति! दारुड्याच्या संगतीनं तिचा अपमान झाला कीं काय कोणास ठाऊक. तिनं आपलं काम लवकर आवरतं घेण्याचं ठरविलं. मास्तरांच्या शरीरांतून चमक गेली; कण्हण्याचा आवाज आला. मास्तरानीं एक दीर्घश्वास सोडला. हात-पाय पसरले. झालं मृत्यूचंही काम संपलं.

शरिराला झोंके देत क्काल्डा बोलतच होते. "तुला काय होतंय सांगना? व्होडका आणूं का जरा? न पिणंच चांगलं आहे फिलिप. थोडा तरी खंबीर हो. बरं तुझी इच्छाच असली तर पी. खरं बोलायचं तर स्वतःचा जीव मारून तरी काय करायचं! काय उपयोग! असंच ना तुझं म्हणणं फिलिप?"

बोलता बोलतां पाय धरून काल्डानीं शव आपल्याकडे ओढलं. " आं ! शाबास तुझी ! इतक्यांत झोंपलासहीं. ठीक आहे झोंप. कांहीं हरकत नाहीं. गुड नाइट. उद्यां वाद करूं ह्यावर. तुझी खात्री पटवून देईन स्वतःवर निर्बंध घालण्यांत अर्थ नाहीं म्हणून. तेव्हां नीज आतां स्वस्थ मेला नसलास तर. "

काल्डा बाहेर गेला. तो जातांच खोलींत स्मशान शान्तता पसरली.

" तो झोंपला आहे किंवा मेला, काय तें नक्की नाहीं सांगतां येत. माझ्यावर जराशीं चढली आहे. " मंडळींना उद्देशून त्यानें सांगितलें.

तिआप्पा आणखीच वांकला. मार्टिनाफ कांहीं न बोलतां जमिनीवर निजला. छळ मार केलेल्या स्त्रीप्रमाणें 'धूमकेतू' वेड्यासारखे हुंदके देत धुमसत होता. लीव्हिग ह्या कुशीवरून त्या कुशीवर होत होता.

"सर्व एकदमच कां नाहीं मरत कोणास ठाऊक ? काय ताप आहे पहा ! मेला !–काय त्याचं ! मी स्वतःला कां त्रास करून घ्यावा ! माझी वेळ आली कीं, मलाही मरावं लागेल. अगदीं तो मेला तसंच. मी कांहीं इतरांपेक्षां ज्यास्त वाईट नाहीं."

लीव्हिग स्वतःशींच चिडून बोलत होता. त्याची वृत्ति बावरली होती.

" खरं आहे तें. सोळा आणे सत्य ! वेळ आली कीं आपण सर्वच मरणार. इतरांप्रमाणें मरणार. हाः हा ! आम्ही कसे जगतो हा कांहीं महत्वाचा प्रश्न नाहीं. पण मरणार मात्र सर्वांसारखेच ! मरण्यासाठींच तर मनुष्य जगतो. तेव्हां मनुष्य कसा मेला, कशानं मेला, कसा जगला सर्व सारखंच नाहीं कां ? काय मार्टिनाफ, मी म्हणतों तें बरोबर आहे कीं नाहीं ? मग चला तर आपण एक ग्लास घेऊं या. एक, दोन, तीन, जगतों आहों तोंपर्यंत ग्लास रिकामे करूं सारखे."

पावसाला सुरवात झाली होती; झोंपेमुळें किंवा नशेंत जमिनीवर अस्ताव्यस्त पडलेल्या ह्या बहिष्कृत मंडळीवर गडद अंधःकाराचं आवरण

पडलं. घरांतून येणारा दिव्याचा उजेड मंद होत होत नाहींसा झाला. वाऱ्यानं दिवा गेला असावा किंवा तेल संपलं असावं. घराच्या पत्र्यावर पडणाऱ्या पावसाच्या थेंबांचा टपटप आवाज होत होता. दूरच्या रस्त्यावरून जाणाऱ्या बैलांच्या गळ्यांतील घांटेचा आवाज ऐकू येत होता. पहिला आवाज नाहींसा होण्यापूर्वीच दुसरा प्रतिध्वनि उठे. ह्या शान्त वेळीं तो आवाज ज्यास्तच भयाण वाटत होता.

दुसरे दिवशीं तिआप्पा सर्वांचे आधीं उठला. पाठीवर पडून त्यानें आकाशाकडे पाहिलें. मारानं त्याची मान वांकडी पडली असल्यानें आकाशाकडे पाह्यचं असल्यास त्याला ह्याच एक मार्ग मोकळा होता.

अगदीं कंटाळवाणी सकाळ होती ती. हवा थंड, कुंद व दमट असून सूर्याचं दर्शन होत नव्हतं. आकाशाचा निळसरपणाही झांकला गेला होता. सबंध वातावरण उदास होतं.

तिआप्पा कुशीवर वळला. हाताच्या कोंपऱ्यावर शरीर पेलून व्होडका शिल्लक आहे का हें पाहण्याचा त्यानें प्रयत्न केला. बाटली जवळ पडली होती. पण रिकामी होती. सरपटत सर्वांजवळ जाऊन त्यांचे ग्लास त्यानें तपासले. सुदैवानें एक भरलेला ग्लास मिळाला त्याला. एका झपाट्यांत ग्लास रिकामा करून सदऱ्याच्या बाहीला तोंड पुसलं त्यानें.

" उठा! ऐकूं येतं कीं नाहीं?" काल्डाजवळ जाऊन त्यानें त्यांना उठविलें.

काल्डानीं डोकं वर उचलून आपल्या लाल, निस्तेज डोळ्यांनीं तिआपाकडे प्रश्नार्थक नजरेनें पाहिलं.

" पोलिसला वर्दी दिली पाहिजे. उठा !"

" कां ? काय भानगड आहे ?" अर्धवट झोपेंत असलेल्या काल्डांनीं त्रासिक स्वरानें विचारलें.

" तो मेला आहे विसरलांत ?"

" कोण ? "

" कोण ? मास्तर ! "

" फिलिप ! होय, मेला आहे खरा."

" आणि तुम्ही इतक्यांतच विसरलांत ? " तिआपाच्या स्वरांत राग होता.

काल्डा उठले. एक जांभई दिली. शरिरांतली हाडं काडकन मोडेपर्यंत शरीर ताठ करून आळस झाडला.

" ठीक आहे. जा, जाऊन वर्दी द्या. "

" अंहं मी नाहीं जात. त्या सभ्य लोकांबद्दल मला मुळींच प्रेम नाहीं !" तिआपा उदास भावानें म्हणाला.

"बरं तर. मग तारासला उठवा पाहूं. मी स्वतः जाऊन पहातों काय करतां येण्यासारखं आहे तें. "

" हं. तेंच नीट जमेल. उठारे ए पाद्या !"

काल्डा आंत गेले व मास्तराच्या पायथ्याशीं उभे राहिले. मास्तरांचं शरीर ताठ होतं. डावा हात छातीवर असून उजवा हात पाठीखालीं होता. जणूं सर्व शक्ति एकवटून कोणाला तरी मारावयास निघाले होते. मास्तर आतां उठले तर दीडशहाण्याएवढे उंच होतील. काल्डाच्या डोक्यांत विचार चमकून गेला. गत आठवणी काढीत ते आपल्या मृत मित्राच्या पायथ्याशीं बसले. सबंध तीन वर्षे त्यांनीं एकमेकांच्या सहवासांत काढलीं होतीं. आपली मान पुढें वांकवून तिआपा आंत आला. कोणाला तरी टक्कर द्यावयास निघालेल्या बकऱ्याप्रमाणें तो ह्यावेळीं दिसत होता. मास्तरांच्याजवळ बसून मास्तरांचा उतरलेला शान्त व थंड चेहरा बराच वेळ पहात होता तो.

" मेला आहे. शंकाच नको. चला माझी पण लवकरच पाळी येणार आहे. "

" ह्यापूर्वीच यायला पाहिजे होती. " काल्डा खिन्नपणें म्हणाले.

" खरं आहे. आणि तुमची सुद्धां. तुम्हींसुद्धां मरायला पाहिजे एव्हांना. तुम्ही जगतां त्या रितीनं आयुष्य घालविण्यापेक्षां मेले असतां तर फार बरं. "

" कदाचित आणखीच वाईट झालं असतं. तुम्हाला काय माहीत ?"

" आणखी वाईट होणं शक्यचं नाहीं. मेल्यावर ईश्वराशीं संबंध येतो. यथें मनुष्याशीं. आणि मनुष्यांना आपण ओळखतोच कसे असतात ते !"

" तें सर्व कबूल. पण तुमची कुरकुर बंद करा. " काल्डा रागानें म्हणाले.

सकाळच्या त्या अर्धवट प्रकाशांत घरांत गंभीर शांतता पसरली.

बराच वेळ दोघेही आपल्या मृत मित्राच्या पायथ्याशीं बसून होते. मधूनच ते त्याच्यावर दृष्टी टाकीत. परंतु दोघेही आपल्याच विचारांत गढले होते. नंतर तिआपानें सुरवात केली.

" आपणच अंत्यविधी करायचा का ? "

" आपण नाहीं. पोलीसलाच करूं द्या. "

" खरं पाहिलं तर तुम्हीच केला पाहिजे. वाविलाफनें दिलेले अर्जा-बद्दलचे पैसे तुमच्या जवळच आहेत. तुमच्या जवळ पुरेसे नसले तर मी भर घालतों."

" माझ्याजवळ त्याचे पैसे आहेत हें खरं. परंतु मी कांहीं अंत्यविधी करणार नाहीं. "

" तें चांगलं दिसत नाहीं. मेल्या माणसाला लुबाडण्यासारखं होतं. तुम्हाला त्याचे पैसे पचवायचे आहेत असं मी सर्वांना सांगेन.

" मूर्ख आहांत झालं. कांहीं कळत नाहीं तुला म्हाताऱ्या."

" तुम्हांला वाटतं तितका बावळट नाहीं मी. परंतु मला हें चागलं दिसत नाहीं खरं !"

" फार उत्तम ! परंतु मला एकटंच बसूं द्या पाहूं जरा. "

" किती पैसे होते ? "

" पंचवीस रुपये. " निष्काळजीपणें काल्डानीं उत्तर दिलं.

" उत्तम ! मला पांच रुपये देतां का त्यापैकीं. "

बिलंदर चोर आहेस कीं. तिआपाकडे वेडयासारखं पहात काल्डा गुरगुरले.

" आतां कां ? चला काढा !"

" सैतान नाहींतर. चल जा. मी स्मारक उभारणार आहे त्या पैशांतून."

" स्मारक उभारण्याचा त्याला फायदा ? "

" मी एक दगड व लंगर घेईन. दगडी कबर बांधीन त्यावर ठेवीन व त्याला लोखंडाच्या सांखळीनें लंगर बांधीन म्हणजे चांगलं जड होईल. "

" तें कशासाठीं ? वेडयासारखं काय बडबडतां."

" तुम्हांला काय करायचं त्याच्याशीं ? "

" कांहीं हरकत नाहीं. परंतु मी सर्वांना गोष्ट सांगितल्या खेरीज राहणार नाहीं." तिआपानें धमकी दिली.

काल्डानें त्याच्यावर शून्य दृष्टी टाकली पण अवाक्षरही काढलं नाहीं. मृत्यूच्या समोर नेहमीं भासमान होणारं अगम्य असं गंभीर वातावरण धर्मशाळेवर पसरलं होतं.

" हुश ! ते पहा आलेच." तिआपाचं लक्ष बाहेर गेलं. तो उठला व दरवाजाकडे गेला.

त्याचवेळीं एक पोलीस ऑफिसर, डॉक्टर व मॅजिस्ट्रेट आंत आले. प्रत्येकजण क्रमानं प्रेताजवळ जाऊन एका नजरेंत सर्व प्रकार समजल्यानं परत मधून मधून ते काल्डाकडे संशयित चोरटी नजर टाकीत होते.

आलेल्या लोकांकडे लक्ष न देतां काल्डा चूप बसले होते. अखेर पोलीस अधिकाऱ्यानंच प्रश्न विचारायला सुरवात केली.

" कशानें मेला ? "

" त्यालाच विचारा. मी म्हणतो संवय नसल्यामुळं. "

" तुझ्या बोलण्याचा अर्थ काय ?" मॅजिस्ट्रेटनें विचारलें.

"त्याला जें कांहीं होत होत त्याचा संशय नसल्यामुळें मेला. एवढंच माझं म्हणणं. "

" अस्सं ! बरेच दिवस आजारी होतां कां ?"

" त्याला येथें बाहेर आणलं तर बरें पडेल. तेथें कांहीं दिसत नाहीं. कदाचित कांहीं खुणा असतील ही." त्रासलेल्या आवाजांत डॉक्टर म्हणाले.

"प्रेत बाहेर काढण्यासाठीं कोणाला तरी बोलावून आण जा." पोलीस अधिकाऱ्यानें काल्डाला हुकूम सोडला.

" तुम्हीच बोलवा पाहिजे तर. मास्तर येथें राहिल्यास माझी कांहीं हरकत नाहीं."

" जातोस कीं नाहीं ? " अधिकारी रागानें ओरडला.

" ओरडणं सोपं आहे" काल्डा अगदीं थंडपणें दांत विचकीत म्हणाला. जागचा तो रेसभरही हलला नव्हता.

" गद्धा. जन्मभर याद राहील अशी तजवीज करतो बघ " तो काल्डावर खेकसला. रागानें अधिकाऱ्याचा चेहरा लालीलाल झाला होता.

" नमस्कार ! मंडळी ! पेतूनिकाफचा बुरसट पण लाघवी आवाज ऐकूं आला. पेतूनिकाफ दरवाज्यांतून आंतच येत होता. आवतीभोंवती जमलेल्या मंडळीचे चेहरे न्याहाळितांच तो चमकला. एक पाऊल मागे सरकला. त्याचा चेहरा क्रूर विजयी हास्यानं फुलला. गडबड काय आहे ? कोणाचा खून-बीन नाहीं ना झालेला ? काल्डाकडे कठोर नजरेनें पहात त्यानें विचारलें.

" असाच कांहींतरी प्रकार दिसतोय ! " मॅजिस्ट्रेटनें खुलासा केला.

पेतूनिकाफनें दीर्घ श्वास टाकला. देवा ! काय हें ! ह्याच कर्माला नेहमीं भीत आहे मी. मीं येथें आलों कीं नेहमीं आंत डोकावून पाही आणि भीतीनें लगेच मागें पाय घेत असे. घरीं असल्यावर माझ्या मनांत भयंकर विचार येत. देवा ! असल्या कृत्यापासून आमचं सर्वांचं रक्षण करीत जा. ह्या मनुष्याला जागा नाकारण्याचं कितीदां तरी माझ्या मनांत आलं. हाच ह्या टोळीचा नायक आहे. पण भीतीनें प्रत्येक वेळीं चूप बसलों मी. असे बदमाश आहेत म्हणून सांगू. तेव्हां जागा देणेंच मला योग्य वाटलें. नाहींतर दुसरेंच कर्म ओढवलं असतं. आपले हात आपल्या शब्दांच्या स्पष्टीकरणार्थ हलवीत पेतूनिकाफनें वाक्य पुरें केलें व फिरून एक सुस्कारा सोडला.

सर्व भयंकर मंडळी आहेत ही. आणि हा सद्गृहस्थ ह्या सोनेरी टोळीचा मुख्य. दरवडेखोरांचा सरदार आहे. "

" ठीक आहे ! आम्ही घेतोच त्याला हातांत. मी सुद्धां ओळखून आहे ह्या बेरडाला. " सूडबुद्धीनें क्राल्डाकडे पहात दरोगा साहेबांनीं अर्थपूर्ण उद्गार काढले.

" खरं आहे बेट्या. आपण मुळीं लंगोटीयार तर आहोंत मुळीं. " सलगीच्या स्वरांत क्राल्डा उद्गारले. कित्येकदां तुला व तुझ्या इतर दोस्तानां चुप राहण्यासाठीं मीं लांच दिलेला मला आठवतो."

" सभ्य गृहस्थहो ! ऐकलंत ना ! ह्या शब्दांची आठवण ठेवण्याची मी विनंती करतों. ह्याबद्दल मी क्षमा करणार नाहीं. आपली ओळख आहे काय ? पक्की आठवण राहील अशी व्यवस्था करतों. माझी सतत आठवण राहील असं बक्षीस लवकरच देतों तुला. "

" जंगलाच्या बाहेर पडेपर्यंत कोल्हेकुई करूं नये मित्रा !" क्राल्डा संथच होते.

चष्मा घातलेले तरुण डॉक्टर त्याच्याकडे प्रश्नार्थक दृष्टीनं पाहूं लागले. मॅजिस्ट्रेटची दृष्टीही तीक्ष्ण झाली. पण तींत एखाद्याची भलाई करण्याचं सामर्थ्य दिसत नव्हतं. पेतूनिकाफची दृष्टी विजयानंदानें नाचत होती. पोलीस इन्स्पेक्टरनें रागानं ओरडून घर डोक्यावर घेतलं.

दरवाजाशीं मार्टिनाफची काळिकभिन्न मूर्ति येऊन उभी राहिली. अगदीं शान्तपणें तो पेतूनिकाफच्या मागें येऊन उभा राहिला; इतक्याजवळ उभा होता कीं पेतूनिकाफच्या खांद्याला त्याची हनुवटी चिकटली होती जवळजवळ. त्याच्या पाठीमागून आपले सुजलेले लालभडक डोळे फाडीत तारास आंत डोकावत होता.

"बरं पण कांहीं तरी केलं पाहिजे." डॉक्टरनीं सुचविलें. मार्टिनाफच्या चेहऱ्यावर भीतीचं चिन्ह उमटलं. तो इतक्या जोरानें शिंकला कीं पेतूनिकाफ घाबरून ओरडला. त्यानं आपलं शरीर इतकं वांकविलं कीं तोल सुटल्यानं तो कोलमडतच इन्स्पेक्टर साहेबांच्या बाहुपाशांत जाऊन अडकला.

"हें पहा प्रत्यंतर ! हे लोक कशातऱ्हेचे आहेत हें आतां स्पष्ट झालं कीं नाहीं ? भीतीनं अजूनही कांपत असलेला पेतूनिकाफ मार्टिनाफकडे पहात इन्स्पेक्टरना उद्देशून म्हणाला.

काल्डाची हंसून मुरकुंडी वळली. मॅजिस्ट्रेट व डॉक्टर ह्यांनीं पण त्या हशांत भाग घेतला होता मोकळेपणानं. इकडे धर्मशाळेंत प्रत्येक मिनिटाला ज्यास्त ज्यास्त लोक जमा होत होते. लाल, सुजलेले डोळे, अस्ताव्यस्त केंस, झोंपाळू झिंगलेला चेहरा, अशा अवतारानं सर्व मंडळी ह्या तीन पाहुण्यांचं निरीक्षण करीत होती. पेतूनिकाफ तर सर्वांच्या ओळखीचा होताच.

"कोठें घुसतां ? चला फिरा पाठीमागें." बरोबर आलेल्या शिपायानं दंडुक्याच्या सहाय्यानं सर्वांना दरवाजापासून हटविण्याचा प्रयत्न केला.

परंतु तो पडला एकटा. इकडे दाराजवळील संख्येंत सारखी भर पडत होती. मग त्या शिपायाला दाद देणार कोण. प्रत्येकजण हळूंहळूं आंत घुसत

होता. व्होडकामुळें त्यांचा श्वास जोरजोरानें चालला होता. तर त्या कडवट वासानें खोली भरून गेली होती. काल्डानें एकदां सर्व मंडळीवर नजर टाकली. व नंतर अधिकाऱ्यांकडे वळला. अनिष्ट मंडळीचा हा एवढा समुदाय पाहून त्यांना आर्श्चर्य चमत्कारिक वाटूं लागलें होतें. शिवाय ते सांपडले होते त्यांच्यामध्यें. त्यामुळें त्यांना सुरक्षिततेची पण काळजी पडली होती आपल्या.

" सभ्यगृहस्थ हो ! माझे हे भाडेकरी व मित्र ह्यांची तुम्हाला ओळख करून दिली पाहिजे नाहीं ? कारण पुढें मागें तरी, आपलं कर्तव्य करीत असतां ह्यांची ओळख करून घेणं तुम्हाला जरूर पडेल कदाचित ! मग आतांच ओळख करून घेतलेली काय वाईट," टवाळी करण्याच्या उद्देशानें काल्डानें अधिकारी वर्गाशीं बोलण्यास सुरवात केली.

गुदमरलेल्या स्वरानं डॉक्टर हंसले. मॅजिस्ट्रेटनें आपले ओठ घट्ट आवळून चेहऱ्याला चंबूचा आकार दिला. इन्स्पेक्टर साहेबानी मात्र आलेल्या प्रसंगाला तोंड देण्याची तयारी दाखविली.

" शिझ्राफ शीळ घाल व ते आले कीं एक गाडी आणायला सांग," अंगणांत उभ्या असलेल्या शिपायाला त्यानीं ओरडून हुकूम दिला.

"ठीक आहे. रामराम ! मी पण जातों आतां. महाराज ! ही जागा आजच्या आज सोडून खाली करा. आपली सोय दुसरीकडे पहा. मला हें घर पाडायचं आहे. तरी त्याप्रमाणें तजवीज करा. नाहींतर मला अधिकाऱ्यांमार्फत उपाय योजावे लागतील." कुठल्यातरी कोंपऱ्यांतून पेतूनिकाफ बोलत होता.

अंगणांत पोलीसची कर्कश शीळ निनादत होती. धर्मशाळेतले रहिवाशी जांभया देत व अंग खाजवीत रस्ता अडवून दरवाजांत उभे होते.

" एकूण तुम्हांला ओळख करून घेण्याची इच्छा नाहीं तर. सभ्य गृहस्थाला शोभेसें नाहीं वर्तन हें" हंसत काल्डा बोलत होता.

पेतूनिकाफनें खिशांतून पाकीट बाहेर काढलं. थोडा वेळ हातांत चाळविलं. नंतर कांहीं तरी विचार नक्की करून एक रूबल बाहेर काढला व प्रेतापाशीं ठेवीत म्हणाला,

"ह्या पापी मनुष्याच्या क्रियेकरतां. देवानंही त्याला क्षमा करावी म्हणजे झालं."

"काय" तूं ? तूं अंत्यविधीसाठीं देणार ! चल. उचल तो रूबल. बदमाश ! परत घेतोस कीं नाहीं ? लांड्यालबाड्या करून मिळविलेला रूबल एका सच्च्या दिलाच्या माणसाच्या अंत्यविधीसाठीं देणार ? असा अपमान ! याद राख, हड्डीनहड्डी नरम करीन मी." काल्डा सिंहगर्जना करीत ओरडले.

"साहेब !" घाबरलेल्या पेतूनिकाफनें इन्स्पेक्टरचा हात घट्ट धरून ठेवला.

डॉक्टर व मॅजिस्ट्रेट गर्दीगर्दीनं बाहेर पडले. "शिड्राफ आंत ये." इन्स्पेक्टरनीं फिरून मोठ्यानें हांक दिली.

एकेकाळीं मनुष्यांत जमा असणाऱ्या प्राण्यांनीं, त्या माजी माणसांनीं, दरवाजाचा रस्ता रोखला होता. आंत चाललेला सीन ते अत्यंत आवडीनं पहात होते. त्यांचे मलूल चेहरे उत्तेजित झाले—उमलले. त्यांच्यांत जीवन्तपणा आला.

आपले रक्तासारखे लाल डोळे गरगर फिरवीत व दांत ओंठ चावून काल्डा अजूनही पेतूनिकाफवर ओरडतच होते.

"चोर, डाकू ! उचल तो रूबल ! दुष्ट प्राण्या ! उचल झटकन. नाहीं तर मेलास म्हणून समज." काल्डाच्या मुठी वळलेल्या होत्या.

पेतूनिकाफनें घाबरतच रूबल उचलण्यासाठीं हात पुढें केला व काल्डा जवळ आलाच तर स्वतःचं रक्षण व्हावं म्हणून दुसरा हात ढालीसारखा काल्डाच्या वळलेल्या मुठीसमोर धरून ठेवला.

" इन्स्पेक्टर साहेब तुम्ही व सभ्य मंडळींनों तुम्ही पण साक्षी आहांत बरं का ! "

" हलकट व्यापाऱ्या ! आम्हीं 'सभ्य गृहस्थ' कुठें आहोंत ! " लिव्हिंगचा किरटा आवाज होता तो.

रक्षणाकरतां इन्स्पेक्टरच्या पोटांत शिरण्याचा प्रयत्न करण्यासाठीं धडपड करीत असलेल्या हताश पेतूनिकाफचे रक्षण करीत असतां, तोंड वेडेंवांकडें करीत इन्स्पेक्टरनीं जोरानें शीळ घातली.

" अरे किड्या ! ह्या प्रेताच्या पायांची धूळ चाखायला लावीन तुला ह्याचा अपमान केल्याबद्दल. तूं काय समजलास. चल हो चालता ! " काल्डानीं पेतूनिकाफच्या कोटाची कॉलर पकडीत मांजरीच्या पिल्लाला फेंकावं तसं लीलेनें त्याला दरवाजाबाहेर ढकललें.

पेतूनिकाफला पडण्यापुरती जागा द्यावी म्हणून सर्व बहिष्कृत मंडळी एकदम बाजूला सरली. काल्डाच्या धक्क्यानं कोलमडून पेतुनिकाफ त्यांच्या पायाशीं जाऊन पडला. प्राणाच्या भीतीनं जोरजोरानं ओरडत होता तो.

" मला मारताहेत ! खून ! खून ! मला मारलं हो ! "

मार्टिनाफनें सावकाश पाय उचलला व त्याच्या डोक्यावर लाथ मारली. आनंदानं बेहोष झालेला लिव्हिंग त्याच्या तोंडावर बेधडक थुंकला. पेतुनिकाफ आपल्या हातापायाच्या आधारावर अर्धवट उठला व सरपटतच बाहेर अंगणांत आला. त्याच्या पाठोपाठ हंसण्याचे फवारे उडतच होते. ह्याच वेळीं आणखी दोन कॉन्स्टेबल आंत आले.

" पकडा त्याला ! बांधून टाका ! "

काल्डाकडे विजयी मुद्रेनें पहात इन्स्पेक्टरनीं हुकूम सोडला.

" मुसक्या बांधा चांगल्या आवळून. " दुरूनच पेतुनिकाफ ओरडत होता.

" मला हात लावाल तर खबरदार. मी पळून जात नाहीं. मला जायचं असेल तेथें जाईन मी. " आपल्या जवळ येणाऱ्या पोलिसाशीं झगडत काल्डा म्हणत होता.

एकएक जण भटक्या हळूहळू बाजूला झाला. गाडी अंगणांत आली. चिंध्या पांघरलेलीं एक दोन मुद्दाम बोलावून आणलेलीं अनोळखी माणसं मास्तरांचं प्रेत बाहेर काढीत होतीं.

" थोडा वेळ थांब. आतां दाखवतों तुला. " इन्स्पेक्टर काल्डाला धमकी देत होते.

" कसं काय काल्डा ? ठीक आहे. आतां तूं पकडला गेलास. आणखी थोडं थांब. म्हणजे चांगलं समजेल कसं आहे तें. " आपल्या शत्रूचा पाडाव होऊन त्याच्या मुसक्या बांधल्या गेलेल्या पाहून पेतुनिकाफला आनंदोर्मि उसळत होत्या. त्यानें काल्डाची कुचेष्टा चालविली होती.

परंतु काल्डा शांत होते. दोन कॉन्स्टेबलच्यामध्यें अगदीं ताठ व करारीपणानं उभं राहून मास्तरांचं प्रेत गाडींत कसं कोंबलं जातं तें पहात होते. त्या दोघांपैकीं एक मनुष्य लहान असल्यानं मास्तरांचे पाय व डोकं एकदम गाडींत जाऊं शकलं नाहीं. जणूं काय डोक्याच्या बाजूनं मास्तर गाडीबाहेर उडी घेऊन जमिनींत लपण्याची धडपड करीत होते. असं केलं तरच ज्यांनीं कधीं सुखाचा घांस एक दिवसही खाऊं दिला नाहीं, अशा मूर्ख व क्रूर लोकांपासून आपलं रक्षण होईल अशी त्यांची कल्पना असावी कदाचित.

" त्याला घेऊन जा. " काल्डाकडे इशारा करीत इन्स्पेक्टरनें पोलीसना सांगितलें.

एक शब्दही न बोलतां, भुवया वांकड्या करीत काल्डा अंगणांतून बाहेर पडला. मास्तरांच्या गाडीजवळून जात असतां तिकडे न पहातांच त्यानीं प्रेताकडे मस्तक लववलिं. दगडासारखा चेहरा करून मार्टिनाफ त्यांच्या पाठोपाठ जात होता.

पेतूनिकाफचं आवार झपाट्यानं रिकामं झालं.

'घीअं ऽ!' घोड्यांचे लगाम ओढीत गाडीवान ओरडला. त्या ओबड धोबड रस्त्यांमधून खडखडत गाडी चालू झाली. गाडीच्या हिसक्याबरोबर, थोड्याशा फाटक्या चिंध्यांनीं झांकलेलं मास्तरांचं शरीर वेडंवाकडं उसळत होतं. धर्मशाळा कायमची सोडली. आतां कधीं परत यावं लागणार नाहीं ह्या कल्पनेनें आनंदून मास्तर स्वस्थ चित्तानं जणूं उड्या मारीत होते.

पेतूनिकाफ बराच वेळ गाडीकडे पहात होता. नंतर आकाशाकडे पाहून त्यानें हात जोडले; व आपल्या कपड्यांना व टोपीला लागलेली घाण झाडली. समाधान व आत्मविश्वास त्याच्या चेहेऱ्यावर खेळूं लागला. पोलिसच्या पहाऱ्यांत पाठीशीं हात बांधून डोंगरमाथा चढत असलेला काल्डा त्याला दिसत होता. पेतूनिकाफ विजय मिळाल्याच्या आनंदानें हंसला व धर्मशाळेकडे वळला. पण एक दोन पावलं पुढें गेला नाहीं तोंच थांबला. भांबावला, दरवाजांतच एक भयंकर म्हातारा मनुष्य पेतूनिकाफच्या डोळ्याला डोळा भिडवून उभा होता. त्याचं तें उंच धिप्पाड शरीर चिंध्यानें झाकलं असल्यानें तो ज्यास्तच विद्रुप दिसत होता. हातांत काठी असून पाठीवर एक मोठी थोरली थैली होती. त्या ओझ्याखालीं तो बांकला होता. डोकें छातीवर पुढें आलें होतें. जणूं पेतूनिकाफला डोक्यानें टक्कर देण्याचाच त्याचा विचार होता.

"तूं कोण आहेस? काय पाहिजे तुला?" पेतूनिकाफ ओरडला.

"मी होय, मी मनुष्य!" घोगऱ्या भसाड्या आवाजानें तो किंचाळला. त्या आवाजाची पेतूनिकाफला मजा वाटली. त्याचें समाधान झालें.

"मनुष्य!" तुझ्यासारखा मनुष्य कधीं तरी झाला आहे काय जगांत?"

एका बाजूला होत त्यानें म्हाताऱ्याला रस्ता दिला. म्हातारा सरळ त्याच्यासमोर आला. तो कांहीं तरी पुटपुटत होता.

" माणसं वेगवेगळ्या प्रकारचीं असतात. जशी देवाची मर्जी असेल त्याप्रमाणें. कोणी माझ्यापेक्षां वाईट असतात इतकंच. माझ्यापेक्षां सहस्रपटीनं किळसवाणीं. "

आकाशांत ढग गर्दी करत होते. एक मनुष्य आपल्या तीक्ष्ण डोळ्यांनीं तेथल्या जमिनीची मोजणी व पहाणी करीत चालला होता. कसला तरी हिशोबही चालला होता त्याचा तोंडानें. त्या जुनाट घराच्या छपरावर एक कावळा बसून कावकाव करीत होता. विजयानें उन्मत्त होऊन आपली पुढें आणलेली मान इकडे तिकडे हालवीत होता.

आकाशाला व्यापून टाकणारे ढग हळूहळूं खालीं उतरूं लागले. ह्या उदास, दुःखी व पिळल्या जाणाऱ्या पृथ्वी वरील सर्व घाण, मळ आपल्या पावसाच्या पाण्यानें वाहून नेण्यासाठीं जणूं ते तयार झाले होते. पण काय करावयाचें व कशारीतीनें करावयाचें हे नक्की न ठरल्यामुळें गोंधळून जागच्या जागीं उभे होते.

( Creatures that once were men ह्या गोष्टीचा अनुवाद.)

——— ——



२

# जिगर दोस्त



एकाचं नांव ' जिग–लेग ' आणि दुसऱ्याचं होतं ' होपफुल.' उचले होते दोघेही.

ते शहरच्या बाहेर गल्लयाकुचांतून रहात व आसपासच्या खेड्यापाड्यांतून हातीं पडेल तें पळवीत. खुद्द शहरांत त्यांचा धंदा चालणं कठीण होतें. त्या लायकीचे शेजारी नव्हतेच त्यांचे.

दोघेही डामडौली नव्हते उगाच. शिवाय काळजीनेंही रहात. एखादा कपडा, शेतकऱ्याचा कोट, कोंबडी वगैरे उचलण्या पलिकडे मजल गेली नव्हती त्यांची. इतकं असूनही आसपासचे लोक त्यांना पक्के ओळखून होते. क्वचित्प्रसंगीं मरे मरेतों मार देण्याची धमकी द्यावयासही चुकत नसत ते त्यांना. परंतु ह्या सहा वर्षांत त्यांना तशी संधी मिळाली नसल्यानं त्यांची हाडं जागेवर शाबूत होतीं.

'जिगलेग'ची चाळीशी उलटली होती. तो भरपूर उंच परंतु तितकाच किरकोळ होता. चेहरा ओढलेला असून दृष्टी नेहमीं जमिनीकडे वळलेली असे. दोन्ही हात पाठीमागें एकांत एक अडकवून ऐटीत लांब लांब पावलें टाकीत चालत असे. चालत असतां त्याची तीक्ष्ण नजर चौफेर टेहळणी करण्यांत गुंतलेली असे. लष्करी धाटणीच्या मिशांनीं त्याची जिवणी झांकून गेली होती.

त्याचा डावा पाय किंचित मोठा असल्यानें चालताना तो पाय तो ओंवाळून टाकीत असे. आणि म्हणूनच लोक त्याला जिगलेग ह्या टोपण नांवानें संबोधित असत.

आपल्या सहकाऱ्यापेक्षां 'होपफुल' पांच वर्षांनीं लहान होता. तोही उंचा पुरा असून छाती चांगली भरीव होती. त्याला मधून मधून खोक-ल्याची ढांस लागत असून चेहऱ्यावरचीं हाडें वर आलीं होतीं. त्याचा चेहरा पिवळा असून त्यानें दाढी वाढविली होती. चालतानां तोंडाचा चंबू करून आपल्याशींच गुणगुणण्याची किंवा शीळ घालण्याची संवय होती त्याला. 'होपफुल' एका शेतकऱ्याचा मुलगा होता.

दोघांनीं मिळून अनेक उद्योग केले होते; आणि अखेर उचल्याचा धंदाही सुरूं केला त्यांनीं. तोही एकमतानेंच. "ही दुकल कधीं मरणार कोण जाणें." आसपासचे लोक म्हणत.

दोघही आसपासचीं खेडीं पायाखालीं तुडवींत किंवा शहराबाहेरच्या जंगलांत किंवा एखाद्या गल्लीकुचीत विश्रांति घेत. पोटाची खळगी भरण्या-साठीं धंदा कसा चालवावा, लोकांना चुकविण्यासाठीं नवीन कल्पना काय योजाव्या, ह्याचा विचार करण्यांत ते वेळ घालवीत. परंतु टेहळणी करण्याचं काम त्यांचे डोळे कधींच थांबवीत नसत.

× × × ×

थंडी कडाडली. त्यावर्षी लांडग्यांचीसुद्धां अगदीं दैना उडाली होती. मग ह्या दोन मित्रांच्या दुर्दशेला पारावार नव्हता म्हटलें तरी चालेल. लांड-ग्यांना आपण जीवें मारत असलों तरी त्यांची भीतीही वाटते आपणांला. कारण नखें, दांत ही संरक्षणाचीं साधनें असतात त्याच्यापाशीं. आणि सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे त्यांच्या हृदयाला पाझर फुटणारा नसतो. अवलौकिक बुद्धिवैभव किंवा पशूचें हृदय जवळ असलें तरच मनुष्य जीवनकलहांत यशस्वी होत असतो असा जगाचा न्यायच आहे मुळीं.

थंडीची प्रखरता ह्या मित्रद्वयाला चांगलीच भोंवली. संध्याकाळच्या वेळीं दोघेही भिक्षा मागायला बाहेर पडत. परंतु त्यांचं सारं लक्ष पोलीसला चुकविण्याकडे असे. एखादी वस्तु पळविणेंही त्यांना साधत नसे ह्यावेळीं. थंडीच्या दिवसांत खेड्यापाड्यांतून जाण्यांत अर्थच नव्हता कांहीं. शिवाय बर्फावर पावलें उमटून पोलिसांना निष्कारण माग मात्र मिळावयाचा. त्यामुळें भुकेशीं झगडण्यांत ह्या मित्रद्वयाची शक्ति क्षीण झाली होतीं बरीचशीं. अधीरतेनें ते वसंताची वाट पहात होते. वसंताच्या आगमनाबद्दल ह्यांच्याइतकी उत्कंठा दुसऱ्या कोणाला क्वचितच लागली असेल.

अखेर एकदांचा वसंत आला. भुकेनें गडबडलेले ते दुबळे जीव बाहेर पडले. शेतावरील बर्फ विरत होता झपाट्यानं, आणि हिरवेहिरवे ठुबके मधूनच दिसत होते. कुरणें आरशाप्रमाणें चकाकत होती आणि ओहोळ मंजुळ नाद करीत वाहात होते. सूर्याचीं किरणें गारठलेल्या जीवांना नवचेतना देत होतीं. जमीन किती दिवसांत वाळू शकेल ह्यावर त्यांचे अंदाज सुरूं झाले. 'होपफुलला' रात्री झोंपही धड लागत नसे. सकाळ झालीं कीं घरट्यांतून बाहेर पडणाऱ्या पक्षांकडे त्यांची आशाळभूत नजर लागायची. हळूं हळूं आपली जाळीं दुरुस्त करायला घेतलीं त्यांनीं.

शेतांत जाऊन हिरव्याचार गवतावर त्यांनीं जाळीं पसरवावीत. भुकेले पक्षी अन्नासाठीं वणवण फिरत असतां त्या जाळ्यांत येऊन अडकत. प्रत्येक पक्षामागें त्यांना पांच किंवा दहा कोपेक मिळत. पुढें ' नेटल ' फळांचा हंगाम आला. तीं फळें वेंचून विकणं हाही त्यांचा धंदा होता. सारांश वसंतांत त्यांना रोज नवीन नवीन कामं मिळूं लागली. पोटाची खळगी थोडीफार भरूं लागली. प्रत्येक गोष्टीचा उपयोग करून घेत ते. 'मश्रुम' ' स्ट्रॉबेरी,' ' फुंजी,' कांहीं सोडलं नाहीं त्यांनीं. कित्येक वेळा शिपाई कवाइतीसाठीं त्या मैदानांत येत. कवाइत संपल्यावर शिपायांनीं निशाणबाजी करताना उडविलेल्या बंदुकीच्या गोळ्याही ही जोडी गोळा करी. पौंडाला वीस कोपेक ह्या हिशेबानें

विक्री होत असे ह्या गोळ्यांची. अर्थात भुकेनं मरण्याची पाळी ह्या मित्रद्वयावर आली नाहीं खरी. परंतु पोटभर जेवण्याचं समाधान व त्यामुळं वाटणारा उत्साह मात्र त्यांच्या वाट्याला कधींच येऊं शकला नाहीं.

× × ×

एप्रिलचा महिना. वृक्षांना नुकताच बहर आला असून पालवी फुटत होती. गवत नुकतंच वर डोकावीत असून सूर्यप्रकाशाची मजा चाखीत असावं असा भास होत होता. आमची ही जोडी विड्या फुंकीत रस्त्यानं चालली होती.

" तुझा खोकला बळावत चालला आहे." जिगलेग जरा दटावणीच्या आवाजांत बोलत होता.

" अं. त्यांत काय मोठसें ! आता बरें वाटेल पहा. "

" उगाच घमेंड नको. दवाखान्यांतच गेलं पाहिजे. "

" कशासाठीं ? मरायचं असलं तर येथेंच मेलेलें काय वाईट ? "

" तेंही खरंच म्हणा ! "

ते जात असलेल्या रस्त्याच्या दोन्हीकडेनें 'बर्च' वृक्ष असून त्यांच्या कोंवळ्या पानांची सावली पडली होती. रस्त्यांतून चिमण्या इकडून तिकडे उडत बागडत होत्या.

" तुझी पावलंही सरळ नाहीं पडत. " थोडा वेळ थांबून जिगलेगनें फिरून बोलावयास सुरवात केली.

" कारण ही दमट हवा असल्यानं मला गुदमरल्या सारखं होतं. नीट-श्वास नाहीं घेतां येत. " इतक्यांत त्याला ढांस लागलीच.

विडी फुंकीत जिगलेग जवळच उभा होता. आपल्या सोबत्यावरची त्याची नजर जराही चळली नव्हती. होपफुलचा चेहरा हिरवानिळा होत चालला. दोन्ही हातांनीं त्यानं छाती दाबून धरली होती. त्याचं सबंध शरीर घुसळलं जात होतें.

" कांहीं झालं तरी फुस्फुसांना चांगलाच ताण बसतो एवढें खरं. "

चिमण्यांना भिववून दोघही रस्ता चालूं लागले.

"चला. आपण खेड्याजवळ पोहोंचलोंच कीं. आतां एक चक्कर मारली पाहिजे. कदाचित् कांहीं हाताला लागण्याचा संभव आहे. नंतर मास्कोव्हाला बळसा घालून घराकडे परतायचं. " विडीचें थोटूक फेकीत जिग--लेग म्हणाला.

" म्हणजे ? तीस व्हर्स्टची* मजल झालीच कीं. फुकट न जावो म्हणजे झालं. "

डाव्या हाताला वळले ते. ह्या बाजूला वसंताचा अजून शिरकाव झालेला नव्हता. चोहोंकडे निराशेची अवकळा पसरली होती. एक खेंचर मात्र रवंथ करीत भटकत होतं उगाच. त्याची बरगडीन् बरगडी मोजून घेतां येण्याजोगी होती. हळूंहळूं पाय उचलीत बर्फाखालील गवत हुडकीत होतं तें.

" उपाशी दिसतंय बिचारं. " होपफुल म्हणाला.

" जी SSS ! " जिग-लेगनें हांक दिली त्याला.

खेंचरानें कान टवकारलें. नकार दर्शक मुंडी हालवून त्यानं जमिनीकडे फिरून नजर लाविली.

" आपण आवडत नाहीं त्याला !" होपफुल म्हणाला.

" चल आपण त्याला पकडूं या. 'जिप्सींच्या'* हवाली केलं तर सहा सात रुबल्स तरी सहज हातीं येतील. "

" मला नाहीं वाटत. काय करणार अशा मरतमढ्याला घेऊन ते ?"

" कातडं तर आहे. "

" कातडं ? त्यासाठीं इतकी रक्कम देतील असं वाटतं ? कातडं तरी कामाचं आहे कां ? जोड्याचं चामडें तरी बरं म्हणवेल ह्यापेक्षां. "

---

* व्हर्स्ट=रशियन मैल अदमासें ३५०० फूट.

* जिप्सीः-युरोपांतील देशांतून-आपल्या इकडील काबुली' बलुची, वडारी वगैरे प्रमाणें फिरणाऱ्या भटक्या लोकांच्या टोळ्या.

" परंतु थोडं बहुत तर देतील. "

" हो. तें मात्र खरं. "

जिग–लेगनें आपल्या कॉमरेडकडे पाहिलें.

" काय ? " त्यानें पृच्छा केली.

" चमत्कारिक वाटतंय जरा."

" कां बरं ? "

" जमीन ओलसर आहे. माग राहील. खेंचराला कुठें नेलं हें कळेल तेव्हांच. "

" तिच्या खुरांना फडकी गुंडाळूं या. "

" जशी मर्जी. "

" चल ! प्रथम जंगलांत तर घेऊन जाऊं या. रात्र झाली कीं जिप्सींकडे जाऊं. कांहीं लांब नाहीं फार. फक्त तीन व्हर्स्ट. "

" चला तर. पण कांहीं झालं तर ? "

" कांहीं होत नाहीं नी जात नाहीं. " जिग-लेगच्या आवाजांत उद्धत आत्मविश्वास होता.

सभोंवार न्याहाळत खेंचराला घेऊन ते जंगलांत घुसले. खेंचर खेंकाळत त्यांच्याकडे पहात होतें.

* * * *

' अस्पन ' वृक्षांच्या राईत दोघेही बराच वेळ बसून होते. समोरच एक लहानशी शेकोटी जळत असून मधून मधून त्यांत ते काटक्या कुटक्या घालीत होते. आसपास लहान लहान ओहोळ खळखळत असून त्या आवाजानें तेथील शांतता भंग पावत होती. वरची माती पाण्यानं वाहून गेल्यानं क्वचित एखाद्या वृक्षाचीं मुळें असहायतेनें आपलं दरिद्री रूप दाखवीत

होतीं. एखाद्या जुन्या पुराण्या स्मशान भूमींतील शांतता आसपास पसरली होती. शेकटीच्या जवळच एका खोंडाला खेंचर बांधलेली असून तिचं तोंड होपफुलच्या फाटक्या चिंध्यांनीं बांधून टाकलं होतं.

पाय पोटाशीं घेऊन होपफुल जमिनीवर पडला होता. नजर विस्तवावर स्थिर असून तोंडानं कांहींतरी गुणगुणत होता. कसल्या तरी विचारांत असावा तो. त्याचा सोबती 'ओसियरच्या' कोंवळया डहाळया खुडून त्यांची टोपली विणण्यांत गर्क होता.

जवळच वहाणारा ओढा होपफुलची साथ करीत होता. क्वचित जाळही फुरफुरे.

"मग काय म्हणणं आहे ? केव्हां निघायचं ?" होपफुलनें विचारलें.

"अवकाश आहे अजून. चांगला अंधार पडल्याशिवाय जातां येणार नाहीं आपल्याला." काम न थांबवितांच जिग-लेगनें उत्तर केलें.

होपफुल खोकत होता.

"गारठलास ?" बराच वेळानं जिग–लेगनें विचारिलें.

"नाहीं.... तसं नाहीं.... परंतु कशानं तरी अस्वस्थ वाटतंय खरं."

"काय वाटतं ?"

"छाती धडधडतेय."

"ताप चढलाय का ?"

"असं वाटतं. दुसरंही कांहीं कारण असेल कदाचित."

थोडा वेळ चुप होते दोघेही. अखेर जिग–लेगनेंच शान्तता मोडली.

"विचार करायचं सोडून दे बरं."

"कसला ?"

"कोणत्याच गोष्टीचा करूं नकोस."

होपफुल एकदम उत्तेजित झाला "असं कसं म्हणतोस" त्या खेंचराकडे पाहिलं कीं माझी खळबळ उडते. माझीही एक घोडी होती. थेट

अश्शीच अगदीं. जातिवंत जनावर होतं. कोणतंही काम करून घ्या तिच्याकडून. एकेकाळीं जोडी होती माझ्याजवळ. चांगला धंदा चालत असे तेव्हां."

" कुठं वहावतो आहेस. असल्या गोष्टी नाहीं आवडत मला. जुन्या गोष्टी म्हणजे मेलेलीं मढीं. तीं उकरून रडण्यांत काय अर्थ ?" जिग—लेगनें तुटक उत्तर दिलं.

होपफुल कांहीं बोलला नाहीं. मुठभर काटक्या उचलून त्यानें आगटींत टाकल्या'व उडणाऱ्या ठिणग्याकडे पहात स्वस्थ बसला. त्यानं मध्येंच खेंचरावर दृष्टी टाकली. बराच वेळ एक टक दृष्टी लावली होती त्यानें. त्याच्या चेहऱ्यावर क्षणोक्षणीं भाव बदलत होते.

जमिनीला खिळल्याप्रमाणें खेंचर निश्चल उभी होती. चिंध्या गुंडाळल्यामुळें तिचं डोकं ओळखतांही येत नव्हतें.

" उगाच कुरकुर करण्यांत काय अर्थ ? प्रत्येक गोष्टीकडे निर्विकार गोष्टीनं पाह्यला शिकलं पाहिजे. दिवस रात्र ही यावयाचींच आयुष्यांत. जेवायला मिळालं तर आनंद आहेच. परंतु नाहीं मिळालं तर कुरबुर करून काय फायदा. मनस्ताप करून उपयोग काय ? तुझी बोलण्याची पद्धत तर फारच वाईट. ऐकावसं सुद्धां वाटत नाहीं. परंतु आजारी आहेस तूं म्हणून" जिग—लेग आवेशानं बोलत होता.

" तसंही असेल कदाचित. माझं मन दुबंल म्हणूनही असं होत असणार." होपफुल खाली मान घालून बोलत होता.

" त्याचंही कारण तुझं हृदय कावलं आहे हेंच. मला नाहीं वाटत कांहीं सुद्धां."

खेंचर पाय झाडीत होती. होपफुलची नजर तिच्यावर खिळली होती. जिग—लेगचं काम झपाट्यानें चालू होतें.

" आतां घोडीं उरली तरी कुठें !" होपफुल एकाएकी उद्गारला. त्याच्या पापण्यांची झपाट्यानें उघडझांप होत होती.

" त्याच्याशीं काय करायचं तुला ?" जिगलेगनें कठोरतेनें विचारलें.

" कांहीं नाहीं. आपली अशीच एक गोष्ट आठवली." होपफुलचा स्वर लज्जित झालेला होता.

" कसली गोष्ट ? "

" माझ्या एका शेजाऱ्याची घोडी चोरीला गेली होती. मायकेल नांव त्याचं. अशीच चरत असतां नाहींशीं झाली ती घोडी. इतका रडला तो त्याला समजलं तेव्हां. त्याचा पाय मोडल्याप्रमाणें वाटलं त्याला."

" मग."

" किती दिवस तरी दुःख करीत होता तो."

" आणि तुझा संबंध कसा पोहोंचतों त्यांत. "

त्या तीक्ष्ण स्वरानं होपफुल शरमला. ओशाळला.

" कांहीं नाहीं. आपली सहज आठवण झाली इतकच. कारण घोडी नसली तर शेतकऱ्याचं काय राहिलं ? घोडी म्हणजे शेतकऱ्याचा प्राण."

" पण मायकेलबद्दल तुला हळहळ कां वाटावी ? कांहीं अर्थ आहे कां तुझ्या बटवटींत ? "

" दुसऱ्याबद्दल कींव वाटणें साहजीक नाहीं का ? "

" कींव ! आपल्याबद्दल कोणी दाखविली कां कधीं ?"

" ह्याचा अर्थ ?"

" चूप बैस. जायची वेळ होइल लवकरच. "

" लवकरच ? "

" होय. "

होपफुल शेकटी जवळ ज्यास्तच खसकला. व हातांतील काठीनं त्यानं काटक्या चाळवल्या. जिगलेग आपल्या कामांत गढला होता. होपफुल बराच वेळ त्याच्याकडे पहात होता.

" आपण त्या खेंचराला. मोकळं सोडलं तर ? " त्यानें हलकेंच विचारलें,

" तुझ्या स्वभावाला औषध नाहीं खरं. " जिगलेग रागानें म्हणाला.

" तसं नाहीं. परंतु ह्या खेंचराला चार व्हर्स्ट न्यायचं म्हणजे कठीण काम. त्यांतून जिप्सींनीं नाहीं घेतलं म्हणजे ? "

" तें पाहून घेईन मी. "

" मर्जी तुझी. "

फिरून थोडा वेळ शान्तता पसरली.

होपफुलनें आतां स्वतःशीच बोलायला सुरवात केली.

" खेंचराला सोडलं म्हणून कांहीं बिघडणार नाहीं फारसं. अजून रात्र आहे. कांहीं ना कांहीं मिळेलच बाहेर गेलों कीं. ह्या खेंचराला विकून पैसे तरी काय येणार आहेत मोठेसे. "

त्या स्वगत भाषणानं जिग–लेग चिडला. त्यानें दांत ओंठ खाल्ले. पण बोलला नाहीं कांहीं. त्याच्या हातांतील डहाळ्या मात्र मोडत होत्या भराभर.

" आज काल शेतांत ढोरं असतात. बदकं आहेत. "

" सर्व ओंकून टाकायला किती वेळ लागेल. " जिगलेग संतापून ओरडला.

" स्टीफन रागावूं नकोस. पण खरंच सांग. तिला सोडलं तर कांहीं बिघडेल का ? "

" कांहीं खाल्लस कां आज ?" जिग-लेग खेकसला.

" नाहीं. " खालच्या मानेनें होपफुलनें उत्तर दिलें.

" राहीनास कां उपाशी. मला काय त्याचं. " जिगलेगचा चेहरा रागानें लाल झाला होता. त्यांत विस्तवाचा प्रकाश पडल्यानें तो ज्यास्तच लाल दिसत होता. त्यानं आपल्या डहाळ्या वगैरे गोळा करून त्यांचं गांठोडं बांधलें.

" ही भावनाप्रधानताच आवडत नाहीं मला. तुला काय वाटेल तें म्हण. पण तुझा स्वभाव बदलणार नसेल तर आपलं पटायचं नाहीं. मीं अखेरचें सांगतों तुला. "

" तूं चमत्कारिकच आहेस. "

" उगाच पोकळ बडबड नको. "

होपफुल कांहींच बोलला नाहीं. त्यानं एक सुस्कारा सोडला. हळूंहळूं तो उठला. खेचराजवळ जाऊन तिला त्यानें मोकळें सोडलें.

" चला आपण जाऊं या. " तो म्हणाला.

त्या काळोखांतून दोघेही चालले होते. खेंचर त्यांच्या पाठीमागून चालली होती. मध्येंच ती ठेंचाळली. पाण्यांत पडली.

" वेडपटाबाई. पडलीस ना पाण्यांत. " होपफुल उद्गारला.

जिग-लेग चिडलेला होता. कांहीं बोलला नाहीं तो.

भयाण शान्तता पसरली होती. मधूनच बाजूला सारलेल्या फांद्यांचा सळसळ आवाज होई.

चंद्र हळूंहळूं वर येत होता. त्या प्रकाशानं तेथील काळोखाला धुक्याचं स्वरूप आलं होतं. त्यामुळें तें जंगल ज्यास्तच गडद भासे. एकंदर वातावरण गंभीर व उदात्त होतं. अंधुक चंद्रप्रकाशांत 'बर्च' वृक्षाचे नवीन अंकुर जळत्या मेणबत्ती प्रमाणें दिसत होते तर ओक वृक्षाची छाया चंद्रप्रकाशाला आपल्या जागेंत शिरण्याचा प्रतिरोध करीत होती.

दोघेही चुपचाप चालले होते. त्या अंधारांतून चालणं कठीण जात होते. दोघेही ठेंचाळत, अडखळत, चिखलांत रुतत. होपफुलसारखा धावत होता. जिग-लेग पुढें चालला होता. त्या धिप्पाड शरिराची भव्य सावली होपफुलवर पडली होती.

" आपण कोठें चाललों ? " त्यानें मध्येंच विचारलें. परंतु उत्तर नाहीं.

"भाई, कसं तरीच वाटतंय मला." फिरून होपफुलनें बोलण्याचा प्रयत्न केला.

"भलतंच. असं कसं होईल." जिग–लेग टोंचून उद्गारला.

"श्वास नाहीं घेववत."

"कां बरं?"

"कारण तब्येत ढांसळते आहे."

"अहं. तुझा मूर्खपणाच आहे कारण त्याला कळलं कां?" मध्येंच थबकून जिग–लेग सोबत्याकडे वळून म्हणाला. बोलताना त्यानें आपले एक बोट त्याच्या नाकासमोर धरलें होतें.

होपफुलनें मान ज्यास्तच खालीं घातली. आपण अपराधी आहों असंच त्याचं मन त्याला खात होतें.

"खरी गोष्ट आहे." तो हलकेंच म्हणाला. त्याला आणखीही कांहीं बोलावयाचं होतं असं दिसत होतं. परंतु खोकल्याचा उमाळा आल्यानें ते शब्द ओंठातल्या ओंठांत जिरले. बराच वेळ खोकत होता तो. त्याचं तोंड सताड उघडं असून मस्तकाला हिसके बसत होते.

जिगलेग त्याच्या पांढुरक्या चेहऱ्याकडे पहात राहिला. "सबंध जंगलाला जागं करशील तूं." जरा वेळानं तो तुसड्या आवाजांत उद्गारला.

खोकल्याची ढांस ओसरली. मान वेळावून होपफुलनें सुटकेचा निश्वास सोडला.

"खालीं बैस. विसावा घे थोडावेळ" जिगलेगनें हुकमी आवाजांत सूचना केली.

"दोघही झाडाखाली त्या गार जमिनीवरच बसले. जिगलेगनें एक विडी पेटविली व त्या धुराकडे पहात त्यानें हळूंहळूं बोलावयास सुरवा केली.

"हें पहा. आपल्याला घर असतं तर आपण घरीं परतलों असतों आपल्या..."

" खरं आहे " मान दुसरीकडे फिरवीत होपफुलनें दुजोरा दिला.

" परंतु आपल्याला घर नाहीं. तेव्हां आपण पुढेंच गेलें पाहिजे, पटतं ना माझं म्हणणं." सोबत्याकडे भेदक दृष्टी लावून जिग-लेग बोलत होता.

" होय. आपल्याला पुढें गेलं पाहिजे. माघार घ्यायला जागा नाहीं खरी. " होपफुल कळवळून बोलत होता.

" तेव्हां आपल्याला गेलंच पाहिजे. परत फिरायला जागाच नाहीं. मग त्याबद्दल बोलून हळहळून तरी फायदा काय ? आणि ह्याचं खरं कारण म्हणजे आपला मूर्खपणा. किती कमालीचे मूर्ख आहोंत आपण ! "

जिग–लेगचा कठोर, रुक्ष स्वर हवेंत घुमत होता. होपफुलच्या मनाची चलबिचल झाली. त्याला स्वस्थ बसवेना. जमिनीवर पालथा पडला तो. त्यानं एक दीर्घ सुस्कारा टाकला. त्या आवाजांत एक तऱ्हेची घरघर होती.

" शिवाय दुसरी गोष्ट म्हणजे मला खायलाही हवें असतें. भयंकर आवड आहे मला त्या गोष्टीची. " उदास भावानं आपलं भाषण जिग-लेगनें संपविलें.

होपफुल एकदम उठून उभा राहिला. त्याचा चेहरा निश्चयी दिसत होता.

" कां. काय झालं ? " जिग-लेगनें विचारलें.

" चला. आपण जाऊं या पुढें. "

" अरे वा ! एकदम इतका उत्साह ! "

" चल उठ आधीं. "

" चल तर. परंतु असल्या क्षणिक उत्साहांत अर्थ नाहीं." उठत जिग-लेग म्हणाला.

" अं. काय होणार असेल तें होईल. पर्वा कोण करतंय त्याची ? " जणूं येणारं संकट हातानंच उडवून देत तो म्हणाला.

" सर्व उत्साह परत आला तर ? छान ! "

" काय ? मला सारखा टोंचून खातो आहेस. सारखी टवाळी चालविली आहेस. आणि...देवा !"

" मग उगाच गोंधळ कशाला माजवतोस ? "

" गोंधळ माजविला ?"

" होय."

" हें पहा. मला किती वाटलं म्हणून सांगूं. "

" कोणाबद्दल ? आणि कशाबद्दल "

" कोणाबद्दल ? त्या मनुष्याबद्दल असेल कदाचित. "

"त्या मनुष्याबद्दल ? छान. बरं ही घे थोडी तपकीर. ओढ न जा सर्व विसरून. तुझं मन थोर आहे खरं, पण अक्कल नाहीं. त्या मनुष्याचा न तुझा कांहीं अर्थाअर्थी संबंध ? कसं समजावून सांगूं तुला ? तूं त्याची कींव करतोस. परंतु तुझ्या गळयाला नख लावण्याची, तुला टोपी घालण्याची त्यांची खटपट थांबते कां कधीं ? "

"आपली कृति कबूल कर, कीं त्या दयेबद्दल तुला ही मंडळी जेल दाखवितील कीं नाहीं सांग. किती वेडपट आहेस तूं ? दया हं ! तुझ्याशीं वाद घालताना कीं नाहीं थकलों मी अगदीं. लोकांची कींव करण्याऐवजीं स्वतः-चीच कींव करीत जा कीं. काय मनुष्य आहेस अजब ? म्हणे दया येते ! वाहवा ! दया ! छी. ! "

जिग--लेगचा पारा फिरून चढला. सहकाऱ्याबद्दल वाटणारी तुच्छता न उपहास पुरेपूर भरला होता त्या वाक्यांत. त्याचा स्वर चरचर कापीत जाणारा होता. शब्दांच्या पडसादानं झाडांच्या फांद्या आणि झुडपें ह्यांच्या मधून सळसळ आवाज उठला. जणूं त्या कठोर सत्याला त्यांनीं दुजोराच दिला तो.

होपफुल हें सर्व भाषण शांतपणें ऐकत होता. चालतानां त्याचे पाय लटलट कांपत होते. हात बाहींतून काढून घेतले होते त्यानें. त्याचं मस्तक विचारामुळं छातीला टेंकलें होतें.

"ठीक आहे. अजून काय झालं? मी सर्व बरोबर करतों पहा. खेड्याजवळ पोहोचलों कीं मी एकटाच पुढें जाईन. आणि तावडींत येणारी पहिलीच वस्तु घेऊन परत येईन पहा. माझी करामत पहाच. एक चकार शब्द बोलूं नकोस." त्याचे शब्द अस्पष्ट उमटत होते. छातींतून चमत्कारिक आवाज निघत होता. जिग--लेग चरकला. तो एकदम थबकला. कांहीं तरी बोलावसं वाटलं त्याला. परंतु हात हालवून त्यानें ते शब्द परत पाठविले. आणि तो फिरून चूपचाप चालूं लागला.

"दोघेही बराच वेळ कांहीं न बोलतां हळूहळू चालले होते.

जवळपास कोंबड्याचं आरवणं, कुत्र्याचं भोंकणं ऐकूं येऊं लागलें. दूर अंतरावर असलेल्या चर्चमधील घंटेचा सादही त्या जंगलच्या गंभीर वातावरणांत घुमूं लागला.

होपफुलनें एकदम बैठक मारली. "तूं जा एकटाच. मला येववत नाहीं. मी येथेंच रहतों. ज्यास्त कांहीं करतां येत नाहीं मला. माझा जीव घाबरा होत आहे. चक्कर आल्यासारखं वाटतंय." तो एकएक शब्द कष्टानं उच्चारीत होता.

"छान? काय थोडीशीही कळ नाहीं सोसतां येत आणखी?"

"नाहीं."

"अभिनंदनच केलं पाहिजे तुझं ह्या दुर्बलतेबद्दल."

"कांहीं शक्तिच उरली नाहीं माझ्यांत."

"नवल नाहीं. म्हणून कालपासून पोटांत अन्नाचा कण नसतानाही भटकतों आहोंत आपण."

"नाहीं. म्हणून नाहीं. पण माझं संपलं आयुष्य. पाहिलंस कां रक्त कसं टिपकतं आहे तें."

होपफुलनें आपला हात उचलून जिग–लेगच्या समोर धरला. सबंध हात रक्तानं माखला होता. जिग–लेग घाबरला. त्याचा स्वर मंदावला.

" काय करावं बरं ?" त्यानें विचारिलें.

" तूं जा पुढें. मी एकटाच राहतों. जरा विश्रांति घेतों. "

" कुठें बरं जाऊं मी ? खेड्यांत जाऊन सांगूं कां कोणाला तरी जंगलांत एक मनुष्य आजारी आहे असं. कळलं तर येईल कोणीतरी मदतीला कदाचित. "

" नको...ठार मारतील आपल्याला." त्याला फिरून ढांस लागली. एकदम रक्ताची गुळणी आली त्याला.

" कसं वाटतंय आतां ?" त्याच्या पाठीवर हात फिरवीत पण दुसरीकडे पहात जिगलेगनें विचारलें.

"कांहीं आशा नाहीं." होपफुलचा आवाज मोठ्या कष्टानें उमटत होता.

" बोलावतोंच कोणाला तरी. "

" कोणाला बोलावणार ? " होपफुलच्या आवाजांत निराशा ओत-प्रोत भरली होती.

" मग थोडासा चालूं शकशील कां आणखी ?"

" नाहीं. "

जिग-लेग कॉमरेडच्या उशाशीं बसला. त्यानं आपल्या गुढघ्या भोंवती हाताचा विळखा घातला होता. होपफुलच्या चेहऱ्याकडे तो निश्चल मुद्रेनें पहात होता. होपफुलची छाती उडत होती, घशाला घरघर लागली होती. डोळे निस्तेज पडत चालले. ओंठ विलग होऊन दांतांची कवळी उठून दिसूं लागली. तोंडांतून फेंस बाहेर येत होता.

" अजून रक्त जातंय ? " जिग-लेगनें मृदु भावानं विचारलं. भाव-नांचं कांहीं विलक्षण मिश्रण होतं त्या विचारण्यांत.

" हं. " असा कांहींसा उद्गार त्याला ऐकूं आला. त्यानं आपल्या गुडघ्यावर मस्तक ठेवलें.

एका बाजूला पहा- असून त्याच्या उतरणीवर लहान लहान झुडपं पसरलीं होती. त्या खोऱ्यांत मात्र ओक, ॲस्पन वगैरेसारखे वृक्ष खडे होते. चंद्र प्रकाशत होता. स्वप्नांत दिसणारा देखावा होता तो. जीवनाचा रंग त्यांत दिसत नव्हता. वाहत्या ओढ्यालाही जणूं मृत्युकाळची घरघर लागली होती; एकंदर देखावा भयाण, मनाला उदास करणारा असाच होता.

" मरणार मी. " होपफुल अस्फुट स्वरांत पुटपुटला. परंतु दुसऱ्याच क्षणीं त्याचा आवाज उत्तेजित झाला.

" स्टीफन मरतों. जातों आतां." तो खणखणीत आवाजांत म्हणाला.

जिग–लेग कांपत होता. त्याला हुडहुडी भरली होती जणूं. आपल्या आवाजानं त्या शान्ततेचा भंग होईल अशीच त्याला भीति वाटत असावी. अगदीं हलक्या, मृदु आवाजांत तो बोलत होता.

" भाई, घाबरतोस काय असा! तुला वाटतं तसा प्रकार नाहीं. साधा खोकला आहे हा. खरंच भिण्यासारखं कांहीं नाहीं ह्यांत. भाई, हुषार हो बरं. "

" देवारे ! अयाईग !" होपफुलचे कण्हत उद्गार आले.

" भाई, घाबरूं नकोस. शान्त रहा. आतां ही कळ नाहींशी होईल पहा." त्याच्या कानाशीं लागून जिग–लेग त्याचं, किंवा स्वतःचं म्हटलं तरी शोभेल, समाधान करीत होता.

फिरून तीच ढांस. आणि नंतर झपाट्यानं पळत आल्यासारखा दम लागला त्याला.

" भाई, क्षमा कर...माझं कांहीं चुकलं असेल...ती घोडी...भाई, क्षमा करशील ना !" तो अडखळत बोलत होता.

" तूंच क्षमा कर मला." जिग–लेग त्याला मधेंच थांबवून म्हणाला.

" मी कुठें जाऊं ? काय होणार माझं एकट्याचं ? " थोड्या वेळानें तोच फिरून उद्गारला हताशपणें.

" घाबरूं नकोस. देव तुला..." त्यानें वाक्य पुरं केलें नाहीं. त्याच्या घशांत कफ वाजूं लागला. त्यानें पाय ताणले.

जिग–लेग सारखा त्याच्याकडे विस्फारीत नेत्रांनीं पहात होता. त्याची पापणीसुद्धां लवली नाहीं. कांहीं क्षणांचाच अवकाश पण युगाप्रमाणं वाटला त्याला.

होपफुलनें जरासं डोकं उचललें. परंतु लगेच खालीं पडलें तें.

" भाई, काय हवंय ? " खालीं वांकत जिग-लेगनें विचारलें. त्याला उत्तर मिळालें नाहीं.

कडवट नजरेनें आपल्या मित्राकडे पहात जिग-लेग थोडा वेळ तिथेंच बसला. हळू हळू तो उठला. त्यानं टोपी काढली. छातीवर क्रॉस केला. आणि धीमीं पण निश्चयी पावलं टाकीत त्यानें पर्वताची चढण चढावयास सुरवात केली.

दिशा नुकत्याच उजळत होत्या. धूसर आणि निरुत्साही वातावरण पसरलं होतं. ओढ्याचा खळखळाट शान्ततेचा भंग करीत होता.

कसला तरी आवाज झाला. कदाचित एखादी कपार कोसळून ओढ्यांत पडली असावी. पक्षी दचकून उठले; दुसरीकडे गेले. सकाळच्या प्रशांत वेळीं दऱ्याखोऱ्यांतील आवाज फार वेळ घुमत नाहींत; उठतात न लगेच विरतात. तो ओढा मात्र करुण गीत गात होता अजून ही.

# ३

# हिरवं मांजर

——:०:——

माझ्या कोठडीची खिडकी बरीच उंच असल्यानें तिच्यांतून पहाणाराला जेलच्या आवारांतील देखावा स्पष्ट दिसत असे. खिडकी कसली, उजेडासाठीं तो झरोकाच होता म्हणाना! थोड्याच उंचीवर छपराच्या उतरत्या कडेला लागूनच कबुतरांनीं आपलं घरटं बांधलं होतं. भींतीशीं टेबल सरकावून त्यावर उभें राहून जेलच्या आवारांतली मजा मी पाहूं लागलों कीं हीं कबुतरं माझ्या डोक्यावर घुमत.

जेलमधल्या रहिवाशांची ओळख करून घेण्याचे मला बरेंच प्रसंग येत असल्यानें बहुतेक सर्वांना मी ओळखत होतों. ह्या पिकल्या व गंभीर चेह-ऱ्यांच्या वस्तींत झांझुब्रिन नांवाची व्यक्ति आनंदीत, हंसतमुख म्हणून प्रसिद्ध होती.

औरस चौरस अन दाणगट मनुष्य होता तो. भव्य कपाळ व फुगीर गाल ह्यांमधील ते मोठाले पाणीदार डोळे चमकत असत सारखे. टोपी नेहमीं पाठी-मागें कललेली, शर्टच्या गुंड्या सदैव न लावलेल्या. त्याची प्रत्येक हालचाल त्याच्या आनंदी स्वभावाची साक्ष पटवीत असे. राग आणि उदासीनता त्याला शिवलीच नव्हतीं कधीं.

सदैव हंसणारा, दुसऱ्याला हंसविणारा गडबड्या स्वभाव होता त्याचा. साहजिकच कैदी नेहमीं त्याच्या भोंवती जमा होत. निरनिराळ्या युक्त्या प्रयुक्त्यांनीं तो पण कैद्यांच्या दुःखपूर्ण उदास जीवनांत जराशी रम्यता आण-ण्याचा प्रयत्न करी.

एकदां त्यानं तीन उंदरांना पकडलें व त्यांच्या तोंडांत लगाम घातली. गाडीला जुंपण्यासाठीं घोडेच तयार केले होते त्यानें जणूं ते. परंतु कधींमधीं त्याच्या खोड्या त्रासदायक असत. एकदां एक पोरगेलासा कैदी भींतीला टेंकून झोंपी गेला होता. त्या मुलाचे केंस बरेंच लांब होते. झांझुब्रिननं ते केस भींतीवर डकविले. बिचाऱ्याला कापून काढावे लागले केंस.

झांझुब्रिनाशिवाय आणखी एक प्राणी मंडळीच्या आवडीचा होता. तो म्हणजे एक मांजर. गुबगुबीत, लहान आकाराचं, लालसर रंगाचं, आणि अत्यंत खेळकर असं हे छोटेसेंच पिल्लू असून मंडळीचं तें एक करमणुकीचें साधन होतें. त्याच्या पाठीमागून धावायचं, त्याला एका हातावरून दुसऱ्या हातावर झेलायचं, त्याला सर्कशींतले खेळ शिकवायचे, वगैरे आवडते खेळ होते त्या मंडळीचे.

मांजर दिसलं कीं मंडळीचं लक्ष झांझुब्रिनवरून उडायचं. साहजिकच त्याला ही गोष्ट पसंत पडण्यासारखी नव्हती. कलावन्त होता तो. आणि इतर कलावन्ताप्रमाणेंच त्यालाही स्वतःविषयींचा फाजील अभिमान होता. एका यत्किंचित मांजरानं त्याचा श्रोतृगण हिरावून न्यावा हें अर्थातच त्याला रुचण्यासारखें नव्हतें. अशावेळीं एकटाच तो एका कोंपऱ्यांत जाऊन बसे. त्या मांजराला हा मारल्याशिवाय रहाणार नाहीं असं वाटलं मला. सर्वांच्या विचाराचं आपणच केंद्र असावं ह्यासाठीं धडपडणाऱ्या ह्या आनंदी जीवाची कींवही वाटली मला. लोकांना खुष करण्याची ही जी ओढ असते तीच मनुष्याच्या उन्नतीस मारक ठरते अखेरीस.

तुरुंगांत जीवन कंठायचं असलं कीं तेथील भींतीला लागलेल्या वाळवीचं जीवनही मनोरंजक वाटायला लागतं. जेल आवारांतील मंडळीचे खेळ पहाण्याची माझी उत्सुकता किंवा त्या मनुष्याला मांजराबद्दल वाटणारा हेवा वगैरे गोष्टी. ज्यांनीं तुरुंगाचा अनुभव घेतला आहे त्यांनाच ह्यांतील रहस्य उलगडूं शकेल.

* * * *

सूर्य चांगलाच प्रकाशत होता त्या दिवशीं. हळूंहळूं आवार कैद्यांनीं फुलूं लागलें. तुरुंगाला नुकताच हिरवा रंग देण्यांत आला होता. ती रंगाची बादली अजूनही आवारांतच पडली होती.

झांझुब्रिनच्या डोक्यांत कांहींतरी कल्पना चमकली. त्यानं आपल्या मिशा रंगविल्या. लालबुंद चेहऱ्यावरील त्या हिरव्या मिशा पाहून सर्वांना हंसूं लोटलें.

३

# हिरवं मांजर

——:०:——

माझ्या कोठडीची खिडकी बरीच उंच असल्यानें तिच्यांतून पहाणाराला जेलच्या आवारांतील देखावा स्पष्ट दिसत असे. खिडकी कसली, उजेडासाठीं तो झरोकाच होता म्हणाना! थोड्याच उंचीवर छपराच्या उतरत्या कडेला लागूनच कबुतरांनीं आपलं घरटं बांधलं होतं. भींतीशीं टेबल सरकावून त्यावर उभें राहून जेलच्या आवारांतली मजा मी पाहूं लागलों कीं हीं कबुतरं माझ्या डोक्यावर घुमत.

जेलमधल्या रहिवाशांची ओळख करून घेण्याचे मला बरेंच प्रसंग येत असल्यानें बहुतेक सर्वांना मी ओळखत होतों. ह्या पिकल्या व गंभीर चेहऱ्यांच्या वस्तींत झांझुब्रिन नांवाची व्यक्ति आनंदीत, हंसतमुख म्हणून प्रसिद्ध होती.

औरस चौरस अन दाणगट मनुष्य होता तो. भव्य कपाळ व फुगीर गाल ह्यांमधील ते मोठाले पाणीदार डोळे चमकत असत सारखे. टोपी नेहमीं पाठीमागें कललेली, शर्टच्या गुंड्या सदैव न लावलेल्या. त्याची प्रत्येक हालचाल त्याच्या आनंदी स्वभावाची साक्ष पटवीत असे. राग आणि उदासीनता त्याला शिवलीच नव्हतीं कधीं.

सदैव हंसणारा, दुसऱ्याला हंसविणारा गडबड्या स्वभाव होता त्याचा. साहजिकच कैदी नेहमीं त्याच्या भोंवती जमा होत. निरनिराळ्या युक्त्या प्रयुक्त्यांनीं तो पण कैद्यांच्या दुःखपूर्ण उदास जीवनांत जराशी रम्यता आणण्याचा प्रयत्न करी.

एकदां त्यानं तीन उंदरांना पकडलें व त्यांच्या तोंडांत लगाम घातली. गाडीला जुंपण्यासाठीं घोडेच तयार केले होते त्यानें जणूं ते. परंतु कधींमधीं त्याच्या खोड्या त्रासदायक असत. एकदां एक पोरगेलासा कैदी भींतीला टेंकून झोंपी गेला होता. त्या मुलाचे केंस बरेंच लांब होते. झांझुब्रिननं ते केस भींतीवर डकविले. बिचाऱ्याला कापून काढावे लागले केंस.

झांझुब्रिनशिवाय आणखी एक प्राणी मंडळीच्या आवडीचा होता. तो म्हणजे एक मांजर. गुबगुबीत, लहान आकाराचं, लालसर रंगाचं, आणि अत्यंत खेळकर असं हे छोटेसेंच पिल्लू असून मंडळीचं तें एक करमणुकीचें साधन होतें. त्याच्या पाठीमागून धावायचं, त्याला एका हातावरून दुसऱ्या हातावर झेलायचं, त्याला सर्कशींतले खेळ शिकवायचे, वगैरे आवडते खेळ होते त्या मंडळीचे.

मांजर दिसलं कीं मंडळीचं लक्ष झांझुब्रिनवरून उडायचं. साहजिकच त्याला ही गोष्ट पसंत पडण्यासारखी नव्हती. कलावन्त होता तो. आणि इतर कलावन्ताप्रमाणेंच त्यालाही स्वतःविषयींचा फाजील अभिमान होता. एका यत्किंचित मांजरानं त्याचा श्रोतृगण हिरावून न्यावा हें अर्थातच त्याला रुचण्यासारखें नव्हतें. अशावेळीं एकटाच तो एका कोंपऱ्यांत जाऊन बसे. त्या मांजराला हा मारल्याशिवाय रहाणार नाहीं असं वाटलं मला. सर्वांच्या विचाराचं आपणच केंद्र असावं ह्यासाठीं धडपडणाऱ्या ह्या आनंदी जीवाची कींवही वाटली मला. लोकांना खुष करण्याची ही जी ओढ असते तीच मनुष्याच्या उन्नतीस मारक ठरते अखेरीस.

तुरुंगांत जीवन कंठायचं असलं कीं तेथील भींतीला लागलेल्या वाळवीचं जीवनही मनोरंजक वाटायला लागतं. जेल आवारांतील मंडळीचे खेळ पहाण्याची माझी उत्सुकता किंवा त्या मनुष्याला मांजराबद्दल वाटणारा हेवा वगैरे गोष्टी. ज्यांनीं तुरुंगाचा अनुभव घेतला आहे त्यांनाच ह्यांतील रहस्य उलगडूं शकेल.

* * * *

सूर्य चांगलाच प्रकाशत होता त्या दिवशीं. हळूंहळूं आवार कैद्यांनीं फुलूं लागलें. तुरुंगाला नुकताच हिरवा रंग देण्यांत आला होता. ती रंगाची बादली अजूनही आवारांतच पडली होती.

झांझुब्रिनच्या डोक्यांत कांहींतरी कल्पना चमकली. त्यानं आपल्या मिशा-रंगविल्या. लालबुंद चेहऱ्यावरील त्या हिरव्या मिशा पाहून सर्वांना हंसूं लोटलें.

त्याचं अनुकरण म्हणून दुसऱ्या एकानं आपला वरचा ओंठ रंगविण्याला सुरवात केली. झांझुब्रिनला आवडलं नाहीं तें. बचकन रंगांत हात बुडवून त्यानें त्या माणसाच्या अंगावर झाडला. त्याचा सर्वच चेहरा चित्रित झाला. त्यानं मान फिरविली. झांझुब्रिन टाळ्या वाजवीत त्याच्या भोंवतीं नाचत होता; तर मंडळींत हंसण्याचे फवारे उठत होते.

इतक्यांत कुठुनसें तें मांजर आलं तिथें. अगदीं ऐटींत चाललं होतं तें. मंडळीच्या पायाखालीं तुडवलं जाण्याची भीतिसुद्धां वाटली नाहीं त्याला.

" पुसी आली बरं का " कोणाचं तरी लक्ष गेलं तिकडे.

" पुस, पुस, चल ये इकडे. " प्रत्येकानं मांजरीला जवळ घेऊन कुरवाळण्यास सुरवात केली.

" किती गलेलठ्ठ होत आहे पुसी ? "

" आणि पंजा तरी पहा कसा आहे तो. "

" जाऊं द्या हो ! सोडा. तिला मोकळं. "

मांजरीबरोबर खेळ सुरूं झाला. झांझुब्रिन एकटाच मिशावरचा रंग पुशीत उभा होता.

सर्वांच्या पाठीवर आलटून पालटून उड्या मारणाऱ्या पुसकडे त्याचंही लक्ष वेधलें होतें. मंडळी मात्र त्याला पार विसरून गेलेली दिसत होती.

" आपण मांजरीला रंगवूं या. " झांझुब्रिननें सूचना पुढें मांडली. करमणुकीचा नवीन प्रकारच आपण सुचवीत आहों असं तो भासवीत होता. त्याबरोबरच त्याच्या आवाजांत एक तऱ्हेचा विनवणीचा सूर निघत होता.

मंडळींत खळबळ उडाली.

" परंतु तसं केल्यानं मरेल ना ती. "

" गरीब मुक्या प्राण्याला रंग द्यायचा म्हणे. वारे वा ! "

" जीवन्त प्राण्याला रंग देणार ! झांझुब्रिन ! कमाल आहे तुम्हीं ! "

"मला गंमत वाटेल खात्रीनं." कोणीतरी उत्साहानें झांझुब्रिनला दुजोरा दिला.

मांजर झांझुब्रिनच्याच हातांत होती. एव्हांना रंगाच्या बादलीपर्यंत पोहोंचला होता तो.

"पहा गड्यानों, मजा दावितों '
मनी आपली रंगवितों.
हिरव्या रंगीं सुंदर खाशी
खुलली कैशी मनी सानशी."

झांझुब्रिन गात होता. त्या गाण्यानं हंसण्याचं पेंव फुटलें. मंडळी हंसण्याच्या नादांत असें तों झांझुब्रिननं शेपटी पकडून मांजरीस रंगांत बुडवून काढली.

आतां त्यानं नाचायला नी गिरक्या घ्यायला सुरवात केली. तोंडानें गाण्याचे सूर निघतच होते.

हंसतां हंसतां मुरकुंडी वळली सर्वांची. प्रत्येक क्षणाला हंसण्याचा आवाज चढतच होता. कित्येकांनीं खरोखरीच लोळण घेतली जमिनीवर. तर कांहींनीं तोंडावर हातरुमाल धरून दुसरीकडं पाह्यला सुरवात केली.

झांझुब्रिन स्वतःच्या कह्यांत राहिला नव्हता ह्यावेळीं. लोकांचं तें निरर्थक हास्य आपणामुळंच उफाळतं आहे ह्याची जाणीव होती त्याला. चेहऱ्यावरील रेषा-रेषांतून विजयाचा उन्माद ओसंडत होता नुसता. लोकमनावर आपण ताबा मिळवला आहे हें विसरला नव्हता तो. नृत्य व गीत दोहोंला खंड पडला नव्हता. आवारांतील चराचर वस्तु हंसत असल्याचा भास होत होता ह्यावेळीं. बायकांच्या विभागांतून त्याही डोकावून हंसत होत्या. नेहमींचं जड, उदास, दारुण यातनामय जीवन नाहींसं झालं होतं क्षणभर.

आवारांत मधूनच कुठेंतरी गवत उगविलेलं होतं. त्यावर त्यानं मांजरीला ठेवलं. श्रमामुळें चेहऱ्यावर घाम झरझरून उठला होता. परंतु तें उन्मादक नृत्य चालूच होतं त्याचं.

परंतु हंसण्याची हिरिरी मात्र ओसरली होती. एकंदर प्रकाराला भडक रंग चढल्याप्रमाणें वाटूं लागलें त्याला. लोक कंटाळले. मधूनच एखाद दुसऱ्याला अजूनही हंसण्याची सुरसुरी येई. हळूं हळूं सर्वच चूप झाले. बिचारं मांजर मात्र गवतावर पडून विव्हळत होतं केविलवाणं. गवतांत त्याचं अस्तित्व जाणवतसुद्धां नव्हतं. रंग डोळ्यांत गेल्यानं त्याची दृष्टी गेली होती. त्याची हालचाल थंडावत होती. पाय लटलट कांपत होते. जणूं जमिनीला चिकटले होते ते. त्याचं म्यॉंव म्यॉंव मात्र हृदयाला कांपवीत होतं.

" शिकारी कुत्रा आहे खरा." कोणीतरी उद्गारलं.

लोक थिजलेल्या डोळ्यांनीं पहात होते त्या कलावन्ताकडे.

" जन्मभर असंच हिरवं राहणार का हें ? " एकानं विचारलं.

" जन्मभर ! खरोखरीच ! किती वेळ जीवन्त राहील आतां असं वाटतं ? मृत्यूची छाया पसरत चाललेली दिसत नाहीं का त्याच्यावर ? " एका वृद्ध कैद्यानं म्हटलें.

मांजर कापत होतं. कैद्यांच्या भावना बदलत होत्या.

" मरणार तर ! " समजा आपण आंघोळ घातली त्याला तर !

कोणीच बोललं नाहीं. तो मांसल हिरवा गोळा त्यांच्या पायाशीं येऊन धडपडला. त्याच्या आवाजांतली आर्तता अशरणता व्यक्त करीत होती त्याची.

" हुश ! घामाघूम झालोंय नुसता. " जमिनीवर आपला देह पसरीत झांझुब्रिन म्हणाला. परंतु कोणी लक्ष दिलं नाहीं त्याच्याकडे काडी इतकं ही. एका तरुणानं त्या पिल्लाला उचलून घेतलें. पण दुसऱ्याच क्षणीं खाली ठेवलें परत. शरीर जळंतय नुसतं. बिचारा कांहीं फार वेळ काढीत नाहीं खास. काय मिळालं मुक्या जनावराला मारून ?" तो म्हणाला.

" थांबा ! जरा हुशार झालेलं दिसतंय. " दुसऱ्यानं आशा दाखविली.

अजूनही त्या गवतावर त्याची धडपड चालूच होती. चाळीस डोळे त्याच्या हालचालीवर खिळले होते. एकाही चेहऱ्यावर हास्याची अंधुकशी लकेरही आढळत नव्हती. मांजराला होणाऱ्या यातना त्यांच्या चेहऱ्यावर प्रतीत होत होत्या.

" हुशार दिसतेय म्हणे. कसली कपाळाची ? बिचारी पस्. किती जीव लावला होता सर्वांना. आपण कां बरं असं दुखविलं तिला ? तिची सुटका करणं शक्य नाहीं कां कोणाला ? " एक आवाज उठला.

" आणि ह्या सर्वाचं कारण–तो पहा. कशी मजा पाहतो आहे तो. " दुसरा ओरडला.

" मला एकट्यालाच काय म्हणून बोल. सर्वांनींच नाहीं का कबूली दिली तेव्हां ? " सर्वांना शान्त करण्याचा आव आणीत झांझुब्रिन म्हणाला.

" ऐका, ऐका ! म्हणे सर्वांनीं कबुली दिली. मी चांगला नको म्हणत होतों. पण तुझं लक्ष कशाला असणार. तुझ्याच डोक्यावर खापर आहे ह्याचं." एक तरुण ओरडला.

" कृपा करून ओरडूं नको असा." झांझुब्रिनच्या आवाजांत अजीजी होती.

एका वृद्धानं मांजर उचलून घेतलं. " केरोसीनमध्यें बुडवून काढलं तर हा रंग जाईल बहुधा." त्यानं आपलं मत व्यक्त केलं.

" माझं ऐकाल तर शेंपटी धरून भींतीवर आपटा. सर्वांत सोपा न खात्रीचा उपाय आहे तो." झांझुब्रिननें हांसत मध्येंच तोंड खुपसलें.

" सैतान ! नाहीं तर." वृद्धाच्या हातून मांजर घेऊन एक तरुण धांवत सुटला. वृद्ध व आणखीही कांहीं पाठोपाठ गेले. बाकीची मंडळी झांझुब्रिनच्या सभोंवती जमली होती. त्यांच्या डोळ्यांत त्वेष संचरला होता. परंतु बोलण्याची इच्छा कोणालाच नव्हती.

" लक्षांत ठेवा. सर्व दोष माझ्याकडेच नाहीं एकट्याकडे." झांझुब्रिन गुरगुरला.

" चूप ! एकट्याकडे नाहीं तर दुसरा कुणी साथी होता वाटतें ? "

" असं कसं म्हणतां ? तुम्हांपैकीं प्रत्येकानं उत्तेजनच नाहीं कां दिलं मला ?" झांझुब्रिननं जरा भीतभीतच वाक्य पुरें केलें.

" कुत्र्या ! चूप !"

एकानें झांझुब्रिनचे दांत पाडण्यासाठीं मूठ वळली. परंतु त्यानें चपळाई करून मान वळविली. त्यामुळें दांत वाचले. फक्त मानेवरच एक जोराचा गुद्दा बसला.

" मित्रानों..." त्यानें काकुळतीला येऊन सुरवात केली. परंतु वॉर्डर कुठें आहेत हें पहाण्याकडेच त्या मित्रांचं लक्ष वेधलं होतं. वॉर्डर जवळ पास नाहींत असं पहातांच त्यांनीं झांझुब्रिनवर लाथाबुक्यांचा वर्षाव चालवला नुसता. दुरून पहाणाराला एकंदर प्रकाराची कल्पना येणं शक्यच नव्हतें. कांहींतरी बोलाचाली चालली असावी असाच दूरून पहाणाराचा समज झाला असता. झांझुब्रिन त्यांच्या पायाशीं लोळत असून उठण्याची सुद्धां त्याला संधि मिळत नव्हती. मंडळींचे पाय व्यवस्थित, कोणत्याही तऱ्हेची धांदल न करतां आपलं काम पार पाडीत होते.

तीन चार मिनिटें अशा स्थितींत संपली असतील. एकाएकी वॉर्डरची आरोळी कानावर येऊन आदळली. झांझुब्रिनला शेवटची ठोकर देत कैद्यांनीं हळूहळूं काढता पाय घेतला तेथून.

आवारांत दुसरं कोणीच उरलं नाहीं. झांझुब्रिन मात्र त्याच स्थितींत जमिनीवर पडला होता. तो पालथा पडला असून सबंध शरिराला हिसके बसत होते त्याच्या. तो रडत असावा बहुधा. मधूनच त्याला खोकल्याचीही ढांस येई. हळूहळू डाव्या हातावर भार देऊन तो उठून बसला. आपला झोंक जाणार. आपण पडणार अशी त्याला सारखी भीति वाटत असावी असें त्याच्या हालचालीवरून दिसत होतें. आजारी कुत्र्यासारखे मधूनच हेल काढीत होता तो.

"उगाच ढोंग नको करूंस." एकजण धमकावणीच्या स्वरांत ओरडला. झांझुब्रिननें सर्व शक्ति एकवटून प्रयत्न केला आणि आपल्या पायांवर उभा राहिला तो. त्यानें एक हात छातीवर दाबून धरला होता तोल संभाळण्याकरितां. दुसरा हात पुढें पसरून कसातरी जाऊन त्यानें भींतीचा आधार घेतला. खोकल्याची जबर ढांस लागलेली होती त्याला. त्यानें डोकें खालीं जमिनीकडे वांकविलें.

लालसर थेंब जमिनीवर ठिपकत होते. उन्हांत चांगलेच चकाकत होते ते.

थेंब भींतीवर उडून सरकारी जागा खराब होऊं नये म्हणून झांझुब्रिननें मस्तक जमिनीला टेकलें. हातांनीं अजूनही भींतीचा आधार घेतलेला होता.

आणि सर्व मंडळी सभोंवती जमून टिंगल करीत खिदळत होती.

ह्यापुढें मांजर मात्र कधींही त्या आवारांत दिसलें नाहीं. आणि झांझुब्रिनला दुसरा कोणी प्रतिस्पर्धी राहिला नाहीं. कैद्यांना आकर्षण करून घेणारी एकमेव व्यक्ति राहिली ती.

---

# ४

# मवाली

—:०:—

आम्हीं पेरेकोप सोडलं तेव्हां आमची मन:स्थिति मोठी चमत्कारिक होती. लांडग्याप्रमाणें भुकेनें वसवसलेलं आणि जगावर कातावलेले होतों आम्हीं. गेले बारा तास पोटाला कांहींतरी मिळविण्यासाठीं—स्वकष्टानं म्हणा किंवा चोरून म्हणा आम्हीं सर्व बुद्धि, सर्व प्रयत्न खर्ची घातले होते. परंतु त्यांपासून फायदा नाहीं असं नक्की पटल्यामुळें कंटाळून आम्हीं पुढच्या मार्गाला लागलों. पण जाणार कुठें? कुठेंही रस्ता मिळेल तिकडे. त्याची पंचाइत नव्हती आम्हांला.

तिघेजण होतों आम्हीं, नुकतीच ओळख झाली होती आमची. नीपर नदीच्या तिरीं खेरसोनला एका धर्मशाळेंत गांठ पडली होती आमची. एकजण रेल्वेच्या फौजेंत सैनिक होता एकेकाळीं. त्याचे केस लालसर असून हाडापेरानं मजबूत होता तो. त्याचे डोळे घारे असून व्यवहारी होते. त्याला जर्मन येत असून जेलमधील आयुष्याचं त्याला सूक्ष्मज्ञान होतं. आमच्यासारख्यांना आपल्या भूतकालाविषयीं बोलायला फारसं आवडत नाहीं. चूप रहाण्याला तशींच कारणं असतात. अर्थात एकमेकांवर आम्हीं सहज विश्वास टाकतों—निदान बाह्यत: तरी विश्वास असल्याचं दर्शवितों. तसं पाहिलं तर आमचा स्वत:वर तरी कुठं विश्वास असतो?

आमचा दुसरा सोबती एक ठेंगु, रोड असून त्याचे ओठं नेहमीं एकमेकांवर दाबलेले असत. मास्को युनिव्हर्सिटीचा विद्यार्थी होता म्हणे तो. सैनिकानें

अन मी गृहीत धरली ती गोष्ट. पूर्वी तो विद्यार्थी असो, डिटेक्टिव्ह असो, वा चोर असो; आज तो आमच्याच पंक्तींत मोडत होता. भुकेनें वखवखलेला, पोलिसाची नजर असलेला आणि मवाली ह्या सदरांत मोडणारा असा होता. एखाद्या दुर्बल, भुकेल्या प्राण्यानं जगाचा द्वेष करावा, जगाचा सूड घेण्याच्या गोष्टी कराव्या, थोडक्यांत सांगायचं तर आमची मनोदृष्टि सारखीच असावी एवढी गोष्ट आमची मैत्री व्हायला पुरेशी होती.

आणि मी ! विनयानं माझ्या गुणांबद्दल मीं कांहीं सांगू शकत नाहीं आणि दोष दाखवून तुम्हांला चिळस येईल असं चित्र कशाला रेखाटूं उगाच ! थोडीशी रुपरेखा म्हणून एक गोष्ट सांगाविशीं वाटते. ती म्हणजे इतरांपेक्षां माझ्यांत कांहीं तरी ज्यास्त आहे, मी श्रेष्ठ आहें त्यांच्यापेक्षां असं प्रांजल मत होतं माझं, न आजलाही कायम आहे तें.

अशा रीतीनें पेरेकोप मागें पडलं. आतां मात्र आम्हांला धनगरांची किंमत जाणवायला लागली. भाकर मागणाऱ्या याचकाला नकार देणं माहीतच नव्हतं त्यांना.

मी व सैनिक जोडीनं चाललों होतों. विद्यार्थी पाठीमागून येत होता. त्याच्या खांद्यावर एक जाकीट होते. अगदीं साफ केलेल्या त्या झोंकदार डोक्यावर एकेकाळीं सुंदर असलेली हॅट होती. विजारीला जागजागीं ठिगळें असून रस्त्यावर पडलेल्या फाटक्या बुटांचे तळवे त्यानें चिध्यांच्या सहाय्यानें पायांला बांधले होते. पायानं धूळ उडवीत तो चूपचाप चालला होता. सैनिकाच्या अंगांत एक लाल रंगाचा सुती शर्ट असून त्यावर ज्याची ऊब बहुतेक झडली होती असें एक लोंकरीचं जाकिट होतं. डोक्यावर एक जुनीपुराणी लष्करी पद्धतीची टोपी असून तिचा रंग ओळखावयास चढाओढ लावतां आली असती. लष्करीधर्तीनंच टोपी वापरी तो. त्याच्या शरीरावर खालीं एक चड्डी असून पायांत कांहींच नव्हतें. माझाही पोषाख कांहीं वेगळा नव्हता. आमच्या आसमंतांत श्रीमंत न निसर्ग सुंदर स्टेपीज--डोंगरपठारावर पसरलं

असून वर नीलघुमट उभारला होता. रस्ता धुळीचा असून पायांना चटाचट चटके बसत होते. क्वचित नुकतीच कापणी झालेलीं शेतें दिसत. आमच्या समोर क्षितिजावर हळूवार हातानं लिलीपासून पिवळ्या गुलाबापर्यंत सर्व तऱ्हेच्या रंगाचा कुंचला फिरत होता.

" क्रिमियांतील पर्वतशिखरं असावी तीं. " विद्यार्थी आपल्या रुक्ष आवाजांत उद्गारला.

" वाहवा ! तुमची दृष्टी अजब खरी. अहो ढग आहेत ढग. कसा मुरंब्याचा रंग चढला आहे पहा तर. "

" ढग मुरंबाच असते तर किती मजा झाली असती. " शब्दांनीं भूक प्रखर झाली होती माझी.

"आपल्याला एखादा तरी जीवन्त प्राणी आढळावयाचा. होता! पण नाहीं. अस्वल नाहीं का करीत थंडींत, तसं आपलीं पावलें आपणच चाटलीं पाहिजेत आणखी काय ?"

" हा रस्ता निर्जन असावा असं सुचविलं होतं मीं. "

" सांगितलं होतं म्हणे. स्कॉलर आहांत. तेव्हां उचलली जीभ लावली टाळयाला. ह्या भागांत वस्ती कुठें आढळेल तें कां नाहीं सांगितलं मग ? " सैनिक चिडून बोलत होता.

विद्यार्थी कांहीं बोलला नाहीं. सूर्य मावळत होता. क्षितिजावरचीं अभ्रें चित्रविचित्र रंगांनीं नटलीं होतीं. मातीचाही खमंग वास येत होता. त्यानं भूक ज्यास्तच तीव्र झाली.

पोट पाठीला मिळालं होतं. ती संवेदना कांहीं आल्हाददायक नव्हती फारशी. स्नायूंतून सर्व रस शोषला जात आहे, त्यांची वाफ होत आहे असं वाटत होतें. घसा न तोंड सुकून कोरड पडली होती. डोळ्यां-पुढें काजवे नाचत असून चक्कर येणारसं वाटत होतं. न कधीं मांस, तर

कधीं ब्रेड समोर दिसायची त्या भ्रमिष्ट स्थितींत. न सावध झाल्यावर आंतड्यांत कोणी सुरी भोंसकतो आहे असं वाटायचं. तरी तसेच चाललों होतों आम्ही एकमेकांशीं बोलत. दृष्टि मात्र चौफेर टेहेळणी करीत होती. शेळ्या मेंढ्यांचा कळप किंवा तार्तरांची टोळी भेटेल अशी अजूनही आशा होती मनाला.

आदले दिवशीं तीन कलिंगडं खाल्लीं होती आम्ही. न प्रवास केला वीस मैल. पेरेकोपला पोहोंचल्यावर गाढ झोंप लागली. परंतु जाग आली ती भुकेच्या तीव्रतेनें. न झोंपण्याचा कांहीं तरी उद्योग चालू ठेवण्याचा विद्यार्थ्यानं उपदेश केला होता खरा. परंतु रात्रीच्या वेळीं मोठ्यांदा बोलणें, खाजगी मालमत्ता कशी जप्त करतां येईल ह्यांवर वाद करणें, सभ्य वस्तींत शक्य नव्हतें तें. आणि म्हणूनच मूग गिळून झोंपण्याखेरीज मार्गच नव्हता दुसरा. भुकेनें कासावीस झालेले तीन जीव त्या उजाड डोंगर पठारावरून चालले होते. मावळत्या सूर्य किरणांबरोबरच कोणीतरी भेटेल ही आशाही मावळत होती.

" चला. आगटीसाठीं तरी सामान जमवूं या. रात्र येथेंच काढावी लागणार आणि लवकरच दंव पडायला सुरवात होईल. " काटक्याकुटक्या उचलीत सैनिक म्हणाला.

आमचं काम सुरू झालं. पण खालीं वाकलं कीं पोटांत गोळा उठे. जमिनीवर पालथं पडून मातींत पोट भरावं, तेथेंच झोपीं जावं, अशी इच्छा बळावूं लागली. हालचाल करण्याचं भान राहिलं नाहीं. आंतडी जळत होतीं नुसती. काय वाटेल तें भस्म झाल असत त्यांत.

" निदान कांहीं मुळं मिळालीं तरी पोटाची आग शान्त करतां येईल. मला वाटतं त्या पलिकडच्या जमिनींत आहेत कांहीं !" एक सुस्कारा टाकीत सैनिकानं म्हटलं.

पण त्या काळयाभोर नांगरलेल्या जमिनींत मुळं कुठलीं सांपडायला ? मातीचीं ढेंकळं मात्र होतीं सपाटून. रात्रीचा अमंल सुरूं झाला होता. सूर्याचीं मावळतीं किरणें दृष्टीआड होतात न होतात तोंच त्या नील आकाशाच्या प्रांगणीं तारांचा खेळ सुरू झाला. अंधारामुळं आमच्या दृष्टीचा टापु साहजिकच लहान झाला.

" भाई, डावीकडे पाहिलंत का ? कोणीतरी पडलं आहे तिथें." विद्यार्थ्यानं कानाशीं लागत आपला शोध सांगितला.

" मनुष्य ! पण मग तो असा कशाला पडेल ?" सैनिकानं शंका काढली.

" जाऊन विचारा. त्याच्याजवळ खात्रीनें ब्रेड असणार. कारण येथेंच त्यानं मुक्काम केलेला दिसतोय." विद्यार्थ्याच्या सुचनेवर सैनिकांनं त्या दिशेकडे पाहिलें. तो विचारांत पडला.

" जाऊं याच." त्यानें अखेरीस दुजोरा दिला.

सुमारें एक फर्लांग अंतर होतें. विद्यार्थ्याचे डोळे तीक्ष्ण म्हणूनच त्याला त्या ढिगाऱ्यांत पडलेली मनुष्याकृति ओळखूं आली. अन्नाची आशा दिसतांच भूक ज्यास्तच प्रज्वलित झाली. उड्या मारीतच गेलों आम्हीं. अगदीं जवळ जाऊन पोहोंचलों. तरी त्या प्राण्याची हालचाल दिसेना.

" मनुष्यच नसेल तो कदाचित " सैनिक जणूं आमच्याच मनांतील भीति बोलून दाखवित होता.

परंतु दुसऱ्याच क्षणीं आमच्या शंकाकुशंका नष्ट झाल्या. त्या व्यक्तीची हालचाल सुरू झाली. उठून बसला तो. होय. जीवन्त मनुष्यच होता तो. त्यानें गुडगे टेकले. हात लांबविला.

" जवळ येऊं नका. नाहींतर गोळी झाडावी लागेल मला. कांपऱ्या उदास आवाजांत तो उद्गारला.

दोन सेकंद आमचीही हालचाल थांबली. ह्या स्वागतानं सर्दावलोंच आम्ही.

" खल पुरुष आहे नुसता. " सैनिक बडबडला.

" अगदीं खरं: बेटा पिस्तुल घेऊन हिंडतो. मासळी वगैरे जरूर असली पाहिजे त्याच्याजवळ. " विद्यार्थ्यानं पुस्ती जोडली.

त्या मनुष्यानं पवित्रा बदलला नाहीं.

" तुला दुखविण्याची इच्छा नाहीं आमची. फक्त ब्रेड पाहिजे आम्हांला: भुकेले आहोंत. तुझ्याजवळ आहे; खात्री आहे आमची. देवाच्या नांवानं तरी दया दाखव. " सैनिक बोलत होता.

त्या मनुष्यानं ते शब्द ऐकले कीं नाहीं कोण जाणें.

" ऐकू येतंय का ? ब्रेड दे. आमच्याकडे फेकलीस तरी चालेल. " सैनिक रागानं जळफळत ओरडला.

" ठीक आहे. "

" भल्या माणसा भिऊं नकोस. आम्हीं आहोंत साधे. रशियाहून कुबानला चाललों आहों. वाटेंत पैसे संपले. आणि आज दोन दिवस अन्नाचा कणही नाहीं मिळालेला. " सैनिकानें मिठास भाषेंत बोलावयास सुरवात केली.

" हं. झेला. " त्यानं तीनचार पावाचे तुकडे आमच्याकडे फेंकले. " बस. आणखी नाहीं माझ्याजवळ. "

ते तुकडे वाळलेले असून माती लागली होती त्यांना. सैनिकानं विभागणी केली त्यांची. मी ते तुकडे चघळायला सुरवात केली. पोटाची आग शमेपर्यंत ते तुकडे पुरविणं भाग होतें. किती चविष्ट होती ती ब्रेड. आणि लगेच रक्तांत रुपांतर होत होतें तिचें. आनंद, अगदीं स्वर्गीय आनंद लुटत होतों मी त्यावेळीं. शरिरावरचाही ताबा सुटत चालला माझा. परिस्थितीचा—मित्रांचाही विसर पडला क्षणभर.

परंतु शेवटचा घांस संपतांच आणखी खाण्याची वासना बळावली.

" त्याच्याजवळ अजून कांहींतरी असलं पाहिजे. " पोट चोळीत चोळीत सैनिक उद्गारला.

" खरी गोष्ट आहे. तें पिस्तुल नसतं तर –"

" तो कोण असावा ? "

" आपल्यासारखाच मवाली ! "

आम्हीं तिघेही अगदीं चिकटून बसलों होतों. मधून मधून तिरव्या नजरेनें त्या ब्रेड देणाऱ्या प्राण्याकडे आम्ही पहात असूं. परंतु त्याच्यांत जीवन्तपणाचं चिन्ह दिसेना.

रात्रीचा अंमल जारी होत होता. मृत्यूची भयानक शान्तता सभोंवार पसरली होती. आकाशींचीं पुष्पें–तारका चकाकत होत्या. परंतु आम्हाला अन्नच दिसत होतं समोर.

" आपण जाऊं या. त्याला त्रास नाहीं दिला म्हणजे झालं. काय करणार तो. गोळी झाडेल. झाडूं दे. फार तर एकाला मारूं शकेल तो. आणि पिस्तुलाच्या गोळीनं मनुष्य मरत नाहीं खास. " मी म्हणालों.

" छान. " सैनिकानं उडीच मारली जागेवरून.

विद्यार्थी मात्र सावकाश उठला जागेवरून.

धांवतच निघालों आम्ही. पिस्तुलाची गोळी सूंसूं करीत काना-जवळून गेली. सैनिकानं एका उडींतच त्याला गांठलें. पिस्तुल माझ्या हातीं आलें.

" हें पाहिलं का अन्न? कितीतरी आहे. बाप रे." विद्यार्थी ओरडला.

आम्हीं अन्नावर हात मारायला सुरवात केली. तो मनुष्य निपचीत पडला होता. आम्हीं पण चौकशी केली नाहीं त्याची.

" अन्नासाठींच कां एवढी धडपड ? " एकाएकीं आपल्या घोगऱ्या स्वरांत त्यानं बोलायला सुरवात केली,

आम्ही दचकलों.

" नाहींतर कशाला? तुझा जीव घ्यायला? मूर्ख बेटा! पिस्तुल आहे लेकाजवळ, उडवतो बार लोकांवर."

सैनिकानं शिंप्यांचा व खाण्याचा सपाटा चालविला होता.

इतक्यांत हुंदक्यांचा आवाज ऐकूं आला.

" गड्यांनो मला काय बरं माहीत. मी भ्यालों म्हणून गोळी झाडली. न्यु एथासहून स्मोलेन्स्कला चाललोंय. तापानं पछाडलं म्हणून एथॉस सोडलं पण ताप पिच्छा सोडीत नाहीं. सुतार आहे मी. घरीं बायको, दोन मुली पण आहेत. तीनचार वर्षांत पाहिलं नाहीं त्यांना. दुर्दैवी आहें झालं. भाई, खा. सर्व खा. संकोच नको."

" तुझ्या सांगण्याची गरज नाहीं. संपविणारच आहों आम्ही." विद्यार्थी उद्गारला.

" तुम्ही चांगलीं माणसं आहांत हें कळतं तर कशाला गोळी झाडली असती मी. परंतु रात्र ही अशी. शिवाय डोंगराळ मुलूख. भाई, क्षमा करा हं." रडत रडत बोलत होता तो.

" पैसे असले पाहिजेत चोराजवळ." विद्यार्थ्यानें आपली कल्पना बोलून दाखविली.

" चलाख आहेस खरा. चला आगटी पेटवून झोंपी जाऊं या." सैनिक म्हणाला.

" आणि तो?" अंगुलीनिर्देश करीत विद्यार्थ्यानें विचारलें.

" जाईल मसणांत. भाजून तर खायचं नाहीं त्याला!"

" कां खाऊं नये?"

मघांशीं जमविलेल्या काटक्या आणून आम्हीं विस्तव पेटविला. वारा नसल्यानें विस्तव संथ जळत होता. डुलक्या घ्यायला सुरवात केली होती आम्ही.

" भाई, मी येऊं का विस्तवाशीं?" सुतारानं विचारलं.

" हं, चालेल आलास तरी. " विद्यार्थ्यानें अनुमति दिली.

सरकत सरकत सुतार आगटीजवळ आला. भरपूर उंच पण कमालीचा रोड होता तो. त्याचा प्रत्येक अवयव कांपत होता. त्याला होणाऱ्या वेदना डोळ्यांत सामावल्या होत्या. त्याचा चेहरा पिवळा पडला असून प्रेतकळा आली होती त्यावर. विस्तवावर हात धरून त्यानं आपलीं बोटें चोळलीं. हाडें मोडलीं. त्याच्याकडे पाहिलं कीं त्याबद्दल कींव व तिरस्कार दोन्ही वाटत असत.

" मरणार मी इथंच. माझी बायको—मुली—कोणाला कळणार देखील नाहीं. बिचारीं वाट पहातील माझी. " जखमी लांडग्याप्रमाणं विव्हळत होता तो.

" मरायचं तर मर ना ! लोकांना कां उगाच त्रास. चूप नाहीं का बसतां येत ? " सैनिक खेंकसला.

" बेट्याच्या डोक्यांत दगड घाला एक उचलून. " विद्यार्थ्यानं सूचना केली हलकेच.

" तुला काय वाटतं ? आम्हांला अन्न दिलं म्हणून आम्ही तुझी सेवा करीत राहावं ? आणि गोळ्या झाडल्या त्या ? "

" मला वाटतं, निजावं आपण आतां. " माझी सूचना सर्वांना पसंत पडली. तो सुतार पण आमच्यांत येऊन पहुडला. गंभीरतेनं विस्तवाकडे पहात होता तो. त्याच्या उजव्या हातालाच होतों मी. त्याची दांतखिळी वाजत होती. विद्यार्थी त्याच्या डाव्या बाजूला होता. केव्हांच झोंपी गेल्यासारखा दिसत होता तो. सैनिक हातावर डोकें टेकून तारा मोजत होता आकाशांतल्या. नंतर त्यानें सुरवात केली बोलावयास. बराच वेळ सुताराशीं गप्पा चालल्या होत्या त्याच्या. माझे डोळे केव्हांच मिटले होते.

× × × ×

" अरे, ऊठ लवकर. आटप जलदी ! "

दचकूनच उठलों मी. डोळे उघडले. खडबडून उभा राहिलों. सैनिक गदगदा हलवीत होता मला.

" हं आटप लवकर. निघालं पाहिजे चटकन. "

त्याच्या चेहऱ्यावर भीतीचीं चिन्हं दिसत होतीं. करडेपणाही चढला होता थोडासा. मीं सभोंवार पाहिलं. सूर्याचीं किरणें गुलाबी प्रकाश पसरवीत होतीं सभोंवार. सुतारावर माझी नजर खिळली. तोंड वासलेलं, बुबुळं बाहेर आलेलीं, जीवाचा उडालेला थरकांप त्यांत उतरला होता. छातीजवळ कपडे फाटलेले. अस्ताव्यस्त पडला होता अगदीं. विद्यार्थ्याचा मात्र कुठेंच मागमूस नव्हता.

" कळला नाहीं का अर्थ अजून ? पाय उचल. सांगतों मी सर्व. " मला ओढीतच सैनिक म्हणाला.

" मेला वाटतं! " चालतां चालतां मीं विचारलें. गार वारा झोंबत होता अंगाला.

" अर्थात्. तुझा गळा दाबला असता कुणी तर तुझीही तीच अवस्था झाली असती कीं. "

" कुणी ? विद्यार्थ्यानं ? " मी ओरडलों.

" नाहीं तर कोण ? तूं कीं मी ! शिकलेल्यांचेंच काम आहे हें बाबा. बेट्यानं किती शिताफीनं काम उरकलं पहा. आणि कॉमरेडस्‌ना दिलं सोडून. मला कल्पना येती तर त्या विद्यार्थ्याचाच निकाल लावला असता. काल मीं एका थपडेंतच काम आटपलं असतं. एक ठोंसा द्यायचा अवकाश. एक खल पुरुष तरी कमी झाला असता जगांतून ! कळलं ना काय झालं तें ? चल पाय उचल चटपट. कोणी आपणांस पहातां कामा नये ह्या पठारावर. दिवस वर आला कीं पत्ता लागेल लोकांना खुनाचा, न् मग आपल्यासारख्या लोकांची शोधाशोध होईल. त्यापूर्वी बाहेर पडलं पाहिजे येथून. आणि आपल्याला पकडलं तर ? आपल्याजवळ कांहीं नाहीं खरं. परंतु पिस्तुल आहेच कीं. पंचाइतच आहे ती. "

“ फेंकून दे तें. ”

“ फेंकून दे म्हणे. किंमत आहे त्याला बाबा. आणि आपणास इतक्यांतच पकडतील असंही नाहीं. सुताराजवळ पिस्तुल होतं असा तरी कोणाला संशय येणार ? मी नाहीं फेंकणार तें. तीन रूबल तरी किंमत येईल त्याची. त्यांत एक गोळी पण आहे अजून. आपल्या कॉमरेडच्या कानांत ही गोळी घालतां आली तर काय वाटेल तें देईन मी. किती पैसे मिळाले लेकाला कोण जाणे. ”

“ बिचाऱ्या मुली ! ” मी उद्गारलों.

“ मुली ? कोणाच्या ? अं, सुताराच्या होय? त्या होतील मोठ्या. आपल्याशीं तर कांहीं लग्न नाहीं करायच्या त्या ? मग चिंता कां त्यांची ? चला निघा लवकर. कोणत्या रस्त्यानं जायचं ? ”

“ कोणत्याही–सर्व सारखेच. ”

“ माझीही तीच कथा. तेव्हां उजव्या हातालाच जाऊं या. समुद्र तिकडेच असेल बहुधा. ”

आम्हीं चालूं लागलों.

मध्येंच वळून पाहिलें मी पाठीमागें.

“ जणूं उठला आहे तो फिरून. घाबरूं नकोस. आपला पाठलाग नाहीं करणार तो. बाकी विद्यार्थी हुशार खरा. पक्का बंदोबस्त केला त्यानं. वा रे कॉमरेड ! लोक दिवसेंदिवस खालच्या पायरीला जात आहेत हेंच खरं !” सैनिक उदास भावानं बोलत होता.

“ आज काय खाणार ? कुठें अन् कसं ? ”

कधींही न सुटणाराच प्रश्न होता तो !

५

# सव्वीस जीवांची जीवनलता.



सव्वीस जणं होतों आम्हीं. सपाटून ओल असलेल्या त्या तळघरवजा कोठडींत मानवीं यंत्रेंच कोंबलीं होतीं म्हणाना. सकाळपासून संध्याकाळपर्यंत सतत केक्स व बिस्किटें ह्यांचें पीठ तिंबण्याचें काम तीं यंत्रें बिनचूक करीत असत. कोठडीला एका बाजूनेंच खिडक्या असून त्या बाजूला एक खाई खोदलेली होती. खाईंत शेवाळलेल्या विटकरांचा खच पडला होता. खिडक्यांना बाहेरून लोखंडी कांबांची जाळी असून कांचेवर पिठाचीं पुटें चढल्यानें सूर्यकिरणें आमच्यापर्यंत पोहोंचू शकत नव्हतीं. गरीबांना, भुकेनें तडफडणाऱ्या आमच्या बेकार कॉमरेडसना, एखादा तुकडा आमच्या हातून मिळूं नये म्हणून मालकानें जाळी बसविण्याची खबरदारी घेतली होती. मालक आम्हांला सक्त मजूरीचे कैदी म्हणे व ताज्या मटन ऐवजीं कुजलेलें शिळेपाके तुकडे देई.

दगडी पिंजराच म्हणा ना तो. वरचें छप्पर अगदींच खालीं आलेलें व त्यांवर कोळिष्टकें. भिंती मात्र खूप जाड व त्यांवर जागजागीं चिखल व चुना ह्यांचा गिलावा केलेला होता. अशा कोठडींत आमचे दिवस जात होते.

आम्ही सकाळीं पांच वाजतां उठत असूं. डोळ्यांवरची झोंप कांहीं उडालेली नसे व सहाला बावळटासारखे एका टेबलापाशीं जाऊन बिस्किटांना सुरवात करूं. आमच्या झोंपेच्या वेळीं आमचे दुसरे कॉमरेडस पीठ तिंबून ठेवीत. सबंध दिवस सहापासून तों रात्रीं दहापर्यंत आमचें काम चाले. बधिरता येऊं नये म्हणून पाठीमागें पुढें रेळत कांहीं जण आंबलेलें पीठ तिंबीत, तर कांहीं जण पीठ पाण्यांत कालवीत. बिस्किटें भाजण्याच्या ठिकाणीं पाणीही

दिवसभर उकळत राही. आणि चुल्यांतून बिस्किटें टोपलींत फेंकतांना बेक-रच्या तापलेल्या झाऱ्याच्या झळांनीं आमचे कान लाल होत. दिवसभर एका कोपऱ्यांत लांकडं जळत. त्या जाळाचें लाल प्रतिबिंब कारखान्याच्या भिंतीवरून पडे. जणूं आमचीच ते टिंगल करीत असावेत. तो चुला पाहिला म्हणजे एखाद्या अद्‌भुतरम्य गोष्टींतल्या राक्षसाच्या डोक्याची आठवण होत असे. विस्तवानें व्यापलेला आपला जबडा पसरून तें डोकें जमिनींतून वर आलें आहे असें वाटे. दोन बाजूचे ते खोल खळगे डोळ्यांप्रमाणें भासत. राक्षसाचे डोळे ते. भावरहित व निष्ठुर. आमच्यांत माणुसकी नाहीं असें समजून ते डोळे जणूं आमचा तिटकारा करीत. तुच्छ लेखीत.

एक एक दिवस जात होता. त्रासदायक धुळींत, अंगणांतून पायाबरोबर आंत आलेल्या चिखलांत, दाट पसरलेल्या त्या उग्र दर्पयुक्त वाफेंत, पीठ मळून बिस्किटें करण्याचें काम चालूच होतें. आमच्या घामानें आम्ही ओलावा आणीत असूं. आमच्या कामाचा आम्हांला भयंकर तिटकारा वाटे. आम्हीच तयार करीत असलेली वस्तु आम्हीं चुकूनही चाखली नाहीं. टेबलाच्या दोहों बाजूस नऊ नऊ जण समोरासमोर बसून यंत्राप्रमाणें नकळत आमच्या हातांबोटांकडून आम्ही काम घेत असूं. सरावानें ती हालचाल आमच्याही लक्षांत येत नसे; आणि परस्परांना इतकें न्याहाळलें होतें कीं प्रत्येक कॉम-रेडच्या चेहऱ्यावरच्या रेषान् रेषा कोणीही बिनचूक सांगितल्या असत्या. बोलायला विषय नसल्यानें आम्ही कशावरही बोलत असूं. भांडायला सुरवात होईपर्यंत तोंडाला खीळ असे. कॉमरेडला भांडायला लावायची युक्ति सोपी होती. परंतु आम्ही फारसे भांडत नसूं. अतिशय कामानें मृतवत झाल्यावर, भावना मेल्यावर, त्या दगडासारख्या शरीरांत भांडायला किंवा कांहीं करायला जोर तरी कुठला असणार? परंतु बोलायचं. बोलून कांहीं उरलें नाहीं कीं येणारी स्तब्धता बोंचक व तापदायक होते. परंतु ज्यांना आवाजच फुटला नसतो त्यांना स्तब्ध राहणें किती सुगम असते! कधींमधीं आम्ही गात असूं. कामाच्या ऐन दंगलींत कोणीतरी थकलेल्या घोड्याप्रमाणें खिंकाळून हलकेच गुणगुणावयास लागे. सुरवात होण्याचाच अवकाश. प्रथम सर्वजण चूपचाप ऐकत. गाणाऱ्याला एक दोन नवीन आवाज साथ करीत. हा आवाज कोठडींत

घुमतांच सर्वांना स्फुरण चढे व ध्रुपदावर सर्व जोर देत. समुद्राच्या लाटेप्रमाणें गाण्याचा वेग वाढे, आमचा दगडी पिंजरा जास्तच भेसुर होई.

सव्वीस जणांचें गाणें तें. त्याला कोठडीची जागा अपुरी पडे. गाणं भिंतीवर जाऊन आदळे, जणूं रडून आरडून बाहेर पडण्याचा प्रयत्न करी. बधिर हृदयांत दुःखाची अस्फुट संवेदना उत्पन्न करी. जखमा फिरून वहात. गाणारे निश्वास टाकीत. कॉमरेडसच्या आवाजांत मधून मधून खंड पडे. परंतु एक श्वास टाकून थांबलेला कॉमरेड फिरून सुरवात करी. ह्या वेळीं त्याचे डोळे मिटलेले असत. स्वच्छ सूर्यप्रकाशांत एखाद्या भव्य रस्त्यावरून आपण चालत आहों असा त्याला भास होत असेल कदाचित् अशा वेळीं.

आणि गाणं चालू असताना भट्टीच्या ज्वाला नेहमींप्रमाणेंच जळत. बेकरचा झारा इकडून तिकडे हेलकावे खाई. उकळतें पाणी नाद धरी व आगीचें प्रतिबिंब भिंतींत उमटे. सूर्यप्रकाशापासून दूरावलेल्या जीवाचें, कैदी गुलामाचें दुःख, त्या यातना आम्हीं दुसऱ्याच्या शब्दांनीं व्यक्त करीत असूं. अशा प्रकारें एका दगडी घराच्या तळघरांत आम्ही सव्वीसजण दिवस काढीत होतों. आमचें जीवन इतकें दुःखपूर्ण होतें कीं जणूं त्या घराचे वरचे तीन मजले आमच्याच खांद्यावर उभारले होते.

× × ×

गाण्याखेरीज दुसरी एक गोष्ट होती. सूर्यप्रकाशाइतकी आम्हांला तिची किंमत वाटे. घराच्या दुसऱ्या मजल्यावर जरीच्या भरतकामाची फॅक्टरी होती. फॅक्टरींत काम करणाऱ्या अनेक स्त्रियांत एक सोळा वर्षांची तरुणी होती. तिचें नांव टोनिया. रोज सकाळीं आमच्या कोठडीजवळ येऊन या बाजूच्या खिडकींतून आंत डोकावीत असलेला तो नाजूक गुलाबी चेहरा व निळसर डोळे नेहमीं हंसताना दिसत. "कसे काय कैद्यानों ! मला थोडीं बिस्किटें देतां का ?" मृदुल आवाजांत ती विचारी. तिचा तो परिचित आवाज कानीं पडतांच सर्वजण त्या दिशेनें पाहूं लागत. सर्वांच्या चेहऱ्यावर आनंद चमके. त्या निष्पाप चेहऱ्यावर नेहमीं विजयी हास्य खेळत असलेलें दिसे. खिडकीच्या तावदानाला चिकटलेलें तें लहानसें नाक, कुंदकळ्यांसारखे दांत आणि हंसूं आल्यानें विलग झालेले लाल ओंठ, हें चित्र आमच्या परिचयाचें झालें होतें, आणि त्यापासून आम्हाला आनंदही

होत असे. टोनियाला दार उघडण्यासाठीं आमच्यापैकीं प्रत्येकजण धडपडे; त्या उत्साहाच्या भरांत आम्ही एकमेकांना धक्काबुक्कीसुद्धां करीत असूं. ती आंत येतांच-मूर्तिमंत आनंद व उत्साहच त्या कोठडींत आल्याचा भास होई. हंसतमुखानं आमच्याजवळ येऊन ती आपला ॲप्रनचा घोळ पुढें पसरी. तिचे ते लांबसडक केंस दोन्ही खांद्यांवरून पुढें रुळत असत. आमच्यासारखे गलिच्छ, बेढब व उदासवृत्तीचे जीव तिच्याकडे पहातच रहात. दरवाजा जमीनीपासून तीनचार पायऱ्या उंचावर होता. मान उंचावूनच आम्हांला तिच्याकडे पहावं लागे. आम्ही तिला आदरानें संबोधित असूं. तिच्यासाठीं आम्हांला सभ्य भाषा चटकन आठवत असे. आमचा स्वर मृदु होई आणि आमचा विनोदही जरा भारदस्त असे. आणि हा सर्व फरक फक्त तिच्याच पुरता असे. बेकर झारा उचलून खमंग भाजलेलीं गरमागरम बिस्किटें मोठ्या शिताफीनें तिच्या ॲबनमध्यें टाकी.

" संभाळा, मालकाच्या तावडींत सांपडूं नका बरं. " आम्हीं नेहमीं प्रेमाची सूचना देत असूं. " गुड् बाय कैदी लोक ? " खट्याळपणें हंसून ती उत्तर देई व ससाच्या चपळाईनें तेथून चालती होई.

ती गेल्यानंतर बऱ्याच वेळानें आम्हांला वाचा फुटत असे. आम्ही तिच्या-बद्दल चांगले उद्गार काढीत असून नेहमीं तेच ठराविक शब्द बाहेर पडत. केव्हांही पहा. कारण आमच्यांत तरी कोठें फरक होत होता ? सभोंवतालची परिस्थिति कायम ठशाची असली म्हणजे त्यांत राहणें मनुष्याला दुःसह होतें. त्याच्या उत्साहाला, जीवनाला तें मारून टाकतें. आणि दिवसेंदिवस त्या एकच एक परिस्थितींत राहणें जास्तच कठीण भासतें. स्त्रियांच्या बाबतींत कधीं कधीं आम्ही इतकी अश्लील भाषा वापरीत असूं कीं त्याबद्दल मागाहून आमची आम्हांलाच लाज वाटे. आणि आम्हांला ज्या प्रकारच्या स्त्रिया माहीत असत त्यांना दुसरें एखादें सभ्य विशेषण देणेंही शक्यच नसे. टोनियाबरोबर त्यांची तुलनाच झाली नसती. टोनियाबद्दल मात्र कधीं चुकूनही आमच्या तोंडून अश्लील शब्द बाहेर पडला नाहीं. नखाएवढें सुद्धां तिला नांव ठेवण्यासारखी आम्ही कोणी कधींच तिच्याशीं सलगी केली नाहीं. किंवा हीन कल्पना आमच्या मनाला शिवली नाहीं. ती आमच्याबरोबर फार वेळ नसे हेंही ह्याचें कारण असेल कदाचित्. आकाशांतून तुटलेल्या ताऱ्याप्रमाणें चमकून ती आमच्या डोळ्यांसमोरून नाहींशी होत असे.

ती लहान होती, सुंदर होती हेंही तिची आमच्याकडून टिंगल न होण्याचें कारण असूं शकेल. कारण सुंदरता आमच्यासारख्या रांकट व असभ्य लोकांमध्येंही आदराची भावना जागृत करतेच. शिवाय तुरुंगांतल्या प्रमाणें खडतर कष्टाचें जीवन जगण्यानें आम्ही पशू झालों तरी अखेर आम्ही होतों मनुष्यच. सर्व मनुष्य-प्राण्याप्रमाणेंच कशावर तरी श्रद्धा ठेवल्याखेरीज आम्हाला जगणं शक्य नव्हतें. त्या वाड्यांत किती तरी डझनवारीं लोक रहात होते. परंतु तिच्याखेरीज, त्या बिळांत राहणाऱ्या आमची कोणीच वास्तपूस करीत नसे. मग तिच्याखेरीज दुसरी गोष्ट कोणती मिळणार होती आमच्या श्रद्धेला ! तिला आम्ही आमच्याा पैकींच समजत असूं. तिला गरमागरम बिस्किटें देणं आम्हांला आमचं कर्तव्य वाटे. आमच्या देवतेला तो नैवेद्य होता. आम्ही तिच्याकडे जास्तच खेंचले गेलों. बिस्किटाखेरीज आम्ही तिला उपदेशही करीत असूं. “ गरम कपडे घालावे. धांवत गर्दागर्दांनें जिना चढूं नये. जड ओझं उचलूं नका. ” अशा तऱ्हेच्या उपदेशाचें ती हंसून स्वागत करी. अंमलांत मात्र कधींच येत नसे. परंतु आम्हांला त्या गोष्टीचा अपमान वाटला नाहीं. तिची काळजी करणें कर्तव्यच नव्हतें का आमचें ?

कधींमधीं ‘ तळघराचं अजस्र दार उघडा, लांकडं फोडा ’ अशा तऱ्हेचें कामही ती आम्हांला सांगत असे. आणि आम्ही पण आवडीनें तीं कामें पार पाडीत असूं.

परंतु एकदां आमच्यापैकीं एकानें तिला आपला एकुलता एक फाटका सदरा शिवून द्यायची विनंती केली. तिनें नाक मुरडलें. “ जणूं मला दुसरीं कामेंच नाहींत. ” ती म्हणाली. तिचा स्वर तिरस्कृत होता.

त्या वेड्या प्राण्याची आम्हीं पोटभर टर उडविली. फिरून तिला कोणी-ही काम सांगितलें नाहीं. ती आमची प्रेमदेवता होती. आणि एवढें म्हटल्या-वर आणखी काय सांगावयाला हवें ? कशावर तरी प्रेम करावें असें प्रत्येकाला वाटत असतें. कधींकधीं त्या प्रेमाच्या भाराखालीं एखाद्याची प्रेमदेवता चिरडली जाते, क्वचित बिघडते, तर एखादे वेळीं आपलं प्रेम शेजाऱ्याच्या जीवनांत विष कालवतें. प्रेम करण्याच्या भरांत प्रेमदेवतेला मान देणें आमच्यानें होत नाहीं. आम्हां सव्वीस जणांची टोनियावर प्रीति होती. कारण प्रेम करावयाला आमच्यासमोर दुसरें कोणीच नव्हतें.

" त्या मूर्ख पोरीला आपण बिघडवितों आहोंत. तिच्यांत असं आहे तरी काय ? आपण उगाच तिचं एवढं स्तोम माजवलं आहे." क्वचित आमच्या पैकीं कोणाला तरी वाद करण्याची हुक्की येत असे.

परंतु ज्याच्या तोंडून असली भाषा बाहेर पडे त्याला लगेच सर्वजण दम भरीत. प्रेम करावयाला आम्हांला जागा हवी होती. आणि आम्हांला हवें होतें तें आम्हांला मिळालें पण होतें. ज्यावर आम्हां सव्वीस जणांचें प्रेम होतें ती वस्तु केव्हांही पवित्र राहणें अपरिहार्यच होतें. ती आमची देवता होती. आणि त्या-विरुद्ध बोलणारा आमचा दुष्मन् होता. लोक नेहमीं चांगल्याच गोष्टीवर प्रेम करतात असें नाहीं. तें कसंही असलं तरी एकाच होडींत आम्ही सव्वीस जण होतों. एकाला जी गोष्ट आवडली तिला सर्वांनीं मान देणं आवश्यक होतें.

× × × ×

बिस्किट फॅक्टरीखेरीज आमच्या मालकाची फॅन्सी बेकरी पण होती. ती पण त्याच वाड्यांत. फक्त एक भिंतच काय ती मध्यें होती. परंतु फॅन्सी बेकरींत फक्त चारच कामगार होते. ते आम्हांला आपणापासून दोन हात दूरच ठेवीत. आमच्या कामापेक्षां त्यांचें काम स्वच्छ आहे असें त्यांना वाटे. व त्यामुळें आमच्यापेक्षां ते स्वतःला श्रेष्ठ मानीत. आमच्या वर्कशॉपमध्यें ते कधींच येत नसत. कंपौंडमध्यें कधीं गांठ पडल्यास उपहास करीत. तेथील दुधाचे स्कोन्स आम्ही चोरूं ह्या भीतीनें तिकडे जाण्याची आम्हांला बंदी केली होती. आम्हांला हे फॅन्सी बेकर आवडत नसत. कारण आम्हांला त्यांचा हेवा वाटायचा. त्यांचें काम सोपें होतें. पगार जास्त मिळावयाचा व खाणेंपिणेंही चांगलें व्यवस्थित मिळे. त्यांचें वर्क-शॉप किती प्रशस्त न् हवाशीर होतें. मंडळीही स्वच्छ अन् उलट सुदृढ. अगदीं आमच्या उलट नमुना. आम्हांपैकीं प्रत्येकजण पिवळट, भुरकट दिसे; तिघांना रोग जडलेले होते. बाकीचे क्षयी. संधीवातानें एकाची तर नुसती दुर्दशा उडविली होती. सुट्टीच्या दिवशीं किंवा फावल्या वेळीं फॅन्सी बेकर झकपक कपडे करून बूट चढवून बगीच्यांतून वगैरे फिरावयास जात. जिवाची मजा करीत. आणि आम्ही आमचे ठेवणीचे कपडे लगतराच्या जवळपासच असत; व पायांत तुटके स्लीपर्स. पोलीस आम्हांला पार्कमध्यें शिरूंसुद्धां देत नसत. फॅन्सी बेकरबद्दल आम्हांला आपुलकी कशी वाटावी ?

त्यांच्यावरचा प्रमुख दारु भयंकर पीत असे म्हणून मालकानें त्याला काढून दुसरा मनुष्य नेमला अशी बातमी आम्हांला मिळाली होती. हा दुसरा मनुष्य पूर्वी सैनिक होता. बेटा नेहमी सॅटिनचे कपडे घालून फिरवत असे. सणासुदी एखादी सोन्याची सांखळीसुद्धां घालीत असे. अशा अजब प्राण्याला पाहायची आम्हांला उत्सुकता उत्पन्न झाली. आळीपाळीनें अंगणांत जाऊन ह्या चमत्कारिक प्राण्यावर नजर टाकावयाची असें आम्हीं ठरविलें.

परंतु तो स्वतःच आमच्या वर्कशॉपमध्यें आला. त्यानें मधला दरवाजा लाथेनेंच उघडला, " काय रे गड्यांनो ! कसं काय, ठीक आहे ना ?" त्यानें उंबरठ्यावर उभें राहून विचारलें.

वादळी हवा आंत घुसली. आपल्या मोठेपणाच्या प्रौढीनें तो आमच्याकडे पहात होता. मोठ्या व्यवस्थितपणें पीळ भरलेल्या मिशांखालून त्याचे पिवळे दांत चमकत होते. त्याचें सर्वच कांहीं और होतें. त्याचें जाकीट निळें असून त्यावर कलाबतूची वेलबुट्टी काढल्यानें तें सारखें चमकत असे. बटन्स मोत्यांचीं असून सोन्याची सांखळी आपलें अस्तित्व दिमाखानें दाखवीत होती. तो देखणा होता खास. भरपूर उंच, सुदृढ, चेहऱ्यावर लाली आणि ते मोठाले टपोर डोळे. सहृदयतेचा भाव त्यांत स्पष्ट उमटला होता. त्याच्या डोक्यावर कडक इस्तरीची पांढरी टोपी असून पायांत उत्तम पॉलिश केलेले अगदीं नवीन धर्तीचे बूट कांचे-प्रमाणें तकाकत होते.

दरवाजा लावून घ्यायला आमच्या बेकरनें नम्रतेनें विनंति केली व त्यानेंही एकदम त्यांच्या म्हणण्याप्रमाणें दरवाजा बंद केला. त्यानें मुद्दामच तसें केलें बहुधा कारण लगेच त्यानें मालकाबद्दल प्रश्न विचारण्यास सुरुवात केली. मालकावर शिव्यांची लाखोली वहाण्याची आमच्यांत चढाओढ लागली. रक्तशोषक, गुलामांचा व्यापार करणारा, कामगारांना चरकांतून पिळून काढणारा—दुष्ट ग्रह, वगैरें किती तरी विशे-षणें आम्हीं मालकाला दिलीं. थोडक्यांत सांगावयाचें तर आम्हांला जें वाटत होतें व जें सांगतां येण्यासारखें होतें त्या सर्वांची खळबळ आम्ही त्या सैनिका-जवळ ओकून टाकली. पण तें सर्व येथें लिहिणें अशक्य आहे. मिशांना पीळ देत तो सैनिक मालकावर होणारा भडिमार मुकाट्यानें ऐकत होता. त्याची मृदुल व उत्साही नजर आम्हांवर खिळली होती.

“ इथं आसपास चटकचांदण्या पुष्कळ असतील नाहीं का ? ” त्यानें एकदम विचारलें.

कांहीं हळूच हंसले. कांहींनीं सुतकी चेहरा केला. कांहीं नाहीं तरी बाराजणीं येथें असल्याचें आमच्यापैकीं एकानें त्या सैनिकाला स्पष्ट केलें.

“ मग काय, मजा करतां कीं नाहीं ?” असें म्हणत त्यानें हळूच डोळे मिचकाविले.

आम्हीं फिरून हंसलों. अर्थात् आवाज मर्यादित होता. आमच्या चेहऱ्यावर उडालेला गोंधळ स्पष्ट होता. त्या सैनिकाइतकेच आपणही धडाडीचे आहोंत असें दाखविण्याची पुष्कळांची इच्छा होती. परंतु तसें प्रत्यक्ष कोणींच बोलून दाखविलें नाहीं एवढें खरें. “ आमची परिस्थिती पहा ना. ” एकजण तोंडांतल्या तोंडांत उद्गारला.

“खरं आहे. तुमच्यासारख्यांना असल्या गोष्टी साधणं कठीण आहे.” तो विश्वास उत्पन्न करणाऱ्या स्वरांत बोलत होता. त्याची दृष्टी आमच्यावर खिळली होती. “ तुम्हीं आहांत त्यापेक्षां चांगल्या स्थितींत असायला पाहिजे होतां. तुमचं नशीब फुटकं आहे. स्वतःचा मोठेपणा कायम ठेवण्याचेही मार्ग आहेत. प्रत्येक गोष्टीकडे पाहण्याची दृष्टी वेगळी असते. मी काय म्हणतों कळलाना अर्थ ? बायकांना झोंकनोकाचे पुरुष आवडतात. देखणा, बांधेसूद आणि ठाकठीकीच्या दमदार गड्यावर बायका विशेष फिदा असतात. माझ्या ह्या पिळदार दंडाबद्दल काय वाटतं तुम्हांला, सांगा पाहूं ?”

त्यानें आपल्या शर्टच्या उजव्या हाताची बाही वर सारली व आपला हात लांबवर पसरला. त्याचा दंड पिळदार व गोरापान असून त्यावर सोनेरी लव चमकत होती. छाती आणि पाय पण त्याच नमुन्याचे. शिवाय मनुष्याचे कपडे पण झकपक असायला हवेत. सुंदर सुंदर वस्तु पण हव्यात जवळ. माझीच गोष्ट घ्या ना. माझ्यावर प्रत्येक बाई फिदा होते. मी त्यांना बोलावीत नाहीं, त्यांना डोळा मारीत नाहीं, कांहीं म्हणतां कांहीं प्रयत्न करीत नाहीं. परंतु अगदीं डझनांनीं बायका माझ्या गळ्यांत येऊन पडतात.

जवळच असलेल्या पिठाच्या पेटाऱ्यावर बसून त्यानें बोलावयास सुरुवात केली. बराच वेळ तो बोलत होता. विषय एकच, "बायका माझ्यावर भाळतात." तो निघून गेल्यावरसुद्धां आम्ही कितीतरी वेळ चूपचाप होतों. तो व त्याच्या त्या बढाया ह्यावरच आमचे विचार चालले होते. नंतर सर्वांनीं एकदम बोलायला सुरुवात केली. तो आनंदी व चांगला मनुष्य आहे ह्या बद्दल सर्वांची एकवाक्यता झाली. आणि खरोखरीच तो आनंदी, सरळ मनुष्य होता. तो आपण होऊन आमच्या वर्कशॉपमध्यें आला; गप्पा मारल्या. आणि त्यासुद्धां आम्ही बरोबरीचे आहों असें समजून खेळीमेळीनें. अशा मित्रत्वाच्या नात्यानें आजपर्यंत कोणी बोललेलें आम्हांला आठवत नव्हतें. त्याच्याबद्दल व कलाबतूच्या कारखान्यांतील मुलींबद्दल आम्ही बराच वेळ बोलत होतों. त्या ठिकाणीं त्याला यश यावें व येईलही अशी सदिच्छा प्रदर्शित केली. ह्या मुलीं आमच्याशीं फार उद्धटपणानें वागत. आम्हांला पाहिलें कीं कपाळाला आठ्या चढवीत. अस्पृश्यांप्रमाणें दूर लेखीत. आमचें अस्तित्व त्यांच्या गांवींही नाहीं असें भासवीत. आणि त्या कधीं अंगणांत दिसल्या किंवा आमच्या खिडकीखालून नटून मुरडून जात असल्या म्हणजे आम्हीं त्यांच्याकडे आशाळभूतांसारखें टक लावून पहावयाचें व मनाचें समाधान करावयाचें हेंच आमचें भाग्य. परंतु आपापसांत आम्ही त्यांच्याबद्दल इतकी हलकट भाषा वापरीत असूं, त्यांची इतकी हेटाळणी चाले कीं त्यांच्यापैकीं एखादीनें तो प्रकार कानांनीं ऐकला असता तर ती संतापानें व शरमेनें लाल झाली असती.

"परंतु टोनिया! तिचं कसं होणार? हा मनुष्य तिला न बिघडवो म्हणजे मिळविली!" बेकर एकाएकीं उद्विग्न होऊन म्हणाला.

त्याच्या शब्दांचा आमच्या मनांवर चांगलाच आघात झाला. आमची एकदम दांतखिळी बसली. आम्ही आतांपर्यंत टोनियाला विसरलोंच होतों. सैनिकानें आतांपर्यंत तिची आठवण विस्मृतीच्या आड लोटली होती. त्याच्या त्या मनोहर आकृतिपुढें टोनिया फिकी पडली होती. बेकरच्या शब्दांनीं हृदयांत द्वंद सुरू झालें. आमच्यांत दोन वर्ग पडले. एक म्हणे असलें कांहीं तरी करून टोनिया स्वतःला कधींच कालिमा आणणार नाहीं; तर दुसरा पक्ष त्या सैनिकापासून स्वतःचें रक्षण करण्यास ती असमर्थ ठरणार असें प्रतिपादन करीत होता. वादाचा

निकाल होईना. अखेर त्या सैनिकावर पाळत ठेवायचें ठरलें व टोनियाशीं तो सलगी करतांना दिसला तर त्याची हड्डी नरम करावयाचें आम्हीं ठरविलें. टोनियाला पण सावधगिरीची सूचना द्यावी असाही आमचा बेत होता.

*                *                *                *

वरील गोष्टीला एक महिना लोटला. फॅन्सी बिस्किटें तयार करण्याचें व कारखान्यांतील मुलींबरोबर हिंडण्याचें काम त्या शिपायाकडून कधींही चुकलें नाहीं. मधूनमधून आमच्या वर्कशॉपमध्यें येऊन तो आमचीही विचारपूस करी. परंतु आपली नेहमींची फुशारकी मारण्याचें त्यानें सध्यां बंद केलें होतें. फक्त मधूनमधून आपल्या मिशांना पीळ भरीत असे इतकेंच.

सकाळींच बिस्किटांसाठीं येण्याचा टोनियाचाही क्रम सुरू होताच. आमच्याशीं असणाऱ्या तिच्या प्रेमळ व आनंदी वागणुकींत कधींच खळ पडला नाहीं. त्या शिपायाबद्दल तिला सूचना द्यावयाचा आम्हीं पुष्कळ प्रयत्न केला. ती त्याला नेहमीं बटबटीत डोळ्यांचा बैल म्हणूनच संबोधीत असे. तिच्या ह्या उपहासानें आमचा तिच्यावरील विश्वास दृढ होई. इतर मुलींना त्या शिपायाभोंवतीं गोंडा घोळतांना पाहिलें कीं टोनियाच्या ह्या सभ्य वर्तणुकीनें आमचा दर्जा वाढलासा आम्हां सर्वांना वाटे. तिच्या वर्तनाला वळण लावणारे आम्हीं आहोंत असें आह्मांला वाटूं लागलें. त्या भरांत त्या शिपायालाही आम्ही जरा तिरस्कारानेंच वागवूं लागलों. तिच्यावरील आमची प्रीति मात्र शुक्लेंदुप्रमाणें वृद्धिंगतच होत होती. तिचें स्वागत जास्त अहमहमिकनें व आनंदानें होऊं लागलें.

एक दिवस तो शिपाई हंसतच आमच्या खोलींत शिरला. हंसतां हंसतां त्याची मुरकुंडी वळली होती. साहजीकच आह्मांलाही जिज्ञासा उत्पन्न झाली.

" लिडी आणि गर्टी माझ्यासाठीं लढताहेत !" तो सांगूं लागला, "एकमेकींच्या उखाळ्यापाखाळ्या काढताहेत. झिंझोट्या ओढून दोघींनीं मारामारी केली आणि शब्दशः एकमेकींच्या उरावर बसल्या. एकमेकींचे कपडे काय फाडले, ओरबाडलें काय ! अगदीं बेजार झालों. ह्या बायांना भांडतांसुद्धां येईना नीटपणें. ओरबाडतात कशाला कोण जाणे. !"

तो बांकावर बसला होता. त्याच्या हंसण्याचे सात मजली फवारे उडत होते. परंतु आह्मांला हंसूं आलें नाहीं. त्याचें तें स्वच्छ सुदृढ शरीर व मोकळें मन ह्याचें आह्मांला आज वैषम्य वाटलें.

" माझ्या नशीबाचा फांसा नेहमींच अनुकूल पडतो मला. असं कां व्हावं हें माझं मलाही सांगतां यावयाचें नाहीं नीटपणें. परंतु असं आहे खरं. खूण करायचा अवकाश. एकदम तयार होतात ह्या बायका. ह्याला ह्मणतात नशीब. !"

रंगांत येऊन त्यानें आपली मांडी थोपटली आणि अगदीं आश्चर्यचकित झाल्यासारखी त्यानें आह्मांवर आपली सलगीची कुतूहल दृष्टि टाकली. जणूं त्यालाही ह्या गोष्टीचा खरोखरीच अचंबा वाटत होता. त्याच्या त्या फुगीर चेहऱ्यावर आनंद नाचत होता. समाधानाची वृत्ति चमकत होती.

शेगडींतून बिस्किटें काढीत बेकरनें जरा तिरस्कारानें उत्तर दिलें. "अं त्यांत काय मोठंसं. लहान लहान फळझाडं उपटण्यांत प्रौढी ती कसली ? परंतु पूर्ण वाढलेला पाइन वृक्ष उपटला तर खरी प्रौढी !"

" ह्याचा रोंख माझ्यावर आहे काय ? " त्यानें विचारलें.

" तुह्मांला उद्देशूनच आहे. "

" ह्याचा अर्थ काय ? "

" कांहीं नाहीं, तुह्मी लक्ष देण्याचं कारण नाहीं. "

" थांबा थोडे, तुमचा काय डाव आहे कळूं द्या. पाइन वृक्ष कोणता ? "

बेकरनें उत्तर दिलें नाहीं. पावडें उचलून आपलें काम करण्यांत तो मग्न झाला. भट्टींतील बिस्किटें उलथींपालथीं करण्यांत व तयार झालेलीं पुडे बांधणाऱ्या मुलांकडे फेंकण्यांत तो गर्क झाला. त्याला त्या सैनिकाचें व आपण काय बोलत होतों त्याचें विस्मरण पडलें. परंतु तो शिपाई मात्र अस्वस्थ झाला. त्याला राहवेना. बेकरचें पावडें सारखें इकडून तिकडे हालत असल्यानें त्या दांड्याचा धक्का जवळ जाणाऱ्याला सहज बसत असे. परंतु त्याची त्याला ह्या वेळीं पर्वा वाटली नाहीं. तो तडक बेकरजवळ जाऊन उभा राहिला.

" बोला बोला; तुह्मीं कोणाबद्दल ते उद्गार काढले सांगा. अर्धवट बोलून तुह्मीं माझा अपमान केला आहे. कोणतीही बाई माझ्यापुढं आपलं तेज दाखवूं शकणार नाहीं, शिवाय तुमचे शब्द तडक अपमान करणारे आहेत. " . . . .

खरोखरीच तो चिडलेला दिसत होता. अभिमान बाळगण्यासारखी येवढी एकच गोष्ट वगळल्यास आपण टाकावूं आहोंत असंच त्याचें स्वतःबद्दल मत होतें आणि आपण स्त्रियांना वश करून घेऊं शकतों ह्या एकाच अभिमानावर तो जगत होता. नाहींतर जगण्यासारखें त्याच्याजवळ होतें तरी काय दुसरें ?

एखादा रोग जडणें, शरिराला ह्मणा किंवा मनाला ह्मणा. कित्येकांना अभिमानास्पद वाटतें. त्यांच्या जीविताची कृतार्थता त्यांतच सांठलेली असते. सबंध आयुष्यभर ते त्याची जोपासना करीत असतात. त्याचें कौतुक करण्यासाठींच जगतात. अशीं माणसें दुःख सहन करतात व त्याची कुरकूर करीत दुसऱ्याचें लक्ष स्वतःकडे ओढून घेतात. सहानुभूति मिळविण्याचा त्यांचा तो मार्ग असतो. त्याशिवाय त्यांना कोणी विचारीत नाहीं—त्यांना किंमत नसते. त्यांचा रोग नाहींसा करा. त्यांना धडधाकट करा. आणि ते दुःखी झालेच ह्मणून समजा. कित्येक वेळां मनुष्य इतका गरीब असतो कीं दुर्गुणाला नसती किंमत दिल्यानेंच त्याला जगणें शक्य होतें. वैतागच मनुष्याला दुर्गुणाकडे खेंचत असतो.

सैनिकाच्या जिव्हारीं वाग्बाण लागला होता. त्यानें बेकरशीं मारामारी करण्याचा प्रसंग आणला.

" बोल. बोल चटकन. अशी कोण आहे ती. ?" तो गरजला.

" काय. बोलूंच ह्मणतोस ?" बेकरनें गिरकी घेत एकदम विचारलें.

" होय. नांव सांगितलेंच पाहिजे. "

" टोनिया माहित आहे ? "

" बरं मग. "

" मग काय ? तीच. तिच्यावर प्रयोग करून पहा बरें जरा. "

" मीं ? "

" होय तुह्मींच. "

" थू : ! त्यांत कांहींच नाहीं. "

" आह्मांला पाहूं तर द्या. "

" ठीक आहे. पहाल लवकरच. "

" ती तुझ्याकडे डोळा उचलून पहाते तरी कां ? "

" एक महिन्याची मुदत द्या. मग पहाल गंमत ! "

" किती घमेंडखोर आहांत! "

" पंधरा दिवस ! आणि मी दाखवितो मजा. कोण ह्मणालांत ? टोनिया नाहीं कां ? कांहींच राम नाहीं तिच्यांत. "

" आतां चालते व्हा येथून. वाट सोडा. तुह्मी वाटेंत आहांत. "

" एक पंधरवडाच. मी ह्मणतों—आणि काम फत्ते ह्मणून समजा. तुमची फजिती होणार. पहा. "

" आतां जातां कीं नाहीं येथून. "

बेकर एकाएकीं चिडला व त्यानें भराभर हातांतील झारा फिरविण्यास सुरवात केली. अचंब्यानें सैनिक जगसा पाठीमागें सरकला. थोडा वेळ आमच्याकडे निरखून पाहिलें. " छान " एवढाच उद्गार काढून शान्तपणें तो तेथून गेला.

आतांपर्यंतच्या झगडयांत आह्मीं कोणचि भाग घेतला नव्हता. आमच्या जीवनांतील आनंद पणाला लागणार असल्यानें आमच्याजवळ शब्दच उरले नव्हते. परंतु सैनिकाची पाठ फिरतांच आमच्या जिभा सैल सुटल्या.

" नसता उपद्व्याप छान करून ठेवलास. " बेकरवर एकजण गरजला.

" काम करा आपलं. ऐकूं आलें का ? बेकरनें तितक्याच चिडक्या आवाजांत उत्तर दिलें.

सैनिक तिच्यावर संधि साधून हात टाकणार आणि टोनियाला संकटांत लोटणार असाच आह्मां सर्वांचा ग्रह होता. परन्तु त्याबरोबर " काय होणार ? सैनिकाविरुद्ध टोनिया झगडूं शकेल कां ? " ह्याचा सोक्षमोक्ष लावून घेण्याची उत्सुकताही तीव्रतर होती.

" टोनिया खात्रीनें आपलें सत्व संभाळणार. " सर्वांनीं एकदम ह्मटलें. त्या शब्दांत पुरेपुर विश्वास होता.

ह्या छोट्याशा देवतेची कसोटी पहायची आमची सर्वांचीच इच्छा होती. आमची देवता कच्च्या मातीची नाहीं. ती यशस्वी होणार अशी एकमेकांजवळ आह्मी प्रौढी मिरवीत असूं. आह्मी त्या सैनिकाला पुरतेपणीं हट्टाला पेटवीले नाहीं. तो कदाचित आपली प्रतिज्ञा विसरेल. तेव्हां त्याला आणखी चिडवून इरेला घालावयास हवें होतें असं आह्मांस वाटूं लागलें. त्या दिवसांपासून आमच्या

आयुष्याला निराळेंच वळण लागलें. आमच्या भावना ज्यास्त नाजुक बनल्या. प्रत्येक गोष्टीचा त्यांवर चटकन् परिणाम होई. आपापसांतील भांडणेंही ज्यास्त वाढलीं. आमचं ज्ञान वाढलं; आह्मी व्यवस्थित व चांगलें बोलतों अशी आमची वृत्ति झाली. सैतानाशीं आमचा खेळ चालू आहे आह्मी टोनियाला पणाला लावली आहे असा आह्मांला भास होई. सैनिक टोनियाच्या पाठीस लागला आहे अशी बातमी फॅन्सी बिस्किट बेकरकडून कळतांच आह्मांला दुःख मिश्रित आनंद झाला. ह्या सर्व प्रकारांतून पार पडण्याकडे आमचें लक्ष वेधलें होतें. आह्मी शुद्धींत नव्हतों ह्मटलं तरी चालेल. ह्या संधीचा फायदा घेऊन मालकानें १४ पूड (५६० पौंड) पीठ आमच्या रोजच्या आराखड्यांत आणखी मिसळविलें तरी आमच्या तें गांवींही नव्हतें. आमचें काम थांबतच नसे ह्मणाना कधीं. टोनिया तर आमच्या जिभे-वर नाचत होती नुसती. सकाळ झाली कीं आमची अधिरता शिखर गांठींत असे.

परंतु एकंदर प्रकाराबद्दल आमच्याकडून तिला चकार शब्द कळला नाहीं. आह्मीं तिला कसलेही प्रश्न केले नाहींत. नेहमींच्याच प्रेमळतेनें आह्मीं तिच्याशीं वागत असूं. इतकं असूनही आमच्यां पूर्वीच्या भावनांत कांहीं तरी बदल झाला होता खास. हा बदल ह्मणजे तिच्याबद्दल वाटणारी तीव्र उत्सुकता. सुरीप्रमाणें तीक्ष्णधार असलेली ही उत्सुकता—थंड होती. भावनांचा आवेग, जिवन्तपणा तींत नव्हता.

* * * *

" गड्यानों आज मुदत संपते बरं का. " एक दिवस सकाळींच बेकरनें आठवण करून दिली.

आह्मां सर्वांना पूर्ण जाणीव होती. त्या सूचनेची कांहीं जरूर होती असें नाहीं. परंतु बेकरचे शब्द ऐकतांच शरिरांतून एक शिरशिरी गेलीच.

" तिला नीट न्याहाळा. आतां इतक्यांत येईलच ती येथें. " बेकर बोल-तच होता.

" जणूं डोळ्यांना सर्व दिसतेंच. " एकजण उद्गारला. त्याच्या आवाजांत कंप होता.

फिरून एकदां वादाला तोंड फुटलें. ज्या नौकेंत आमचं जीवनसर्वस्व होतें ती किती कणखर व स्वच्छ आहे ह्याचा त्या दिवशीं निकाल लागावयाचा होता. हा खेळ आह्मांला भोंवणार. आमच्या आराध्य देवतेच्या सत्वाला लावलेली ही कसोटी आमच्या आयुष्यांतून देवतेचें उच्चाटन करणार असें वाटत होतें. सैनिक हात धुवून तिच्या पाठीस लागला असल्याचें आह्मी कांहीं दिवसांपासून ऐकत होतों. असें असतांही सैनिकाबद्दल आमच्यापैकीं एकानेंही तिच्या जवळ अवाक्षर ही काढलें नाहीं. असें कां ? आणि ती सुद्धां रोज येत असे. एक दिवससुद्धां तिचा नेम चुकला नाहीं. तिच्यांत कांहीं बदल झाला नाहीं.

आणि त्या दिवशींही नेहमीं प्रमाणेंच तिची हांक ऐकूं आली.

" कैद्यानों, मी आलें आहे. "

तिला पहाण्यासाठीं सर्वच पुढें सरसावले. ती आंत आली. नेहमींच्या सरावाविरुद्ध ह्या दिवशीं सर्वांनीं मौन धरलें होतें. तिच्यावर बावन डोळे रोंखलें होते. परंतु काय बोलावें कसें विचारावें ह्याचा उलगडा होत नव्हता. लांब चेहेरा करून आमचा घोळका तिच्यासमोर जमला होता. ह्या नवीन स्वागतानें ती गोंधळली. तिचा चेहरा उतरला. ती अस्वस्थ झाली. जागच्याजागीं तिची चुळबूळ सुरू होती. दबलेल्या स्वरानें तिनें विचारलें.

" तुम्हांला काय झालें आज ? "

" आणि तुमचं कसं काय चाललें आहे ? " तिच्यावरची नजर न चळूं देतां बेकरनें चिडक्या आवाजांत तिला उलट प्रश्न टाकला.

" माझें कसें चाललें आहे ? ह्याचा अर्थ ? "

" कांहीं नाहीं, कांहीं नाहीं. "

" मला बिस्किटें द्या पाहूं. चटपट. "

ह्यापूर्वी तिचा तीव्र आवाज ऐकण्याची पाळी आली नव्हती.

" तुह्मीं आज गर्दीत दिसतां? " तिच्याशीं बोलण्याचें काम बेकरनें स्वतः-वर घेतलें होतें. जागेवरून तो तसूंभरही हालला नव्हता कीं तिच्या चेहऱ्यावरचीं त्याची नजरही ढळली नव्हती.

ती चटकन् फिरली व दरवाजांतून पार दृष्टीआड झाली.

बेकरनें झारा उचलला. भट्टिकडे जात तो शान्तपणें उद्गारला " ह्याचा अर्थ ती त्यांच्या गळी पडायला तयार आहे. तो सैनिक...हलकट...नीच ! "

मेंढ्यांच्या कळपाप्रमाणें आह्मीं जागेवर जाऊन बसलों. त्रासिक मुद्रेनें चुपचाप आमच्या कामाला सुरवात झाली. हें शक्य आहे कां पण..." कोणीतरी म्हणालें.

" जाऊं द्या न. आतां त्यावर बोलून फायदा काय ? " बेकरनें त्याला लगेच दाबलें.

आमच्यापेक्षां तो शहाणा आहे, ज्यास्त चाणाक्ष आहे हें आह्मांला माहित होतें. त्याचे उद्गार ह्मणजे सैनिक यशस्वी झाल्याचा तो कबुली जबाब होता. आह्मी अस्वस्थ झालों. आमच्या दुर्दैवाची जाणीव तीव्रतर झाली.

दुपारीं बारा वाजतां जेवण्याच्या वेळीं–सैनिक आमच्या जवळ आला. त्याच्या वागणुकींत काडीचाही बदल नव्हता. नेहमींचाच नीटनेटका पोषाख व स्नेहपूर्ण नजर. परंतु त्या नजरेला नजर भिडविणें आज आम्हांला जड जात होतें.

" कसं काय. मित्रांनो, तुमची इच्छा असल्यास तुम्हांला थोडीशी माझी करामत दाखवितों " हंसत हंसत त्यानें अभिमानपूर्वक म्हटलें. " बाहेरच्या औट हाऊसमध्यें येऊन वरच्या झरोक्यांतून हळूंच पहा मजा काय समजलां ? "

एकमेकांना मागें सारीत आम्हीं बाहेर गेलों व अंगणाच्या बाजूला असलेल्या भींतींतील झरोक्यांच्या फटींना डोळे लावले. थोड्याच वेळांत टोनिया बाहेर आली. तिचीं पावलें झपाझप पडत होतीं. चेहऱ्यावर अंधुकशीं काळजीची छटा पसरली होती. रस्त्यांतील डबकी, चिखल वगैरे टाळून ती शक्य तितक्या लवकर बाहेर पडली. तिच्या पाठोपाठच परंतु सावकाश शीळ घालीत आमचा सैनिकही बाहेर पडला. दोघेंही एकाच दिशेला गेलीं. हा त्यांचा पूर्व संकेत होता हें स्पष्टच होतें. त्यानें हात खिशांत कोंबले होते. मिशा वरखालीं होत होत्या. तोही दिसेनासा झाला. इतक्यांत पावसाला सुरवात झाली. आकाश अभ्राच्छादित असून एकंदर दिवस कंटाळवाणा वाटत होता. छपरांवर अजूनही बर्फाचा थर असून रस्त्यावर ठिकठिकाणीं चिखल सांचला होता. पाऊस झिमझिम पडतच होता. त्या थंडींत तिष्ठत राहाणें आमच्या जीवावर आलें होतें. परंतु आम्हांला–तिच्या भक्तांना–

सोडून गेल्याबद्दल—आणि तेंही एका सामान्य सैनिकासाठीं—टोनियाबद्दल आमचा तिळपापड उडाला होता.

सूडाच्या इच्छेनें आनंदित होऊन आह्मी तेथेंच तिची वाट पहात उभें राहिलों.

थोडयाच वेळांत ती परतली—तिच्या डोळयांतून आनंद आणि सौख्य नुसतें सांडत होतें, ओंठावर मंद स्मित विलसत होतें. स्वप्नांतच जणूं ती चालत होती. तिचं पाऊल स्थिर नव्हतें.

हें चित्र शान्तपणें पहाणें आह्मांला अशक्य झालें. आह्मीं एका झटक्या-सरशीं दरवाजांतून बाहेर पडलों. तिच्या भोंवतीं आमचा गराडा पडला. असभ्य अपशब्दांचा भडिमार सुरूं झाला.

आह्मांला पहातांच ती घाबरली. जमिनीला खिळली. कांहीं भीडभाड न धरतां आह्मी तिची यथेच्छ निंदा केलीं. नाहीं नाहीं त्या घाणेरड्या शिव्या तिला दिल्या.

आमचा आवाज चढलेला नव्हता. तिला जायला जागा नव्हती. हें आमच्या लक्षांत आलें होतें. ती सर्वस्वी आमच्या कचाट्यांत होती. वाटेल त्या रीतीनें आमचा राग तिच्यावर काढणें आह्मांला शक्य होतें. परंतु आश्चर्याची गोष्ट आह्मीं तिला मारलें नाहीं किंवा तिला हात लावला नाहीं. आमच्याकडून होणारा धिक्कार ऐकत इकडे तिकडे पहात ती आमच्या घोळक्यांत उभी होती. आमच्या विषारी शब्दांचा व धिःकाराचा तिच्यावर भडिमार चाललाच होता.

तिच्या चेहऱ्याचा रंग बदलला. कांहीं क्षणापूर्वीं सौख्यानंदानें चमकणारे ते निळे डोळे विस्फरित झाले. छाती धडधड उडूं लागली आणि ओंठांना कंप सुटला. तिला घेरून तिच्यावर सूड उगविण्याचें आमचें काम चालूं होतेंच. तिनें आह्माला लुबाडलें होतें. ती आमची होती. आमच्या आकांक्षा तिजवर निर्भर होत्या. आह्मां भिकाऱ्यांचा कण खरा. पण तेंच आमचें सर्वस्व होतें व तें आह्मी तिला अर्पण केलें होतें. परंतु आह्मी सव्वीस जण ती एकटी तेव्हां तिला योग्य अशी शिक्षा काय काढावी हें आह्मांला सूचत नव्हतें. आह्मीं तिला

मनसोक्त शिव्या दिल्या. ती शान्तपणें ऐकत होती. पाठलाग केलेल्या जनावराप्रमाणें ती आमच्याकडे डोळे फाडून पहात होती. तिचा थरकांप उडाला होता.

आम्हीं तिची टवाळी केली. शिव्या दिल्या. तिला जीव नकोसा केला. दुसरे लोक तेथें धावून आले. आमच्या पैकीं एकानें तिला बाही धरून हिसका दिला.

एकाएकी तिचे डोळे चमकले. तिनें सावकाश हातवर उचलून केंस नीट केले आमच्या चेहऱ्यावर आपली दृष्टी स्थिर केली.

" गरीब बिचारे कैदी. " तीं शान्तपणें उद्गारली आणि धीमी पावलें टाकीत सरळ चालूं लागली. आम्ही तिच्या रस्त्यांत होतों ह्याची तिला दादही नव्हती. आणि खरोखरीच तिला अडविण्याचें साहस आम्हांला झालें नाहीं.

ती आमच्या समोरून गेली. पसार झाली. आमच्याकडे वळून पाहिलें देखील नाहीं. परंतु जातांजातां

" गलिच्छ घाण नाहींतर !"

हे तिचे उद्गार आमच्या कानांत तापल्या तेलाप्रमाणें शिरले. आणि ती सुंदर, उद्धट, आणि गर्विष्ट टोनिया तेथून नाहींशीं झाली.

वर अभ्राच्छादित भुरके आकाश, पावसाची झिमझिम व आजूबाजूस चिखल अशा त्या अंगणांत आम्ही अजून ही उभेच होतों.

थोड्या वेळानें उदास भावानें आम्ही आमच्या दगडी कोठडींत परतलों. पाहिल्यापासूनच सूर्य कधींच आमच्या खिडकींतून आंत डोकावला नव्हता. अन् टोनियाही फिरून कधीं दिसली नाहीं.

———

[ गॉर्की यांच्या Twenty six men and a girl ह्या गोष्टीचा अनुवाद ]

# तिचा प्रियकर

——:०:——

मास्कोला शिकत होतों त्यावेळची गोष्ट. माझ्या घराशेजारीच लौकिकदृष्ट्या संशयास्पद वर्तनाची बाई रहात असे एक. तिचं नांव टेरेसा. जातीनं पोल* होती ती. तिचा तो उंच न धिप्पाड बांधा, जाड आणि काळ्याभोर भिंवया, खडा आवाज, प्रत्येक हालचालींत प्रत्ययास येणारा दांडगा उत्साह, एखाद्या कोळिणीला साजेशी ती वृत्ती, तिच्या काळ्याभोर नेत्रांत चमकणारी पाशवी चमक, आणि तो रांकट चेहरा हें सर्व पाहिलें कीं मला तिच्याबद्दल भीतीच वाटायची एक तऱ्हेची. मी वरच्या मजल्यावर रहात असें. तिची खोली समोरच होती अगदीं. ती घरांत असली कीं माझ्या खोलीचा दरवाजा बंद करून घेई मी. परंतु अशी वेळ क्वचित यायचीच कीं कधींतरी जिन्यांत किंवा आवारांतही आमची दृष्टभेट व्हायची. दारुनं बेहोष झालेली, केस पिंजारलेले, लालभडक डोळे अशा स्थितींतही ती मधूनमधून दिसे. अशा वेळीं तिच्या चेहऱ्यावर इतकं चमत्कारिक हंसू खेळत असे कीं पहाणाराचं मन शहारलंच पाहिजे. अशा वेळीं माझ्याशीं बोलण्याचाही ती प्रयत्न करीत असे.

" कसं काय मि. स्टुडन्ट ! ठीक चाललंय ना ? "

हा तिचा प्रश्न ऐकला कीं तिच्याबद्दल वाटणारा तिटकारा आणखीच वाढीस लागे. एऱ्हवी मी ती जागाच बदलली असती. परंतु वर्दळ मला

---

* पोलः—पोलंड देशची रहिवाशी.

मानवत नसे. आणि हा रस्ता रहदारीचा नव्हताच. शिवाय माझ्या खोलीतून फार सुंदर देखावा दिसत असे. आणि म्हणूनच त्या शेजाऱ्याकडे दुर्लक्ष करण्याचें ठरविलें होतें मीं.

एक दिवस सकाळीं बिछान्यांत लोळत पडलों होतों मी. वर्गाला हजर न रहाण्यासाठीं कांहींतरी निमित्त शोधीत होतों. इतक्यांत दरवाजा उघडला गेला.

"काहो उठलांत कां ?" दरवाजांतून आवाज आला. मी चमकून उठलों.

"काय पाहिजे." बिछान्यांतूनच मीं विचारलें.

तिच्या चेहऱ्यावर गोंधळ उडाला होता. बोलावं कीं नाहीं याचा निर्णय ठरत नव्हता. ती घुटमळली. तिच्या चेहऱ्यावर नेहमींपेक्षां ज्यास्त मार्दव दिसत होतें.

"एक काम आहे माझं. कराल का ?" तिनं धीर करून विचारलंच अखेर.

मीं तिला आपाद मस्तक न्याहाळलं. माझी नजर सूचक वाटली तिला.

"मला पत्र लिहायचं आहे घरीं. लिहून देतां का तेवढं ?" तिच्या आवाजांत भित्रेपणा, विनंती, मृदुता सर्व कांहीं सामविलीं होतीं.

मी टेबलाजवळ जाऊन बसलों. कागद पेन्सिल पुढें ओढली.

"बसाना ! हं. सांगा काय लिहू !"

मी दाखविलेल्या खुर्चीवर दबकतच बसली ती. खालच्या मानेनेंच बोलत होती.

"कोणाला लिहायचं ?"

"बोलेस्लाव्ह काश्पुट, वार्सा रोड."

"बरं सुरवात करा मजकुराला."

"प्रियकर बोलेस्का ! माझ्या जिवाच्या कलिजा माझ्या लाडक्या कबुतरा तुझ्या विरहानें तुझी आवडती थेरेसा अगदीं सुकून गेली आहे. बरेच

दिवसांत पत्र कां बरें नाहीं आलं म्हणून काळजी लागली आहे. जिवाला कशी ओढ लागली आहे पहा ना! आतुरतेनें डोळे लावून बसलेली सर्वस्वी तुझीच लहानगी थेरेसा ”

तो मजकूर ऐकून हंसण्याची उकळी दाबून ठेवणें अशक्य झालं मला. लहानगी झुरणारी थेरेसा! पांच फूटापेक्षांही उंच, १७० पौण्ड वजन व कित्येक वर्षें धुरांड्यांत माखलेला चेहरा. कोण म्हणेल लहानगी चकोरी!” पण मोठ्या कष्टानं हंसू दाबलं मी.

“ हा बोलेस्ट कोण ? ”

“ बोलेस्ट नव्हे, बोलेस्क माझा प्रियकर आहे तो. ”

नांवाचा अपभ्रंश केल्याचा राग आलेला दिसला तिला.

“ प्रियकर ! ”

“ हो. कां बरं. नवल वाटलं. होय ? माझ्या सारख्या मुलीला प्रियकर असणं चमत्कारिक वाटलं तुम्हाला खरं ना ? ”

“ नाहीं. तसं नाहीं. तुम्हाला प्रियकर असणं साहजीक आहे की. जगांत अशक्य शब्दच नाहीं मुळीं. बरं किती वर्षांपासून मैत्री आहे तुमची ? ”

“ सहा. ”

“ छान ! बरं मजकूर लिहूं ना असाच ? ”

थेरेसा ऐवजीं दुसरी कोणी बाई असती तर बोलेस्कचा प्रतिस्पर्धी झालों असतों मी कदाचित.

पत्र लिहून संपलें. तिनें नेहमींप्रमाणें आभार मानले. “ तुमचं कांहीं शिवण्या टिपण्याचं बारीकसं काम असलं तर मला सांगत जा कीं. ” तिनें म्हटलें. बोलणं वाढविण्याचा इरादा दिसला तिचा. परंतु माझ्याकडून तुटक उत्तर मिळाल्यानें ती लवकरच निघून गेली.

वरील गोष्टीला दोन एक आठवडे लोटले असावे. काम आटपून मी खिडकीशीं बसलों होतों शीळ घालीत. डोक्यांत कांहीं तरी विचार चालू असल्याचं निदर्शक होतें तें. संध्याकाळची वेळ व त्यांत ही पावसाळी हवा. त्यामुळें उबल्यासारखें झालें होतें मला. परंतु बाहेर जायचीही इच्छा होत नव्हती. उगाच भूतकाळच्या गोष्टी आठवीत आत्मपरिक्षण करीत पडलों होतों. इतक्यांत दरवाजा उघडला गेला. कोणीतरी आंत आलें. थेरेसाच होती ती.

" मिस्टर स्टुडन्ट. कांहीं महत्वाच्या कामांत तर नाहीं ना व्यत्यय आणला मी ! "

" नाहीं. बरं काय काम आहे ? "

" आणखी एक पत्र लिहायला सांगणार होतें. "

" ठीक आहे. कोणाला बोलेस्कला "

" नाहीं. ह्यावेळीं बोलेस्कच्यातर्फे लिहायचं आहे. "

" काय ? "

" अगदीं बावळट आहे मी. सांगतां सुद्धां येत नाहीं धड पहा. माझ्यासाठीं नको आहे तें पत्र. तुमचा चुकीचा समज झालेला दिसतोय. माझ्या ओळखीचा मनुष्य आहे एक. त्याला हवंय लिहून. त्याच्याही प्रेयसीचं नांव थेरेसाच आहे माझ्यासारखं. लिहून देतां कां तेवढं पत्र ? "

मी तिच्याकडे पाहिलें. तिचा चेहरा काळजीनं ग्रासला होता. हाताचीं बोटें थरथर कांपत होतीं. प्रथम उलगडाच होइना मला तिच्या बोलण्याचा. पण नंतर हळू हळू प्रकाश पडला सर्व गोष्टींचा.

" उगाच सारवासारव करण्यांत अर्थ नाहीं. बाई. बोलेस्क किंवा थेरेसा ह्यांचं अस्तित्व झूट आहे हें कळून चुकलंय मला. ही असली मदत माझ्याकडून व्हायची नाहीं. अन तुम्हीही माझ्याकडे येऊं नका फिरून. तुमच्याशीं संघटन वाढविण्याची इच्छा नाहीं माझी." मी कठोर स्वरानं उत्तर दिलं

ती भयंकर घाबरली. पांढरी फट्ट पडली एकदम. परंतु जागची हलली नाहीं. कांहींतरी बोलण्यासाठीं ओंठ हलत होते. परंतु शब्द मात्र बाहेर फुटत नव्हता. माझ्या कठोरवृत्तीबद्दल माझं मलाच वाईट वाटलं. उगाच बिचारीला दुखविलं. खरा प्रकार कांहींतरी निराळाच असावा असं वाटूं लागलं.

" मिस्टर स्टुडंट. " तिनं बोलायला सुरवात केली. पण काय मनांत आलें कोणास ठाऊक ती झपाट्यानें दरवाजाबाहेर पडली. तिचा दरवाजा जोरानें आदळल्याचा आवाज ऐकूं आला. संतापलेली होती ती. माझ्या जीवाला चुटपूट लागली. मीं थोडावेळ विचारांत पडलों अखेरीस कांहींतरी नक्की करून तिच्या खोलींत जायचं ठरविलं.

मी तिच्या खोलीचं दार उघडून आंत नजर फेंकली. टेबलाशीं बसून आपल्या दोन्हीं हातानीं तिनें चेहरा झांकून घेतला होता. " माझं ऐकतां कां जरा " मीं दबकतच सुरवात केली.

माझा आवाज ऐकतांच ती झटकन खालीं उतरली. डोळ्यांतून जणूं ठिणग्या पडत होत्या. माझ्या डोळ्यांत सरळ पहात तिनं बोलायला सुरवात केली.

" होय. कबूल आहे तुमचं म्हणणं मला. बोलेस्क किंवा थेरेसा ह्यांचं अस्तित्व फक्त माझ्या कल्पनेंत आहे. परंतु पत्र लिहून दिलें असतें तर काय बिघडलें असतें ? हें सर्व कळून काय फायदा झाला तुमचा ? "

" क्षमा करा. पण हें काय म्हणता तुम्हीं ? बोलेस्क किंवा थेरेसा खरोखरीच्या व्यक्ति नाहींत. खरं हें ? " ह्या अकल्पित स्वागतानं बाबचळून गेलेल्या माझ्या तोंडून कसेतरी शब्द बाहेर पडले.

" खरी गोष्ट आहे, माझं नांव थेरेसा आहे इतकंच. "

" मला कळला नाहीं एकंदर प्रकाराचा अर्थ " तिच्यावर नजर रोखींत मी म्हटलें. आम्हीं दोघेंही शुद्धींत आहोंत कीं नाहीं ह्याचा प्रश्न पडला मला.

थेरेसा टेबलापाशीं गेली. कांहीं शोधून परत आली.

तुम्हांला बोलेसला लिहिणं कठीण वाटत असेल तर हें घ्या आपलं पत्र. दुसरं कोणी तरी काम करील माझं. " एक कागद पुढें करीत चिडक्या आवाजांत ती म्हणाली.

होय. माझंच पत्र होतं तें.

" थेरेसा. मी तर पत्र लिहून दिलं होतं. मग दुसऱ्याकडून तेंच काम करवून घेण्याचं कारण नाहीं कळलं. आणि हें पत्र कां नाहीं पाठविलें ? "

" कोणाला पाठविणार ? "

" बोलेसला. "

" बोलेस अस्तित्वांत नाहीं. "

मला कांहींच अर्थबोध होईना. वेंधळ्यासारखा तिच्याकडे पहात उभा होतों मी.

" मी मनुष्यच नाहीं का ? मग बोलेसला मीं पत्रं लिहिलीं तर लोकांचं कांहीं नुकसान होतं कां ? मला तरी कांहीं कळत नाहीं. " तीच बोलत होती.

" पण ह्या नांवाची कोणी व्यक्ति नाहीं ना ? "

" नसली म्हणून काय झालं. माझं त्यामुळं समाधान होतं. मग काय हरकत आहे ? "

माझ्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला. माझ्या भावनांचें मिश्रण झालं होतं त्यावेळीं. दुःख व शरम दोहोंचाही सारखाच पगडा होता मनावर. ज्याला प्रेमळतेनें, आपुलकीनें वागवायला उभ्या जगांत एकही व्यक्ति नव्हती असा अभागी जीव माझ्यापासून तीन फुटांवरच होता. आणि त्या होरपळणाऱ्या जीवानं आपला काल्पनिक सुहृद निर्माण केला होता.

" असं आहे! म्हणूनच जगणं सहज आहे मला. "

ह्यापुढं नियमित आठवड्यातून दोनदां मी बोलेसचा पत्रव्यवहार करीत असे. तिला पत्र वाचून दाखवितांना ती ढळढळां रडे. माझं बारीक सारीक कामही ती आपणहून करीत असे.

माझा हा कार्यक्रम तीन महिने चालू होता. त्यानंतर संशयित वर्तनाबद्दल तिला एकेदिवशीं तुरुंगांत डांबण्यांत आले.

जगाचा कडू अनुभव जितका चाखावा तितकं मन सुखासाठीं कासावीस होत असतें. थेरेसानं धडा शिकविला मला. कोणास ठाऊक बिचारी कुठें आहे ती. कदाचित ह्या जगांतून अवतार ही संपला असेल तिचा एव्हां ना. पण थेरेसाची आठवण झाली कीं अजून ही मन शहारतें माझं.

---

टीपः—Her Lover ह्या गोष्टीचा अनुवाद.



नदीचा प्रवाह संथ वहात होता. प्रवाह इतका संथ होता कीं त्या दुपारच्या उन्हांत प्रवाह कोंडलेला वाटत होता. एक पिवळट बोट हळूंहळूं नदीकडे येत होती. उन्हाळ्याचे दिवस असल्यानें नदीला उतारच होता. दोन्हीं किनाऱ्यावर दूर अंतरापर्यंत शेतें पसरलीं असून मधूनच एकाकी वृक्ष विश्रांति घेत असावे असा भास होत होता.

दुपारची वेळ, सूर्य डोक्यावर आलेला. तिसऱ्या वर्गाचे उतारु उन्हानेंच थकून गेले होते अगदीं. डेकवर बसून बहुतेकांनीं किनाऱ्याचें निरीक्षण चालविलें होतें. कांट्यानं कांटा काढावा म्हणूनच कीं काय उन्हाचा त्रास टाळण्यासाठीं कांहीं मंडळी मधूनमधून चहा किंवा बीरचे घुटके घेत होती.

इतक्यांत इंजिन रूममधून एक उदास चेहऱ्याचा कोळसेवाला बाहेर आला. तो अनवाणीच असून आपले पाय जमिनीवर चोळीत तो कप्तानाच्या खोलीकडे वळला. कप्तान दारांतच होता.

“ कायरे, एवढ्या घाईनें कोठें चाललास ? ”

“ मिटका ”ला पहातों आहे कुठें आहे तो. ”

“ ठीक ”

कोळसेवाल्यानं आपला रस्ता सुधारला. कप्तान दरवाजांतच जांभया देत उभा होता.

इंजिनरूमच्या शेजारीच एक ठेंगू मनुष्य बसला होता. त्याच्या बूटावर वाळलेल्या चिखलाचा थर चढला होता. डोक्यावरची टोपी मात्र नवीन दिसत होती.

वेळ जात नसल्यानें कप्तानला कोणावर तरी गुरकावण्याची लहर लागली. हें सावज बरें वाटलें त्याला. "अरे ए, अकलेच्या कांद्या." त्यानें हांक दिली.

तो मनुष्य चमकला—घाबरला. कप्तानकडे वळण्यासाठीं त्यानं आपल्या शरिराला एक गिरकी दिली.

"कायरे, तिथें कशाला बसलास. तरी बरं, तिथं नोटीस लावली आहे बसायचं नाहीं म्हणून. तिकडे जाऊन बैस जा. वाचतां नाहीं का येत?"

प्रवासी जागेवरून उठला. नोटिस बोर्डाऐवजीं त्यानं त्या जागेवरूनच दृष्टी फिरविली.

"वाचतां होय? येतंय कीं." त्यानें उत्तर दिलें.

"मग येथें कशाला बसलास?"

"मला तर नोटिस दिसत नाहीं ती"

"कांहीं हरकत नाहीं. परंतु येथें गरमहि आहे अतिशय. शिवाय इंजिनांतून तेलाचा वास येत असतो...पण कायरे कोठून आलास?"

"काशीरा."

"घर सोडून किती दिवस झाले?"

"तीन वार."

"कांहीं पाऊसपाणी तुझ्या गांवाकडे?"

"नाहीं. कां बरं?"

"मग तुझ्या बुटांना चिखल कुठला एवढा?"

प्रवाश्यानें खालीं मान घातली. त्यानें हळूहळूं आपला पाय पुढें सरकावला. दुसराही न्याहाळला.

"बूट माझे नाहींत." तो हलकेंच म्हणाला.

कप्तानला हंसूं आवरेना. प्रवासी कांहीं बोलला नाहीं. हळूंच त्यानें पाय काढता घेतला; आणि हळूहळू बोटीच्या पाठीमागें जाऊन उभा राहिला.

त्याच्या कोटाच्या बाह्या त्याच्या मनगटाच्या खालीं उतरल्या होत्या. अर्थात कोट त्याचा नव्हता हें उघडच होतें. कप्तान त्याच्याकडेच पहात होता. प्रवाशाच्या गतींत आत्मविश्वासाचा अभाव स्पष्ट होता. कप्तानच्या भुवयां वक्र झाल्या. एका खलाशाला ह्या प्रवाशावर नजर ठेवायला त्यानें सांगितलें. एका फर्स्टक्लास केबिनच्या दाराशीं एक लठ्ठ मनुष्य बसला होता. त्याच्या समोर टेबलावर बीअर असून स्वारी चांगलीच झिंगली होती. त्याचे डोळे भिंतीवर खिळले असूनही त्यांत सजीवता खेळत नव्हती. बीअरचे ठिकठिकाणीं डाग पडले असल्यानें माशा टेबलाभोंवतीं घोंघावत होत्या. त्याच्या भुरक्या दाढीवरही त्यांचा हल्ला चालूच होता.

* * *

इंजिनरुमच्या धुराड्या जवळच लांकडांचा ढीग पडला होता. त्या ढिगाऱ्यावरच आसन जमविलं होतं मीं माझें. त्याच्यावर पडल्या पडल्या आसमंतांत शून्य नजर खिळली होती माझी. दोन्ही तीरांवर पसरलेल्या मैदानांत मावळत्या सूर्याचीं सोनेरी किरणें चकाकत होतीं. त्यांचा अजूनही ह्या जगांत जीव घोंटाळत असावा कदाचित. लाल, नारिंगी आणि निळया ह्या तीन मिश्रणांत चराचर वस्तूंची रुपरेषा लोपली होती. तर जवळपास असलेल्या टेंकड्या आपली छाया टाकून नदीच्या काळसर पाण्याला अधिकच काळिमा आणीत होत्या. दूर अंतरावर कोणी एक आगटी पेठविलेली होती. खाद्य मिळाल्यानं आगटीच्या ज्वाला उफाळूं लागल्या कीं त्या प्रकाशांत एक लहान होडी स्पष्ट दिसे. होडीला अजून ही जाळीं तशींच अडकलेलीं होतीं.

नदीचा प्रवाह कमाल स्तब्ध होता किनाऱ्यावरची शान्तताही सुईच्या आवाजानंसुद्धां भंग पावत नव्हती. परंतु आमच्या तिसऱ्या वर्गातील उतारूंचा भाग मात्र दुपार प्रमाणेंच उबलेला न कोंदट होता अजून. प्रवाशांच्या

संभाषणांना हळूंहळू मधमाशांच्या थव्याच्या घोंघावण्याचं रूप आलं होतं. कोण बोलतं, कशा विषयीं बोलतं, कांहीं आकलन होत नव्हतं. इतक्यांत माझी नजर अचानक मद्याच्या प्रवाशाकडे वळली. अगदीं चोर पावलानं तो सॅलिपोर्टकडे* येत होता. डाव्या हातानं कठडा धरून तो बोटीच्या टोंकावर जाऊन उभा राहिला. बराच वेळ तशाच स्थितींत हेलकावे घेत होता तो. टोपी अगदीं कान झांकून जाईपर्यंत डोक्यावर दाबली असल्यानं, कमाल बावळट दिसत होता तो.

त्याच्या मनांत काय आलं कोणास ठाऊक. त्यानं चौफेर शोधक नजर टाकली. परंतु माझं अस्तित्व त्याच्या नजरेंतून सुटलं असावं. पथ्यावरच पडलें माझ्या तें. मला त्याचं नीट निरीक्षण करतां आलं त्यामुळें. त्याचं नाक धरधरीत असून गाल व हनुवटी ह्यांवर तुरळक केंस होते. डोळे लहानच असून कमालीचं गढूळ तेज होतं त्यांचं. तो कांहींतरी लक्षपूर्वक ऐकत होता ह्यावेळीं.

निश्चयानं त्यानं एक पाऊल पुढें टाकलं. डोळ्याचं पातं लवतं न लवतं तों एक गाठोडें उचलून त्यानें समुद्रांत फेंकलें. दुसऱ्यालाही हात घातला त्यानें,

"अहो, काय करतां काय?" न राहवून मी ओरडलों.

तो चमकला. मीं कुठें आहे हें पाहण्याच्या उद्देशानें त्यानं एक हात कपाळावर टेकला.

"तुम्हाला काय करायचंय! जा पाहूं येथून."

भयंकर गर्दीनें परंतु हलकेंच त्यानें उत्तर दिलें. किती अडखळत होता बोलतांना तो!

त्याच्या उद्धटपणाची मजा वाटली मला. जरा चकीतही झालोंच- उठून मी त्याच्याजवळ गेलों.

---

*टीप—गलबतांतील एक भाग. आरमारांतील खलाशानां हल्ला करण्यासाठीं सोयीची म्हणून ठेवलेली जागा.

"काय केलंस. कल्पना आहे कां तुला? भूर्दंड भरावा नाहीं का लागणार." मीं म्हणालों.

त्यानं कोटाच्या बाह्या वर सारल्या. मारामारीचीच तयारी करीत होता जणूं तो.

"गमतीनं उचलला बोझा मी तो. माझी ताकद अजमावयाची होती मला. परंतु न पेलून तो पाण्यांत पडला." त्यानं हलक्या आवाजांत समर्थन केलें आपल्या कृत्याचें.

"पण, तूं तें मुद्दाम फेंकलेंस. पहात होतों मीं तें सारें–" त्याच्या धाष्ट्यानें थक्कच झालों मी जरा.

"वाहवा! छान! मला तें मुद्दाम फेंकण्याचं कारण? असं करणं शक्य आहे कां कुणि कधीं? काय नसती गोष्ट चिकटवता माझ्या अंगाला राव.?"

त्यानं आपले कपडे व्यवस्थित केले. चपळाईनं मला धक्का देऊन निसटला तो. त्याचा कोट प्रमाणाबाहेर लांब असल्यानं त्याचे पाय फारच तोकडे भासत. थबकत, शरिराला घुसळत चालत असे तो. संवयच होती त्याला तशी.

मी परतलों. आपल्या जागेवर येऊन पसरुन दिलें मीं स्वतःला. माझ्या आसपास बरीच मंडळी बोलत होतीं आपापसांत.

"प्रश्न विचारणं सोपं असतं. परंतु उत्तर देणं तितकंच सोपं नसतं नेहमीं." कोणीतरी बोलत होतें.

"खरं आहे." माझ्या मनांत पडसाद उठला.

नदीवर हळूं हळूं धुकं पसरत होतं.

* * * *

मध्य रात्रीची वेळ, मंडळी गाढ झोंपलेली होती. दिवसभर वळवळ-णाऱ्या जिभांना विश्रांति मिळाली होती. इंजिनची घरघर आणि पाण्याचा

सळसळाट ह्यांत घोरण्याचा आवाज मिसळून गेला. कानांना ह्या सर्व आवाजाची संवय झाली होती ह्या वेळपर्यंत.

किनारा दृष्टीआड झाला. मधून मधून पेटलेल्या आगट्यावरूनच किनाऱ्याचं अस्तित्व जाणवत होतं. ह्या उजेडामुळं आसपासचा अंधकार ज्यास्तच भयानक न उजाड वाटत होता. आकाशांतील तारा अनिमिष नेत्रानीं पहात होत्या; तर बोटीवरचे दिवे " विझूं का ? " असं प्रत्येकक्षणीं विचारत होते. पाण्यावरचा उसळता फेंस बोटीला चाटीत होता.

माझ्या शेजारींच एक बाई झोंपली होती. आपल्या लहानशा गांठोड्यांवर एक हात ठेवून आपलं उसें तयार केलें होतें तिनें. खांकेखालीं तिची चोळी ( बॉडिस ) फाटली असल्यानें त्यांतून तिची शुभ्र कातडी आणि केंस बाहेर डोकावत होते. तिचा चेहरा पसरट असून फुगीर गाल कानांना जाऊन भिडले होते. तिचे जाड ओठ उललेले असून त्यांवर हंसूं-प्रेतकळेचं हंसूं उमटलेलें होतें

अर्धवट गुंगींतच पहात होतों मी तिच्याकडे. चाळीसच्यावरच असावं वय. अन् बहुधा सभ्य घराण्यांतीलच असावी ती. जांवयाला किंवा मुलाला भेटायला चालली होती ती. कारण त्यांना देण्यासाठीं कांहीं जिनसाही घेतल्या होत्या तिनें बरोबर.

इतक्यांत कोणीतरीं काडी ओढल्याचा भास झाला मला. माझे डोळे सताड उघडले गेले. तोच प्रवासी बाईजवळ उभा होता त्या. कोटाच्या बाहींत आगपेटी लपविण्यांत गुंतला होता तो. त्यानं हात लांब केला. काडीची ज्योत हळूंच बाईच्या खांकेंतील केसांना लावली. केस जळाल्याची घाण आली. बाईनं झोपेंतच चाळवाचाळव केली.

उडीच मारली बिछान्यावरून मी. कोटाची कॉलर धरून हलविलें त्याला गदगद.

" शुद्धीवर आहेस कां ?" मी त्याला विचारलें.

तो माझ्याकडे वळला.

" कशी किंचाळली ती ! मजा नाहीं वाटली तुम्हाला ? पण जाऊं द्या मला. अडवू नका. सोडा म्हणतों ना ? " तो बडबडत होता. त्यांतून सुसंगता अर्थ काढणें कठीणच होतें. परंतु तो आवाज एक तऱ्हेचा तिटकारा उत्पन्न करणारा होता.

दोन क्षण माझ्या खांद्यावरून कुठें तरी पहात होता तो. माझ्या दृष्टीला दृष्टि भिडविण्याचें धैर्य त्याला होत नव्हतें. परंतु फिरून तो मला उद्देशून बोलूं लागला,

" कृपा करून खरंच जाऊं द्या मला आतां. मला झोंपच येत नव्हती. कंटाळलों पडून. तेव्हां म्हटलं, गंमत करावी जरा ह्या बाईची. काय बिघडलं त्यांत ? कांहीं नुकसान थोडंच झालं ? पहा कशी गाढ झोंपली आहे ती. पत्ता सुद्धां नाहीं लागला तिला. "

मला त्याची चिळसच आली. मीं त्याला ढकलूनच दिलें म्हणा ना. पायांचा त्याला आधार नव्हताच मुळीं. तो एकदम कोलमडला.

" एकूण माझा तर्क खोटा नव्हता तर. त्यानं मुद्दामच गाठोडं पाण्यांत फेंकलं होतं. काय चमत्कारिक मनुष्य आहे हा. " मी विचारांत गढलों. तो प्रवासी केव्हांच नाहींसा झाला होता.

माझी झोंप उडाली होती. त्या प्रवाशाचा विचार मला सोडीना. मी इकडे तिकडे फेऱ्या मारायला सुरुवात केली. चंद्र नुकताच वर येत असल्यानें पाण्यावर त्याची मंद प्रभा पसरली होती. पण त्यांत आल्हाद नव्हता. मनाला उपहास करणारीच छटा होती त्या प्रकाशांत. चालूनही कंटाळल्यामुळें मालाच्या पेट्या पडल्या होत्या त्या अडगळींत जाऊन बसलों मी. चोहोंकडे सामसूम होती. परंतु झोंपीं गेलेल्या लोकांचें अस्तित्वही असह्य झालं होतं मला ह्या वेळीं.

विचारांचासुद्धां कंटाळा आला होता. पेटाऱ्यांना टेंकून स्वस्थ पडलों होतों. इतक्यांत पलीकडून कोणी तरी बोलत असावें असा भास झाला. 'ह्या अपरात्रीं कोण बरं बोलत असावं!' मला नवल वाटलें. किती घोगरा आवाज होता बोलणाऱ्याचा.

"तुम्ही माझे बांधवच आहांत हो. मला मारूं नका. दया करा माझ्यावर. सांगतों, मी सर्व सांगतों तुम्हाला......हो, मींच खून केला माझ्या बापाचा——नाहीं नाहीं. मी खुनी नाहीं. माझ्या चुलत्याचं काम आहे तें—— मी हजर होतों. चुलत्यानं माझ्या बापाच्या डोक्यावर काठी मारली, तें रक्त उडालं माझ्या कपड्यांवर.

"माझ्या बापानं खूप गयावया केली. पायां पडला. संपत्ती देऊन निघून जातों म्हणाला. कोणी ऐकलं नाहीं त्याचं. माझं पण तुम्ही ऐकत नाहीं. नाहीं ऐकत? मर्जी तुमची. पण खरंच सांगतों, मी नाहीं हो खून केला तो. अगाई ग!"

त्या शब्दांत वेदना होत्या. शब्द तुटक येत असून वाक्यांत सुसंगति नव्हतीच कशी ती. मला राहवेना. मी जागेवरून उठलों. पलीकडे नजर फेंकली. तोच प्रवासी मी ज्या पेटाऱ्याला टेंकून पडलों होतों त्याच पेटाऱ्याच्या दुसऱ्या बाजूला बसला होता. जागा होता कीं झोंपेंत कुणास ठाऊक! आम्हां दोघांत फक्त पेटाराच मध्यें असल्यानें त्याचा प्रत्येक शब्द मला ऐकूं येत होता. तो उकिडवाच बसला असून आपले दोन्ही हात त्यानें कोटाच्या बाहींतून काढून घेतले होते. ढोंपरांवर हात रोवून त्यांवर आपली हनुवटी टेंकली होती त्यानें. त्याच्या चेहऱ्यावर सरळ चंद्रकिरण येत होते; त्यामुळें त्याचा चेहरा स्पष्ट पहावयाला मिळाला मला. प्रेताची अवकळा होती त्या चेहऱ्यावर. त्याचे डोळे मिटलेलेच होते. त्याच्यापासून थोड्या अंतरावरच कांहीं शेतकरी अस्ताव्यस्त झोंपले होते. त्यांची हलक्या आवाजांत बडबड चालूच होती.

" मला भीति वाटली. माझाही खून पडेल ह्या धास्तीनं भ्यालों मी. म्हणून मदत नाहीं करतां आली बापाला......गयावया केल्यानं का कधीं पाझर फुटतो हृदयाला ? माझ्या बापानं नाहीं का किती तरी निरपराधी असहाय लोकांच्या डोळ्यांतून पाणी काढलं ? त्यांत काय मोठंसं ?"

" त्याला मारण्याचा कांहीं आमचा विचार नव्हता. फक्त भीति दाखवून पैसे घेणार होतों; परंतु बाप पोलिसच्या गोष्टी बोलूं लागला. मग काय करणार ? माझ्या बापाला माझं तरी कुठं प्रेम होतं ? 'जेसुइट' म्हणून हिणवायचा मला. "

तो दोनचार मिनिटें थांबला. फिरून त्याचें बोलणें सुरू झालें. तो आपल्याच तंद्रींत होता. आसपासच्या मंडळीच्या अस्तित्वाची कल्पनाच नसावी बहुधा त्याला.

" बिचारी मंडळी खडी फोडताहेत. पण काय करूं मी ? मला सहन होईना. सुटकेच्या आशेनं सांगून टाकलं मी सर्व. माझ्या कृत्याचं समर्थन करा असं मी तरी कुठं म्हणतोंय ? पण माझी काय दशा झाली असती नाहीं तर !" विचारानेंच बहुधा त्याचें अंग थरारलें. त्यानें मान वर केली. एक जांभई देऊन डोळे उघडले. पण बराच वेळ दृष्टि शून्यांतच लागली होती. हळूहळू त्या डोळ्यांत जिवन्तपणाचें गढूळ पाणी चमकूं लागलें. त्यानें सभोंवार नजर टाकली. मंडळी पूर्वीप्रमाणेंच घोरत होती. त्यानें समाधानाचा सुस्कारा सोडला. मी त्याच्याकडे पहात असल्याची जाणीव नव्हती त्याला; आणि ती तशी जाणीव व्हावी अशी माझीही इच्छा नव्हती. आवाज न होऊं देतांच मी खालीं बसलों.

* * * *

विचाराच्या भरांत केव्हां झोंप लागली कळलेंसुद्धां नाहीं मला. पण स्वस्थ नव्हती ती झोंप. चमत्कारिक स्वप्नें पडत होतीं सारखीं. बटबटीत डोळ्यांच्या

माशा नाचत होत्या जणूं माझ्या डोळयांपुढें. मी त्यांना हांकलावयाला गेलों, तों माझाच पाय निसटला. त्या धक्क्यानें जाग आली. गुदमरल्यासारखें झालें होतें मला. कुठें तरी कळ निघत असून अशक्तता वाटत होती. मी उठून बसलों. डोळयांपुढें घेरी आली. चेहऱ्यावरून हात फिरविला. डोक्यांतून रक्ताची धार लागली होती.

मोठया कष्टानेंच उठलों मी. नळावर जाऊन जखम धुतली. पाणी बर्फासारखें थंड असल्यानें रक्त तेव्हांच थांबलें. डोक्याला हातरुमालानें बँडेज बांधून माझ्या जागेकडे परतलों मी. मी निजलों होतों तेथून जवळच सर्पणाचा ढीग रचला होता. माझ्या उशाशीं भली मोठी एक लोखंडी पट्टी पडली असून खोक्याची एक फळी पण सुटून आली होती. बोटीला बसणाऱ्या हेलकाव्यांमुळें ही पट्टीच माझ्या डोक्यावर येऊन आदळली असावी. अशी कल्पना माझ्या मनांत डोकावली. माझें समाधान झालें. मी माझ्या जुन्या जागेकडे वळलों. तिथें उग्र वातावरण कमी असून आसपासचा देखावाही दिसत असे.

पहांटेची वेळ. चराचर शान्त झालें होतें. ह्या वेळीं शुक्राचा तारा प्रामुख्यानें तळपत होता. सूर्याची लहानशी प्रतिमाच समजा ती. चांदण्यांचें तेज पाकळया गळून पडणाऱ्या फुलांप्रमाणें मावळत होतें. चंद्रही फटफटीत पडत होता. चराचर पृथ्वीवर भुरकट रंग पसरला होता, तर पूर्वेच्या क्षितिजावर फिकट गुलाबी छटा नुकतीच कुठें उमटूं पहात होती. पहांटेचा गार वारा अंगाला झोंबत होता. त्या मालाच्या पेटाऱ्याजवळ कोणी तरी हांपत आहेसें वाटलें मला. मीं मान फिरविली. दोन लहान सुजलेले डोळे माझ्या दृष्टीला भिडले. चेहरा मात्र आदले दिवसापेक्षांही जास्तच कोमेजला होता. थंडीनें कांकडल्यानें त्यानें शरिराचें गांठोडें बनविलें होतें. दृष्टि मात्र मलाच हुडकीत होती.

" मला पकडलं तर एकूण. कांहीं हरकत नाहीं. इच्छा असल्यास मारूं शकतां मला. मीं एक जखम केली. तुम्ही बदला घ्या वाटल्यास. " माझी दृष्टीला दृष्टी भिडतांच तो बोलूं लागला. उदास निर्जीव आवाज होता त्याचा.

आश्चर्यानें जागींच खिळलों मी. " तुझें काम तर तें. " मीं विचारलें. माझा स्वर दबलेला होता.

" होय; पण साक्षीपुरावा कुठं आहे तुमच्या बाजूनं ? "

त्याचा आवाज रुक्ष आणि फुटलेला होता. त्याच्याकडे पहाणाराला हंसूं आणि कींव दोन्ही वाटावीं अशीच एकंदर त्याच्या चेहऱ्याची ठेवण होती.

"काय, आहे का साक्षीपुरावा? नाहीं ना ? जा तर मग उडत." जरा अरेरावीनेंच तो फिरून बोलला.

त्याची दृष्टि त्याच्या अशरणतेची जाणीव देत होती. पण काय असेल तें असो, मला त्याच्याशीं बोलण्याची कल्पनासुद्धां हिडिस वाटे. सूड घेणें बाजूलाच राहिलें. दुसरीकडे मान वळविली मीं. त्याची ती मृतप्राय गढूळ नजर, त्यांत असलेली शत्रुत्वाची चमक, सकाळच्या उत्साही वातावरणांत मला असह्य झाली.

* * * *

सकाळची वर्दळ सुरू झाली. इतक्यांत त्या प्रवाशानें सर्वांच्यादेखत उडी घेतली समुद्रांत. एकच गोंधळ अन् गर्दी उडाली. प्राणरक्षक बोटी सोडण्यांत आल्या. प्रवासी ओरडत होते. त्यांना चूप करण्याचा खलाशांचा प्रयत्न व्यर्थ होत होता. कॅप्टनचा शब्दही फुकट गेला. त्या प्रवाशाबद्दल प्रत्येका-जवळ कांहीं ना कांहीं कथा होतीच. एकाच्या मतें तो वेडा असावा, तर दुसऱ्यानें त्याला ढोंगी ठरविलें. एकानें त्याला चोर म्हटलें, तर शिपायाची बायको पळविल्याचा आरोप चवथ्यानें त्याच्यावर केला, प्रत्येकाला आपल्याला

काय ती खरी बातमी आहे असें वाटत होतें. बुडणाऱ्याचें काय होतंय इकडून मंडळीचें लक्ष उडालें. आपापल्या बातमीच्या सत्यासत्याबद्दल मंडळी हमरी-तुमरीवर आली. कडाक्याचे वाद सुरू झाले. खरा प्रकार कोणालाच नक्की माहीत नव्हता. परंतु तो प्रवासी तुरुंगांतून जाऊन आलेला आहे हें सर्वांस कळून चुकलें.

इतक्यांत त्याला बोटीवर आणण्यांत आलें. कोलाहल एकदम बंद पडला. वर्दळीवर आलेली मंडळी प्रथम धांवली त्याला बघण्यासाठीं. त्याचा अजस्र कोट एखाद्या रिकाम्या गोणीप्रमाणें दिसत होता. प्रत्येक शिवणींतून पाणी ठिबकत होतें. त्याचा चेहरा साधा व शान्त भासत होता.

खलाशांनीं त्याला बोटीवर आणून निजविलें होतें. तो उठून बसला. जरा पुढें वांकून त्यानें आपले ओले केंस हातानें चापून बसविले. "माझी टोपी पण काढली का त्यांनीं पाण्यांतून ?" त्यानें विचारलें. पण मंडळींच्या नजरेला नजर देण्याचें मात्र टाळीत होता तो.

"आपला विचार करायचें सोडलें, टोपीचाच प्रश्न पडला आहे बेट्याला !" कोणी तरी म्हणालें.

इतक्यांत प्रवाशाला ठसका लागला. पोटांत गेलेलें खारें पाणी भडभडून बाहेर पडलें. त्याचे डोळे निस्तेज होते. आवाजांत कंप होता. दुसरीकडे जाऊं द्या मला, त्यानें याचना केली.

परंतु तेथेंच पडून राहण्याचा कप्तानचा हुकूम सुटला. हात उशाला घेऊन डोळे मिटून तो स्वस्थ पडला. मंडळी आवतीभोंवतीं जमलीच होती. त्यांना तेथून हांकलण्याचें सामर्थ्य नव्हतं कोणाचेंही.

"त्यानं खून केलाय बापाचा !"

"आपल्या बापाचा ?"

"नाहीं तर कोणाच्या तुझ्या ?"

मंडळी फिरून वर्दळीवर आली. तो मात्र स्वस्थ पडून सर्व संभाषण ऐकत होता. चेहऱ्यावरची रेषाही बदलली नाहीं त्याच्या. ह्या वेळपर्यंत फर्स्ट, सेकंड क्लासची मंडळी पण येऊन थडकली. " डॉक्टरना हांक मारा. " कोणी तरी म्हणालें.

" कशाला ? जणूं महत्त्वाचाच माणूस आहे मोठा! "

कोणी त्याची हेटाळणी करी, तर कोणाला कींव करावीशी वाटे. कोणी त्याला मूर्खांत काढी, तर दुसरे त्याला बदमाष ठरवीत. परंतु त्याला पहाण्यासाठीं मात्र नुसता तोबा उडाला होता. जणूं तो जिवंत नव्हता ! त्याला भावना नव्हत्या !

फिरून गप्पांना ऊत आला.

" आमच्या ओळखीच्या एका वॉचमेकरनं आत्महत्या करण्यापूर्वी दुकानांतलीं सर्व घड्याळं बंद पाडलीं."

" आमच्या शेजाऱ्यानं नाहणीघरांत टांगून घेतलं एकदां. पण त्यापूर्वी म्हणे त्यानं ती जागा स्वतः साफ केली व गुलाबपाणी शिंपडलं. "

" असतात झालं कांहीं कांहीं अजब प्राणी !"

" कप्तानसाहेब बोलावताहेत." एकानं निरोप आणला. प्रवासी मुकाट्यानं उठला.

* * * *

चौकशी आटपली. प्रवासी कप्तानच्या केबिनमधून बाहेर पडला. खलाशाचे कपडे त्याच्या अंगावर होते. पाठीमागें हातांत हात अडकवून झपाट्यानं तो बोटीच्या पाठीमागच्या भागाकडे गेला. पण बोटीवरची मंडळी ती. रिकामटेकडीच सर्व. पाळतीवरच होती त्याच्या. बारापंधरा जण जमले त्याच्याभोंवतीं. परंतु बोलण्याचें साहस कुणालाच होत नव्हतें. अखेर शक्य तितका प्रेमळ आवाज काढून एकानें सुरुवात केलीच.

" एकंदर प्रकार काय आहे सांगशील का आम्हांला ?

"काय म्हणून?" तो अचल होता. पण त्याच्या बोलण्यांत तुच्छता होती. प्रश्न विचारणारा एक पाऊल मागें सरला.

"काय म्हणून? कारण ही वेळच आहे अशी. खरं काय तें कळलंच पाहिजे सर्वांना." दुसरा म्हणाला.

तो हंसला. पुरेपुर उपहास होता त्यांत.

"बेटयाला डांबून ठेवा. मस्ती आलीय." तिसऱ्यानें आपलें मत व्यक्त केलें.

"बदमाष" चवथा उद्गारला.

"तुम्हीच आहांत."

लोक चिडले. पण त्याला हात लावण्याचा कोणालाच धीर होत नव्हता. त्याचा चेहरा करारी होता. वृत्ती बेदरकार होती. दुरूनच मंडळींचें भाष्य सुरूं झालें. तो चिडला.

"कोठें जाणार?" चाललोंय दरवडे खोराची गुहा शोधून काढण्यासाठीं. मला भेटणाऱ्या प्रत्येक माणसाचा खून करणार आहे मीं. एकदम शंभर खून करीन मी. वाटल्यास आतांच बांधा मला. मग जड जाईल.

त्याचा श्वास जोरानं चालला होता. चेहरा लालीलाल झाला. पाय कांपत होते. हृदयांत चाललेली खळबळ, वदना चेहऱ्यावर उमटल्या होत्या. चेहरा विकृत दिसत होता त्यामुळें.

मण्डळी पांगली. कोणी गंभीर होते. कोणी शिव्या देऊन संताप व्यक्त करीत होते. तर कांहीं थोडे हळहळत होते. जिज्ञासा अतृप्त राहिल्यानं चिडलेल्या लोकांचाच भरणा ज्यास्त होता. त्यांनीं त्याला बेदम मारलं नाहीं हेंच नशीब.

त्याचं धैर्य सुटलं. कुऱ्हाडीनं तोडलेल्या वृक्षाप्रमाणें खालीं कोसळला तो. थोडक्यांत सांवरला म्हणून. नाहींतर चांगलीच जखम व्हायची त्याला.

" माझा तरी काय अपराध ? मी सुटलों खरा. पण किती वर्षे डांबून पडलों होतों ! आणि आतां तरी स्वतंत्र आहे का मी ? माझं काय होणार तेंही सांगतां नाहीं येत मला. जीवन आणि मृत्यु दोन्ही पारखीं आहेत मला. " त्याला जोराचा हुंदका आला. जमिनीवर तो पालथा पडला. हात डोक्याच्यावर पसरले गेले.

मण्डळी परतली. पण वातावरण निस्तब्ध होते. गुदमरून सोडणारी शान्तता पसरली होती. मण्डळी अस्वस्थ होती.

" भाई, आम्ही तुझी कींव करूं फार तर. न्याय करणं शक्य नाहीं आम्हाला. " कोणी तरी हलकेंच म्हणाले. बोलणाराचा चेहरा उतरला असून मित्रत्वाचा भाव व्यक्त होत होता त्याच्या बोलण्यांत.

" आमची तरी किंमत कुठें ज्यास्त आहे तुझ्यापेक्षां. "

"तो दोषी न निर्दोषी दोन्ही आहे. जातां जातां तिसरा उद्गारला."

" झालं गेलं विसरून जावं बाबा ! चवथ्यानं उपदेश केला. तो मात्र त्याच स्थितींत हुंदके देत पडला होता.

अखेर एक बाई पुढें आली. " कशाला बिचाऱ्याला त्रास देतां ? पडूं द्या बिचाऱ्याला एकटा. " तिनं सूचना आणली. मण्डळी कंटाळलीच होती. हळूहळू त्यांनीं मागें पाय घेतला.

" पाहिलंत. माझं म्हणणं खरं ठरलं कीं नाहीं. सद्सद्विवेक बुद्धीची टोंचणी आहे बाबा ही ! "

" कितीही बदमाश असो. विवेक कधीं ना कधीं जागा होणारच ! "

" लोक निःसत्व आणि मेषपात्र होताहेत. मग तुम्हीं कांहीं म्हणा. "

" काय करणार. लोकांची वाढ व्हायला जागाच नाहीं. "

" छे, हो. असं नका म्हणूं. वाढ होत आहे. फक्त दाढी मिशांत एवढाच फरक. "

मंडळी हंसली खरी. पण त्यांत दु:खाची झांक स्पष्ट होती.

"खरी गोष्ट आहे. आमची कुचंबणा होत आहे हेंच खर." मंडळी पांगली. बोट बंदराला लागत होती म्हणून मंडळी सामानाची आवराआवर करावयास लागली.

माझी दृष्टी फिरून त्या प्रवाशाकडे वळली. जणूं कांहीं जादूच होती त्याच्याजवळ.

ती बाई आपल्या फ्राकमध्यें ब्रेडचे तुकडे करीत होती.

* * *

"आपण थोडा चहा घेऊं या. मग बरोबरच प्रवास करूं क्रिस्ठोपोल पर्यंत."

त्याची नजर तिच्या मोठाल्या हातावर खिळली होती. कामानं रांकट झालेले ते हात. तरी अद्यापिही मृदुता मेली नव्हती त्यांतलीं. तिनं त्याला एक तुकडा दिला.

"मला भीति वाटते हो जगाची" त्यानें कळवळून म्हटलें.

"कां बरं?"

"वाटते खरी."

"खरं आहे. फार सहन करावं लागलं तुम्हाला. बरं आतां माझा इतिहास सांगूं कां? कीं प्रथम चहाच प्यायचा आपण?" तिनें चहा गाळायला सुरवात केली.

स्वप्नांत दिसणारं स्वर्गीय चित्र होतं तें.

---

टीपः—On the River Steamer ह्या गोष्टीचा अनुवाद.

# पितापुत्र



" क्रिमियांत खानचं राज्य होतं त्या वेळीं. खानाचं नांव मोस्लेम अल्-खब. त्याच्या मुलाचं नांव तोलक अलगत."

गोष्ट सांगणारा आंधळा भिकारी होता एक. झाडाच्या बुंध्याला टेकून बसला ता तो. आवतीभोंवती कांहीं तार्तर मंडळी खडकावरून बसली होती. त्यांचे पडे झकपक असून टोप्यांवर सोनेरी कलाबतूचं काम केलेलें होतें. संध्याकाळची ळ असून सूर्य हळूहळु समुद्रांत बुडी घेत होता. सूर्याचीं तांबडींलाल किरणें ासमंतांतील झाडीवर व त्या शेवाळलेल्या खडकांवर पडल्यानें चोहोंकडे एक ऱ्हेची तकाकी पसरली होती. वारा वृक्षांच्या खांद्यांमधून वहात असतां वरच्या ्ल्या वातावरणांत एखादा नदीचा प्रवाह असल्याचा भास होत होता. भिका-याचा स्वर दुर्बल असून कंपित होता. त्या सुरकुतलेल्या चेहऱ्यावर कसलेही भाव मटत नव्हते. आसपास पसरलेल्या खडकां इतकाच चेहराही भावनारहित ोता. त्याचे शब्द अस्खलित बाहेर पडत असून श्रोत्यांच्या समोर ते जुना ामाना उभा करीत. त्याचा प्रत्येक शब्द भावपूर्ण होता.

" खान वृद्ध होता. परंतु त्याचा जनाना कमी नव्हता झालेला. आणि त्यांचं याच्यावर प्रेमही असे. कारण त्याची तारुण्याची धमक कमी नव्हती झालेली. याचं आलिंगन अजूनही मृदु न दाहक असे. मग त्याच्या रुपेरी केसांची व ुरकुतलेल्या चेहऱ्याची स्त्रियांना भीति कशी वाटणार ! सौंदर्य म्हणजे कोमल ातडी व गुलाबी गाल ह्यांतच का सामावलं आहे ?

सर्वांनाच खान हवासा वाटे. परंतु त्याचा जीव मात्र नीपर नदीच्या ओऱ्यांतून आणलेल्या एका कोसॅक युवतीवरच होता. त्याचा जनाना मोठा होता. नेरानेराळ्या देशांतील तीनशें स्त्रिया तेथें एकत्रित झाल्या होत्या. वसंतऋतूंतील ुमलत्या फुलांप्रमाणंच त्यांचं सौंदर्य. आणि खाननें ठेवलेंही होतें त्यांना चैनींत.

त्या कोसॅक युवतीला नेहमीं तो टॉवरवर घेऊन जाई. तेथून समुद्राचं दर्शन होत असे. तो तिचाच महाल होता म्हटलं तरी चालेल. त्या महालाला सुंदरता आणण्यासाठीं कोणतेही प्रयत्न खाननें बाकी ठेवले नव्हते. आपल्या प्रेयसीच्या मधुर सहवासांत खान दिवसचे दिवस येथें काढीत असे. अशा वेळीं त्याचं दर्शनसुद्धां व्हायचं नाहीं इतरांना. राज्याची धुरा त्यानं आपल्या मुलावर —तोलकवर सोंपविली होती. व होताही तो तसाच लायक. नबाबी इभ्रतीला कमीपणा आणणारं कोणतंही कृत्य त्याच्या हातून झालं नव्हतं. लांडग्याप्रमाणं दर वर्षी तो रशियावर तुटून पडे. यश, योषिता व पैसा घेऊन परते! धडकी, धडे व राख त्या देशांत शिल्लक राही.

अशीच एक स्वारी नुकतीच संपली होती. आपल्या विजयी वीराच्या सन्मानार्थ क्रिमियांत ध्वजापताका उभारल्या गेल्या. विजयोन्मादानं देश फुरफुरला होता नुसता. सर्व मानकरी, मिर्झा राजधानींत जमा झाले. मेजवानी, नाच, तमाशे, शिकार ह्यांना ऊत आला. खानाचा आनंद तर कांहीं विचारायलाच नको! ह्या पराक्रमी पुरुषाचा तो जन्मदाता होता. आपल्या मृत्यूनंतरही आपली परंपरा कायम राहणार ह्याबद्दल संशय नव्हता त्याला.

प्रेमाचा पडताळा पटविण्यासाठीं दरबार बोलाविण्यांत आला. झाडून सारे मानकरी हजर होते. खाननें त्या वीराचा गौरव केला. डोळ्यांत अश्रु, आवाजांत कंप, अशा स्थितींत भाषण संपलें. "काय हवं तें माग, मी देतों." असं इच्छादानाचं आश्वासन खानानें दिलें.

त्याचा शब्द विलीन होतो न होतो तोंच तोलक उठला.

त्याच्या नेत्रांत अग्नीचं तेज होतं. समुद्राप्रमाणं धीरगंभीर आवाजांत तो उत्तरला,

"क्रिमियाचे खानसाहेब, माझे पिताजी! कोसॅक युवती पाहिजे मला."

खानला धक्का बसला. डोळ्यांपुढं अंधारी आली. स्वतःचा तोल सांवरण्याकरतां स्तब्ध होता तो. दरबारांत भयानक शान्तता पसरली. काय होणार, ह्या शंकेनं प्रत्येक हृदय थरारलं.

"हरकत नाहीं. खानाचा शब्द खोटा पडत नसतो. मेजवानी संपली कीं ती तरुणी तुला मिळेल." खानचा गंभीर व खणखणीत आवाज दुमदुमला.

तोलकच्या आनंदाला सीमा नव्हती. घारीप्रमाणं असलेले डोळे आनंदानें नाचत होते. " बादशहानं मला काय दिलंय ह्याची जाणीव आहे मला. मी बंदा गुलाम आहें आपला. माझ्या शरिरांतल्या रक्ताचा एकूणएक बिंदु आपल्या पायावर वहाण्यास तयार आहें मी. " त्यानें खानला मुजरा करीत म्हटलें.

" उलट सेवेची अपेक्षा नाहीं माझी. " बोलत असतां खानाचं मुगुटधारी मस्तक छातीवर टेकलें गेलें.

मेजवानी संपली. दोघेही बरोबरच जनान्यांत गेले. बरोबरच चालत होते दोघेही. परंतु दोघेही आपल्याच विचारांत. अखेर खाननेंच त्या स्तब्धतेचा भंग केला.

" क्षणाक्षणाला कमी होतंय माझं आयुष्य. हृदयाचे ठोके मंद पडायला लागले. गात्रंही शिथिल होत आहेत. त्या कोंवळ्या तरुणीच्या आलिंगनानंच काय्र ती नवचेतना येते मला. तोलक, खरंच सांग, तुला तिची जरूरी आहे का इतकी ? वाटल्यास माझ्या शंभर नव्हे सर्व बायका घेइनास; पण तिला असूं दे माझ्यासाठीं ! माझ्या मालवूं पहात असलेल्या प्राणांचं जीवनच आहे ती."

तोलकनें एक दीर्घ सुस्कारा सोडला.

" असे किती दिवस उरले आहेत माझे आतां ! माझ्या आयुष्यांतील तोच आनंद आहे अखेरचा. तिचंही प्रेम आहे माझ्यावर. ती गेली तर माझ्यावर—ह्या म्हाताऱ्यावर कोण प्रेम करणार ? आहे का कुणी तोलक ? "

तोलक स्तब्धच.

" तुझे बाहुपाश तिच्याभोंवतीं आहेत; ती तुझ्यावर चुंबनांचा वर्षाव करीत आहे, ह्याची जाणीव मनाला होत असतां मला जीवन्त राहणं शक्य आहे का ? आपलं पितापुत्राचं नातं अर्थातच ती ओळखीत नाहीं. बेटा, तोलक मृत्यूनं ह्यापूर्वीच कां बरं नेलं नाहीं मला ?"

दोघेही जनान्याच्या दाराशीं पोहोंचले. विचारानं दोन्हीं हृदयें भारावलीं होतीं. किती वेळ तरी दोघेही दारांतच उभे होते. सभोंवतीं गडद अंधकार पसरला होता. आकाशांत ढगांची शर्यत लागली होती. वारा वृक्षांना हिंदोळे देत होता, त्यांना अंगाईगीत गात होता.

" बाबा, माझं प्रेम आहे तिच्यावर. " तोलक एकेक अक्षर शान्तपणें उच्चारीत होता.

" मला माहीत आहे. आणि तिला तूं आवडत नाहींस रे पण. "

" तिच्या विचारानं हृदय जळतं. "

" माझी काय स्थिति आहे ह्या वेळीं, सांग बरं. "

फिरून काय बोलावं दोघांनाही सुचेना.

" मुल्लानं सांगितलं तेंच बरोबर आहे. स्त्री सुंदर असली तर दुसऱ्यांच्या मनांत अभिलाष उत्पन्न होतो. कुरूप असली तर पतीला इतरांबद्दल हेवा वाटतो. एकूण काय, पती दुर्दैवीच !"

" हृदयाच्या वेदना वेदांताच्या मलमपट्टीनं थांबत नसतात बेटा. "

" मग काय ? पिताजी, आपण एकमेकांची कींव करायची !"

खाननें वर पाहिलें. त्या उदास दृष्टींत प्रश्नचिन्ह उमटलें होतें.

" आपण तिला मारून टाकूं या !"

खाननें क्षणभर विचार केला. " तिच्या माझ्यापेक्षां तुझं स्वतःवरच जास्त प्रेम आहे. " तो हलकेच उद्गारला.

" खरी गोष्ट आहे. आणि तुमचंसुद्धां ! "

फिरून दोघांनीं मौन साधलं.

" होय. माझंही स्वतःवरच प्रेम आहे खरं. " झालेल्या आघातानं त्याला लहानाहून लहान केलं होतं.

" आपण तिला मारायचं कां ? "

" तुला देणं शक्य नाहीं. अगदीं अशक्य !"

" आणि मलाही ह्यापुढं सहन करणं शक्य नाहीं. वाटल्यास माझ्या हृदयांत खंजीर खुपसा. माझी ना नाहीं त्याला !"

खानला बोलवेना.

" किंवा आपण तिला कड्यावरून समुद्रांत ढकलूं या. "

" कड्यावरून समुद्रांत ढकलूं या ! " खाननें तोलकच्या शब्दांचा प्रतिध्वनि उमटविला.

दोघेही आंत शिरले. ती गालिच्यावरच झोंपली होती. दोघेही जवळ जाऊन उभे राहिले. किती वेळ तरी दोघांनींही एक टक लाविली होती तिच्याकडे. खानच्या डोळ्यांतून अश्रूंचा सर ओघळत असून त्याच्या रुपेरी दाढीवर ते बिंदु मोत्यांप्रमाणें चमकत होते. तोलकनें तिला जाग आणली. त्याचे ओंठ दांताखालीं दबलेले असून डोळ्यांत वासना एकत्रित झाल्या होत्या. ती उठली. उमलत्या उषेप्रमाणें तिचा चेहरा कोमल व गुलाबी होता. कमलाच्या पाकळ्या उघडाव्या त्याप्रमाणें तिचे डोळे उघडले. तिनें तोलकला पाहिलंच नाहीं. खानच्या गळ्यांत तिनं हात टाकले.

" तयार हो. आमच्याबरोबर आलं पाहिजे तुला." खानाचा स्वर मार्दवयुक्त होता.

तिची दृष्टि तोलकवर पडली. काय समजायचें तें ती समजली. तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले.

" असा निर्णय लावलात होय. कांहीं हरकत नाहीं. चला, तयार आहें मी. "

तिघंही चालूं लागलीं. रस्ता चिंचोळा. पाऊलवाटच होती ती. वारा घोंघावत होता.

अतिशय नाजुक होती ती. लवकर पाय उचलेनात. परंतु ती मानिनी; तिनं सांगितलं नाहीं त्यांना.

तिचं रेंगाळणं तोलकच्या लक्षांत आलं.

" घाबरलीस ?" त्यानें विचारलें.

एक तिरस्कृत दृष्टि टाकली तिनं त्याच्यावर. तिचे कोमल पाय रक्तबंबाळ झाले होते.

" मी उचलून घेतों." त्यानें आपले हात पुढें केले. तिनें खानाच्या गळ्यांत हात टाकले. हलक्याच हातानं त्यानं तिला उचलून घेतलें. हाताच्या रांठपणानेंही ती कुसकरेल अशी भीति वाटली त्याला. मार्गांत येणाऱ्या फांद्या खानला त्रास

होऊं नये म्हणून ती आपल्या हातानं बाजूला सारी. बराच वेळ चालत होते ते. अखेर सागराची गर्जना ऐकूं आली. तोलक पाठीमागून चालत होता. तो पुढें झाला.

" पिताजी, पुढं होतों मी. नाहीं तर तुमच्या मानेवर जंबियाचा वार करण्याची इच्छा अनावर व्हायची. "

" ठीक आहे. अल्ला तुझी इच्छा पूर्ण करो, किंवा क्षमा करो. मी क्षमा केली आहे. कारण प्रेम कसं असतं ठाऊक आहे मला. "

समुद्रकिनाऱ्यावर पोंहोंचले ते. कड्याच्या पायथ्याशींच त्याचं तें अमर्याद कराल काळं स्वरूप पसरलं होतं. लाटा खडकांवर येऊन आपटत होत्या. भयानक, रक्त गोठून टाकणारा अंधार होता तिथें.

" अखेरची सलामी बरं का ! " तिचं चुंबन घेत खान म्हणाला. तोलकनें ही सलाम केला.

तिनं खालीं पाहिलं. लाटांचं मृत्युगीत ऐकतांच कचरली ती. तिनं दोन्ही हात धडधडणाऱ्या छातीवर ठेवले. " ढकलून द्या मला. " त्यांना उद्देशून ती म्हणाली.

तोलकनें हात लांब केले. परंतु खानानं तिला उचलून घेतले, कवटाळलें. फिरून एकवार तिचं चुंबन घेतलं, आणि एकदम भिरकावून दिलं खालीं !

तांडवनृत्य करीत लाटा गात होत्या. त्या आवाजांत तिचा देह विलीन झाला. दुःखाचा अस्फुट हुंदकाही त्यांना ऐकूं आला नाहीं. खाननें तिथेंच बैठक घेतली. खालच्या गडद अंधकारांत तो विस्फरित नेत्रांनीं तिला शोधत होता जणूं. तोलक जवळच उभा होता. दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेऊन पाषाणाच्या मूर्तीप्रमाणें निश्चल उभा होता तो. वेळ जात होता. आकाशांत ढग जमले. वारा त्यांचा पाठलाग करीत होता. खानच्या मनांत चाललेल्या खळबळीप्रमाणें तेही काळे न जड होते अतिशय.

" पिताजी, जायचं ना ? " तोलकानें विचारलें.

" थांब जरासा." खाननें हलकेंच म्हटलें. जणूं कसला तरी कानोसा घेत होता तो. वेळ न वारा दोन्हीं सारख्याच वेगानें वहात होते. लाटांच्या क्रमांतही खंड नव्हता.

" पिताजी चला आतां."

" आणखी थोडा थांब."

कितीतरी वेळां हींच प्रश्नोत्तरें झालीं. परंतु ज्या जागीं आयुष्यांतील आनंद गमावला होता तेथून खान हलण्याचं लक्षण दिसेना. परंतु प्रत्येक गोष्टीला अखेर असतेच. थोड्या वेळानं खानही उठला. त्याच्या कपाळावर बारीकशी आंठी पडली होती. भुवया आकुंचित झाल्या होत्या. उत्साह व गर्वभरित स्वरानं तो म्हणाला " चला जाऊं या आपण."

दोघेही उठले. परंतु दोनच पावले गेले असतील नसतील तों खान थबकला.

" पण मी कां बरं जावं? आणि तोलक, जायचं कुठें? ह्या उप्पर जीवन्त राह्यचा तरी हक्क आहे का मला? माझं जीवन तिच्यासाठींच नव्हतं का? मी वृद्ध. माझ्यावर कोण प्रेम करणार आतां? आणि निष्प्रेम आयुष्य कंठायचं तर जगण्यांत तरी काय स्वारस्य बरं!"

" पिताजी, श्री न जयश्री नाहींत कां मोह घालणाऱ्या?

" बेटा, माझ्यासाठीं नाहींत त्या. त्यांचा मोह कधींच उडाला. त्यांची मातब्बरी तुझ्यापुढं. तरुणीच्या प्रेमानंच जीवन्त ठेवलं होतं मला. बेटा तें प्रेम मिळण्यासारखं नसेल तो भिकारी बेटा! अल्ला तुझं भलं करो." खानानं समुद्राकडे तोंड फिरविलें.

' अब्बा! तोलक किंचाळला. त्याला पुढें बोलवेना. मृत्युला कवटाळायला निघालेल्या मनुष्याला कोण काय म्हणणार?

" जाऊं दे मला."

" अल्ला!"

" सर्वसाक्षी आहे तो."

द्रुतगतीनं खानानें कडा गांठला. त्याच आवेशांत स्वतःला खालीं लोटून दिलें. मुलानं त्याला अडविलं नाहीं. वेळच नव्हता तसं करायला. एका निमिषार्धाचा खेळ. खान गेला. पण त्याच्या जाण्याचं अस्तित्व जाणवलं नाहीं.

तोलक कड्यावर जाऊन उभा राहिला. क्षणभर काळोखांत कांहींतरी पहात होता तो.

"अल्ला ! असलं निडर हृदय मलाही दे ना !" तो मोठ्यानेंच उद्गारला. आणि काळोखांत नाहींसा झाला तो.

झालं मोस्लेम–अ ह–अख़बचा अंत झाला. तोलकचा अधिकार क्रिमियांत गाजूं लागला."

**टीपः**—Khan and his son ह्या गोष्टीचा अनुवाद.